


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






वर्ष ९५ अंक ६१ जाने. १९७२

" " ६२ एप्रि. १९७२

" " ६३ जुलै १९७२ (फाटका)

" " " ६४ आक्टो. १९७२

म. सा. प. पृ - २९९-३०४

संपादक - के. नारायण काळे

वर्ष ९५ वे जाने. १९७२ अंक १ ला जानेवारी

" " एप्रिल १९७२ अंक २ रा

" " जुलै १९७२ अंक ३ रा

" " ऑक्टोबर १९७२ अंक ४ था

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[त्रैमासिक]




६१

संपादक—के. नारायण काळे
बी.ए., एल्एल.बी.

पौष १८६३

वर्ष १५ वें] जानेवारी १९४२ [अंक १ ला

अनुक्रमणिका



नि. १०१

# साभार-स्वीकार

१ **महाराष्ट्राचे अुपेक्षित मानकरी**— ले० व प्रका० प्रा. गं. बा. सरदार, १२४३/२ शिवाजीनगर, पुणें ४; मूल्य रु. २.

२ **य. म. गद्रे (कृष्णाग्रज) यांची कविता**– (भाग १ ला)— प्रका० य. म. गद्रे, ८४४ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. १.

३ **माझा नाटकी संसार–प्रथम खंड**— ले० श्री. भा. वि. वरेरकर; प्रका० श्री. गं. दे. खानोलकर, स्वस्तिक पब्लिशिंग हाअुस, केळेवाडी, मुंबअी ४; मूल्य रु. १॥.

४ **दीप** (लघुकथासंग्रह)— संग्रा० श्री. वि. भा. पाठक; प्रका० श्री. अेल्. के. कुलकर्णी, परभणी; मूल्य आ. ८.

५ Clash of Three Empires— Author V. V. Joshi, M.A. (Oxen); Publisher–Kitabistan, Allahabad; Price Rs. 4-8-0.

६ **जीवन-दर्शन**— (खलिल गिब्रान याच्या The Prophet या ग्रंथाचा अनुवाद) अनुवा० श्री. र. ग. जोशी; प्रका० श्री. गो. वा. कुलकर्णी, सुलभ राष्ट्रीय-ग्रंथमाला, पुणें २; मूल्य रु. १॥.

७ **महाराष्ट्राच्या राजकीय अुत्कर्षाची विवेचनात्मक विधायक योजना**— ले० व प्रका० श्री. आर. बी. सप्रे, ४० पिकेट रोड, मुंबअी २; मूल्य रु. १।.

८ **पाकिस्तानचें संकट**— ले० व प्रका० श्री. शि. ल. करंदीकर, पुणें २; मूल्य रु. २.

९ **कागदी बदाम** (कथासंग्रह)— ले० श्री. स. अ. शुक्ल; प्रका० श्री. कृ. ना. सापळे, त्रिभुवनरोड, मुंबअी ४; मूल्य रु. १।.

१० **पाकिस्तान कीं पन्नास टक्के**— ले० प्रभाकर पाध्ये; प्रका० डॉ. मा. भै. अुदगांवकर, हिंदु कॉलनी, मुंबअी; मूल्य रु. १.

११ **श्री. केशवस्वामींची कविता**— संपा० श्री. न. स. जोशी अुर्फ खरशीकर-शास्त्री; प्रका० बॅ. श्री. वा. नाअीक, बेगमपेठ, हैदराबाद (द.); मूल्य रु. ३.

१२ **मराठीचिये नगरीं** (भाग १)— ले० द. रा. कानेगांवकर; प्रका० श्री. द. र. कोपर्डेकर, प्रकाशमंडळ, ५२९ सदाशिव, पुणें २; मूल्य आ. १२.

१३ **समुद्रमंथन** (दिलरुबा प्रकाशन)— प्रका० श्री. रा. ग. जोग, दिलरुबा प्रकाशन, दादर, मुंबअी १४; मूल्य रु. १।.

१४ **ओळखीचे सूर** (काव्यसंग्रह)— कवि. रा. अ. काळेले; प्रका० त्रिं. अ. माअीणकर, ११ अिमली बाजार, अिंदूर; मूल्य आ. १२.

१५ **स्वतंत्र भारताचे द्रष्टे न्यायमूर्ति रानडे**— ले० प्रो. द. गो. कर्वे, प्रका० श्री. वि. ह. बर्वे, आर्यभूषण मुद्रणालय, शिवाजीनगर, पुणें ४; मूल्य रु. ३.

१६ **जिवाची मर्दुमकी**— ले० प्रो. वि. मा. दी. पटवर्धन; प्रका० श्री. रा. का. तटणीस; ३६४ ठाकुरद्वार, मुंबअी २; मूल्य रु. २.

१७ **हिमालयांत**— ले० ना. गो. चापेकर; प्रका० श्री. ल. ना. चापेकर; आर्य-संस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. २।.

[कव्हर पान तीनवर पाहा

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १५ वें ] अनुक्रमणिका [ अंक १ ला

## प. वा. न्यायमूर्ति माधव गोविंद रानडे






'सह्याद्री'च्या कृपेने]

(कै. गोविंद काशीनाथ साठे हुंडीवाले यांनी काढलेलें हें छायाचित्र प्रा. द. वा. पोतदार यांनी श्री. नारायण गोविंद साठे यांजकडून 'सह्याद्री'साठी मिळविलें)

**महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे जनक न्या. मू. रानडे यांचा शताब्दिजन्मोत्सव ता. १८ जानेवारी १९४२ या दिवशीं महाराष्ट्रांतील निरनिराळ्या ठिकाणीं अुत्साहाने साजरा करण्यांत आला.**

अनुक्रमणिका

कै. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर



जन्म : जुलै १८७२

मृत्यु : नोव्हेंबर १९४१



कै. भास्कर रामचंद्र तांबे



जन्म : नोव्हेंबर १८७४

मृत्यु : डिसेंबर १९४१

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



## मुलांचा खेळ



गोळा होउन खेळती पुलिनिं तीं वाळूंत बाळें पहा.
वेळा जी पसरे अफाट करितीं व्यापून ती आपुली.
त्यांना खेळ न तो मुळींच दिसतो; सृष्टी नवी निर्मिती.
वेधे लक्ष तिथेच, चित्र सगळें अेकाग्र सामावलें.

देवाची अतुला अतर्क्य रचना भासे भिकारी तयां.
खात्री वाटतसे फुकाच खपला तो विश्वकर्मा खुळा !
कोणी पोखरि बोगदे, तर कुणी खोदीतसे कालवे.
किल्ले बांधि कुणी जणू युग जुनें स्थापीत उद्धारुनी;

केले थोर बुरूज, रोवि विजयें उंच ध्वजा त्यांवरी.
यावच्चंद्रदिवाकरौ टिकविण्या सौंदर्यविज्ञानहि
कोणी अक्षर-वाङ्मया लिहितसे, आलेख्य रेखी कुणी.
मागे ठेवुनियां स्मृती परतती संतुष्ट सांजे मुलें.

वाटे त्यां कृतकृत्यता स्व-कृतिचा मोठा स्फुरे गर्वहि
काळाला चढतांच युद्ध-भरती गेलें लया सर्वहि !

—पु. मं. लाड

# महाराष्ट्राचे अुपेक्षित मानकरी

## अुपसंहार

( लेखक- गंगाधर बाळकृष्ण सरदार )

गेल्या पांच अंकांत भाअू महाजन, लोकहितवादी, विष्णुबावा ब्रह्मचारी, जोतीराव फुले, आणि विष्णुशास्त्री पंडित यांच्या चरित्रांचें आपण थोडक्यांत समालोचन केलें. त्यावरून महाराष्ट्रांतील ह्या थोर व निष्ठावंत समाजसेवकांच्या कार्याचें श्रेष्ठत्व कोणाहि सुबुद्ध वाचकाच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाही. मालापूर्व मराठी वाङ्मयांतील बहुतेक ग्रंथ व नियतकालिकें आज दुर्मिळ झालीं आहेत. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथांतील विवेचनांत पुष्कळ अपूर्णता राहिली आहे याची मला जाणीव आहे. परंतु सध्या अुपलब्ध असलेल्या अर्धवट व अपुऱ्या साधनांच्या आधाराने कां होअीना, ह्या महापुरुषांच्या अलौकिक व्यक्तिमत्वाची व अुज्ज्वल कार्याची लोकांना थोडीतरी कल्पना आणून द्यावी या अुद्देशानेच मीं हें काम हातीं घेतलें. अर्वाचीन महाराष्ट्राच्या अितिहासाविषयी बोलतांना सामान्य सुशिक्षितांतहि न्यायमूर्ति रानडे व विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यापासूनच आरंभ करण्याचा परिपाठ पडला आहे. रानडे-चिपळूणकरांच्या सार्वजनिक कार्याबद्दल सर्वांनाच आदर आहे. परंतु त्यांच्याहि अगोदर, अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत, यशापयशाची फिकीर न करतां ज्यांनी समाजहितासाठी केवळ कर्तव्यबुद्धीने आपल्या हाडांचीं काडें केलीं त्यांची अुपेक्षा करणें मुळींच अिष्ट नाही. त्यांच्या कार्याचा अुगम जरी कितीहि लहान असला तरी निष्ठा, धैर्य, त्याग, चिकाटी अित्यादि गुणांत त्यांची बरोबरी करणारे कार्यकर्ते ह्या काळांतहि फार थोडे आढळतील. अव्वल अिंग्रजींत महाराष्ट्रदेश थंड गोळा होअून पडला होता, व रानडे-चिपळूणकरांनीच प्रथम त्याला पुन्हा चेतना दिली, अशा खोट्या कल्पनेने आपण पूर्वींच्या श्रेष्ठ कार्यकर्त्यांकडे कधी ढुंकूनहि पाहिलें नाही. भाअू महाजन यांचें नांव देखील अद्याप पुष्कळांनी अैकलें नसेल. विष्णुबावा ब्रह्मचारी, जोतीराव फुले, विष्णुशास्त्री पंडित यांचीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. परंतु तीं त्यांच्या आप्तेष्टांनी किंवा अंधभक्तांनी लिहिलेलीं असल्यामुळे साहजिकच त्यांत चिकित्सेचा भाग कमी आहे. लोकहितवादी व जोतीराव फुले यांचीं नांवें जरी लोकांच्या परिचयाचीं असलीं, तरी त्यांच्याकडे पाहण्याचा अुचवर्णीयांचा दृष्टिकोन पूर्वग्रहदूषित आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांसारख्या प्रतिभासंपन्न व लोकप्रिय लेखकाने दोघांवरहि आपल्या अुथळ, असंबद्ध व अेकांगी टीकेचें हुकमी हत्यार अुपसल्यामुळे वरिष्ठ वर्गांत त्यांच्याबद्दल पुष्कळच गैरसमज दृढमूल झाले, आणि अजूनहि ते बहुतांशीं कायम आहेत. वास्तविक पाहतां या सर्वांना दिवंगत होअून आज पन्नासाहून अधिक वर्षें झालीं आहेत. काळहि पुष्कळ बदलला आहे. त्या वेळच्या वादांची तीव्रता दिवसानुदिवस कमी होत चालली आहे. त्यापेक्षा जास्त व्यापक व मूलग्राही प्रश्नांची आपण आज मीमांसा करूं लागलों आहोंत. तेव्हा तत्कालीन अुभयपक्षांचा अभिनिवेश दृष्टीआड करून निर्विकार मनाने पंडित-फुले-लोकहितवादीप्रभृति सुधारकांच्या कार्याचें मूल्यमापन करण्याचा काळ आता निःसंशय आला आहे.

आपल्या सभोवतालच्या परिस्थितीचा बारकाअीने विचार करून महाजन-लोकहितवादी-

अनुक्रमणिका

प्रभृति विचाराग्रणींनी लोकशिक्षणाचें कार्य हातीं घेतलें. आपल्या समाजाची कुवत त्यांना कळून चुकली होती. अिंग्लंडसारख्या प्रगत व बलाढ्य राष्ट्राशीं आपली गांठ आहे या गोष्टीकडे त्यांनी डोळेझाक केली नाही. आपला समाज समर्थ व सुसंघटित झाल्याशिवाय स्वातंत्र्य-संपादनाच्या नुसत्या पोकळ वल्गना करण्यांत कांही हशील नाही हें ते जाणून होते. स्वतःच्या क्षुद्र स्वार्थाची त्यांनी कधी पर्वा केली नाही; पण समाजाच्या हिताकडे दृष्टि ठेवून प्रत्येक पाअूल विचारपूर्वक टाकण्याची त्यांनी पहिल्यापासून दक्षता राखली. लोकनिंदेची क्षिति न बाळगतां त्यांनी आपल्या समाजांतील दोषांची निर्भीडपणें चिकित्सा केली. अिंग्रजांपासून आपणांस पुष्कळच गोष्टी शिकल्या पाहिजेत असें त्यांना प्रामाणिकपणें वाटत होतें. कालिदास-पाणिनी कितीहि श्रेष्ठ असले, अशोक-चंद्रगुप्त कितीहि पराक्रमी असले, तरी आम्ही आज दुर्बल व पंगु आहोंत हें शल्य त्यांच्या चित्तांत सारखें सलत होतें. म्हणून पूर्वजांच्या गतकालीन वैभवाचे गोडवे गाअून त्यांनी प्रतिगामी पांढरपेशा वर्गाची कधी खुशामत केली नाही. आपल्या समाजाला कसलाहि रोग जडलेला नाही; 'नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण' या जगराहटीप्रमाणेच आपण पारतंत्र्यांत खितपत पडलों आहोंत; आपल्या अवनतीला आपले दुर्गुण व मूर्खपणा फारसा कारणीभूत झाला आहे असें नाही; अशा तऱ्हेची भ्रामक विचार-सरणी प्रगट करून त्यांनी आपली स्वतःची व लोकांची फसवणूक केली नाही. (सवंग लोक-प्रियतेचा मोह झुगारून देअून त्यांनी जनतेला आत्मपरीक्षण करण्यास प्रवृत्त केलें. परंपरागत रूढ कल्पनांवर आघात केल्यामुळे महाजन, लोकहितवादी, विष्णुबावा, फुले, पंडित या व्यक्ति जरी कांही काळ अज्ञात राहिल्या, तरी त्यांच्या तत्त्वांना समाजाने आज मान्यता दिली आहे यांतच त्यांचा खरा मोठेपणा आहे.)

हे पांचहि जण खरेखुरे समाजसुधारक होते. त्यांच्या भूमिका जरी भिन्न असल्या तरी त्या परस्परांना पूरक होत्या. भाअू महाजन यांनी ज्ञानप्रसाराच्या कार्यांत आपलें मन घातलें व मराठी नियतकालिकांची परंपरा सुरू केली. त्याबरोबरच भ्याड व नादान बनलेल्या आमच्या लोकांचा स्वाभिमान जागृत करून कायद्याच्या कक्षेंत राहून कां होअीना, पण त्यांना अन्याया-विरुद्ध ओरड करण्यास शिकविलें. स्वार्थी व संकुचित वृत्ति सोडून देअून प्रत्येक प्रश्नाचा राष्ट्रीय दृष्टीने विचार करण्याची लोकहितवादींनी दिशा दाखवून दिली. खिस्ती आक्रमणाला यशस्वी रीतीने तोंड देअून विष्णुबावांनी वैदिक संस्कृतीबद्दल लोकांच्या मनांत अभिमान अुत्पन्न केला. तसेंच जगांतील अन्याय व विषमता यांचें निर्मूलन झाल्याशिवाय मनुष्यजात सुखी होणार नाही असा आपला ठाम सिद्धान्तहि त्यांनी लोकांपुढे आग्रहाने मांडला. (जोतीराव फुल्यांनी दलितवर्गाचें दुःख वेशीवर टांगलें, अितकेंच नव्हे तर त्यांची संघटना करून सामा-जिक विषमतेविरुद्ध जोराची मोहीम सुरू केली.) पंडितांनी जुन्या व नव्याचा समन्वय करून स्त्रीजातीच्या सर्वांगीण प्रगतीसाठी आपलें शक्तिसर्वस्व खर्च केलें. अशा प्रकारें या पंचकापैकी प्रत्येकाचें कार्यक्षेत्र जरी वेगवेगळें होतें तरी समाजाच्या कल्याणासाठीच ते सर्वजण रात्रंदिवस झटत होते यांत तिळमात्र संशय नाही, मात्र त्यांची समाजाची कल्पना जातिभेदाच्या भावनेने विकृत झालेली नव्हती. सगळ्या जनतेच्या सुखदुःखाशीं ते समरस झालेले होते. त्यामुळे भूतकालावर अवास्तव भर न देतां त्यांनी भविष्यकालाकडे आपली दृष्टि स्थिर केली होती. म्हणून मूठभर अुच्चवर्णीयांच्या स्वार्थी व संकुचित वृत्तीवर त्यांनी सणसणीत कोरडे ओढले, व समाजाच्या सर्व थरांतील लोकांच्या प्रगतीचा मार्ग मोकळा व्हावा अशा अुच्च आकांक्षेने प्रेरित होअून आपल्या कार्याची दिशा आखली. हा दृष्टिकोन पिढ्यानपिढ्या सगळ्या समाजाला

आपल्या हुकमतींत ठेवूं पाहणाऱ्या अुच्चवर्णीयांच्या पचनीं पडणें शक्यच नव्हतें. तेव्हा साहजिकच त्यांनी ह्या लोकसेवकांच्या बहुमोल कार्याची संभावितपणें अुपेक्षा केली. ज्या दलितवर्गाची कड घेअून फुले-लोकहितावादी प्रभृतींनी आपला झगडा आमरण चालविला, त्याला ह्या काळीं त्यांच्या कार्याची थोरवी कळण्यासारखी स्थिति नव्हती; मात्र दिवसानुदिवस जसजशी जनतेंत जागृति होअील, तसतसें त्यांच्या कार्याचें महत्त्व लोकांच्या निदर्शनास आल्याशिवाय राहणार नाहीं.

---

## महाराष्ट्र शब्दकोश पुरवणी

### अखिल महाराष्ट्रांतील वाचक व साहित्यिक यांस विनंती

महाराष्ट्र शब्दकोश पूर्ण होअून सुमारे तीन हजार ग्राहकांकडे आतापर्यंत रवाना झाला आहे. अनेकांनी त्याचा आतापर्यंत अुपयोगहि केलेला आहे. हा शब्दकोश तयार करीत असतांना पहिला भाग छापावयास घेतला तरी शब्द जमविण्याचें कार्य बंद न ठेवतां अव्याहत चालू ठेवण्यांत आलें होतें व त्याकरिता ग्रंथवाचनादि कार्यें संपादकवर्ग सवडीनुसार करीत होता ही गोष्ट पूर्वी संपादकीय निवेदनांत नमूद करण्यांत आलीच आहे.

आता ग्रंथप्रकाशन पूर्ण होअून कांही अवधीहि लोटला आहे. या दिवसांत ग्रंथाचा अुपयोग करणारांस कांही त्रुटी, अपूर्णता, दुरुस्ती करण्यासारखीं स्थळेंहि आढळलीं असण्याचा संभव आहे. कांही आस्थेवाअीक वाचकांनी ग्रंथांत समाविष्ट न झालेले कांही शब्द आमच्याकडे पाठविलेहि आहेत. आमच्या कार्यालयांतहि जमा झालेले पण विशिष्ट वर्णाने आरंभ होणारे शब्द छापून गेल्यामुळे अंतर्भूत करतां न आलेले असे सुमारें चार-पांच हजार शब्द जमलेले आहेत. त्यावरून शब्दकोशाची पुरवणी तयार करण्याचें काम चालू आहे.

तरी वरीलप्रमाणे ज्या वाचकांस शब्दकोशांत न आढळणारे शब्द दृष्टीस पडलेले असतील त्यांनी असे शब्द शक्य तर साधार व अवतरणांसह अर्थ वगैरे देअून आमच्याकडे जरूर पाठविण्याचें करावें. त्याचप्रमाणे अर्थ, अवतरण, व्युत्पत्ति वगैरे बाबतींत मुद्रणदोषामुळे अगर अन्य कारणांमुळे कांही प्रमादस्थळें अथवा भर घालण्यासारखी माहिती आढळल्यास तीहि आमच्याकडे पाठवावी.

अशा सर्व साहित्याचा अुपयोग करून शक्य तर अेक स्वतंत्र पूर्ण भागच पुरवणी म्हणून काढण्याचा आमचा विचार आहे. तरी अशा प्रकारचें साहाय्य महाराष्ट्रांतील विद्वान व पंडितवर्ग व अितर आस्थेवाअीक वाचक आम्हांस करतील अशी आशा आहे.

सुमारे तीन महिनेपर्यंत वाट पाहून प्रत्यक्ष कार्यास सुरुवात करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. तरी या अवधींत शक्य ती सहकारिता करण्यास महाराष्ट्र भाषाप्रेमी मंडळी अभिमानाने पुढे येतील असा आम्हांस दृढ भरवसा आहे.

शब्दकोश कचेरी
टिळक स्मारक मंदिर, पुणें २

**यशवंत रामकृष्ण दाते**
**चिंतामण गणेश कर्वे**

**ता. क.**— महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोशाचें संपादनकार्य पुरें झालें असून तो कोश छापणें चालू आहे. तेव्हा या पुरवणी कोशाचें संपादन हातीं घेत आहों.

---

अनुक्रमणिका

# ॲरिस्टॉटल्‌ची काव्यमीमांसा आणि तींतील अपरिहार्यतेचें तत्त्व*

(लेखक– श्री. बा. सी. मर्ढेकर)

शास्त्रीय साहित्यचर्चेला आरंभ ॲरिस्टॉटल्‌पासून झाला. रचनेच्या पद्धतशीरपणाच्या दृष्टीने त्याच्या "काव्यमीमांसा" (Poetics) या ग्रंथाचें महत्त्व फार मोठें आहे. आणि काव्यमीमांसेचें रहस्य त्याच्या अगदी हाताशीं आल्यासारखें या पुस्तकांत कांही ठिकाणीं वाटतें. पण ही गोष्ट माझ्या मतें त्याच्या अेकंदर मीमांसाविषयक दृष्टीला न जुमानता अकल्पित घडून आलेली शुभघटना आहे. सहजासहजीं कांही गोष्टी जुळून आल्यामुळे त्याच्या सिद्धान्तामध्ये आढळणारी आभासमय तर्कशुद्धता, आणि त्याच्यानंतरच्या मीमांसकांनी त्या सिद्धान्तांचें (अेखाद्याची खात्री पटावी अशा रीतीने) केलेलें सविस्तर मंडन यांमुळे त्यांना अेकप्रकारें सार्वत्रिक मान्यता मिळाली आहे, आणि ही गोष्ट माझ्या मतें साहित्यरसग्रहणाला विघातक झाली आहे. साहित्यमीमांसेचीं जीं तत्त्वें आणि साहित्याच्या अुत्कृष्टत्वासंबंधी जीं प्रमाणें त्याने मांडलीं किंवा आपल्या तत्संबंधीच्या मूलभूत दृष्टीनुसार त्यांकडे अंगुलिनिर्देश केला त्यांचें महत्त्व माझ्या मतें संशयास्पद आहे कारण ही त्याची दृष्टि ललितवाङ्मयप्रांतांत गैरलागू आणि अप्रमाण आहे.

त्याच्या मीमांसाविषयक दृष्टीचें स्वरूप काय आणि ती मला अप्रमाण कां वाटते याचें दिग्दर्शन या निबंधांत करावें असा माझा विचार आहे. आणि यासाठी मी त्याच्या अपरिहार्यतेच्या सिद्धान्ताचा [म्हणजे संभाव्य किंवा अपरिहार्य अनुक्रमाचा (sequence)] आणि ज्या घटकानुबद्ध अेकरूपतेच्या (organic unity) कल्पनेवर हा सिद्धान्त आधारला आहे (आणि जी बुचरच्या मतें ॲरिस्टॉटल्‌च्या सबंध काव्यमीमांसेला आधाररूपच झाली आहे असें म्हणतां येअील) तिचाहि त्याबरोबरच मी विचार करणार आहें. ॲरिस्टॉटल्‌च्या मूलभूत दृष्टींतील ही चूक अुमगल्यामुळे आपल्या टीकात्मक निर्णयांच्या प्रत्यक्ष घडणींत कांही विशेष फरक पडेल किंवा काय हा प्रश्न कदाचित् वादविषय होअूं शकेल. पण माझें म्हणणें जर खरें असेल तर निदान त्यापासून अितका तरी अुपयोग होअील की आपल्या साहित्यमीमांसाविषयक तत्त्वांना अेक अधिक निर्दोष आणि गंभीर असा सैद्धान्तिक पाया लाभेल.

सुदैव असें की ॲरिस्टॉटल्‌च्या मीमांसाक्षेत्रांतील अभ्रतीला बाधा आणण्याला त्याच्या काळीं ग्रीक वाङ्मयांत 'भावगीत' (lyrical poetry) हा स्वतंत्र काव्यविशेष म्हणून अस्तित्वांत नव्हता. त्याच्या विश्लेषणात्मक संशोधनाचे मुख्य विषय दोनच होते, ते म्हणजे दुःखान्त नाटक आणि महाकाव्य, आणि हे दोन्ही वाङ्मयप्रकार कथाप्रधानच होते. (हेंहि ठीकच होतें.) त्यामुळे ॲरिस्टॉटल्‌चा "काव्यमीमांसा" हा ग्रंथ वाचतांना पहिल्याने जर

---

* ARTS AND MAN मधील The Doctrine of Necessity in Aristotle's Poetics या चवथ्या प्रकरणाचा श्री. रा. भि. जोशी, अेम्.अे., कृत अनुवाद.

आपल्या हुकमतींत ठेवूं पाहणाऱ्या अुच्चवर्णीयांच्या पचनीं पडणें शक्यच नव्हतें. तेव्हा साहजिकच त्यांनी ह्या लोकसेवकांच्या बहुमोल कार्याची संभावितपणें अुपेक्षा केली. ज्या दलितवर्गाची कड घेअून फुले-लोकहितावादी प्रभृतींनी आपला झगडा आमरण चालविला, त्याला ह्या काळीं त्यांच्या कार्याची थोरवी कळण्यासारखी स्थिति नव्हती; मात्र दिवसानुदिवस जसजशी जनतेंत जागृति होअील, तसतसें त्यांच्या कार्याचें महत्त्व लोकांच्या निदर्शनास आल्याशिवाय राहणार नाहीं.

---

# महाराष्ट्र शब्दकोश पुरवणी

## अखिल महाराष्ट्रांतील वाचक व साहित्यिक यांस विनंती

महाराष्ट्र शब्दकोश पूर्ण होअून सुमारे तीन हजार ग्राहकांकडे आतापर्यंत रवाना झाला आहे. अनेकांनी त्याचा आतापर्यंत अुपयोगहि केलेला आहे. हा शब्दकोश तयार करीत असतांना पहिला भाग छापावयास घेतला तरी शब्द जमविण्याचें कार्य बंद न ठेवतां अव्याहत चालू ठेवण्यांत आलें होतें व त्याकरिता ग्रंथवाचनादि कार्यें संपादकवर्ग सवडीनुसार करीत होता ही गोष्ट पूर्वी संपादकीय निवेदनांत नमूद करण्यांत आलीच आहे.

आता ग्रंथप्रकाशन पूर्ण होअून कांही अवधीहि लोटला आहे. या दिवसांत ग्रंथाचा अुपयोग करणारांस कांही त्रुटी, अपूर्णता, दुरुस्ती करण्यासारखीं स्थळेंहि आढळलीं असण्याचा संभव आहे. कांही आस्थेवाअीक वाचकांनी ग्रंथांत समाविष्ट न झालेले कांही शब्द आमच्याकडे पाठविलेहि आहेत. आमच्या कार्यालयांतहि जमा झालेले पण विशिष्ट वर्णाने आरंभ होणारे शब्द छापून गेल्यामुळे अंतर्भूत करतां न आलेले असे सुमारें चार-पांच हजार शब्द जमलेले आहेत. त्यावरून शब्दकोशाची पुरवणी तयार करण्याचें काम चालू आहे.

तरी वरीलप्रमाणे ज्या वाचकांस शब्दकोशांत न आढळणारे शब्द दृष्टीस पडलेले असतील त्यांनी असे शब्द शक्य तर साधार व अवतरणांसह अर्थ वगैरे देअून आमच्याकडे जरूर पाठविण्याचें करावें. त्याचप्रमाणे अर्थ, अवतरण, व्युत्पत्ति वगैरे बाबतींत मुद्रणदोषामुळे अगर अन्य कारणांमुळे कांही प्रमादस्थळें अथवा भर घालण्यासारखी माहिती आढळल्यास तीहि आमच्याकडे पाठवावी.

अशा सर्व साहित्याचा अुपयोग करून शक्य तर अेक स्वतंत्र पूर्ण भागच पुरवणी म्हणून काढण्याचा आमचा विचार आहे. तरी अशा प्रकारचें साहाय्य महाराष्ट्रांतील विद्वान् व पंडितवर्ग व अितर आस्थेवाअीक वाचक आम्हांस करतील अशी आशा आहे.

सुमारे तीन महिनेपर्यंत वाट पाहून प्रत्यक्ष कार्यास सुरुवात करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. तरी या अवधींत शक्य ती सहकारिता करण्यास महाराष्ट्र भाषाप्रेमी मंडळी अभिमानाने पुढे येतील असा आम्हांस दृढ भरवसा आहे.

शब्दकोश कचेरी
टिळक स्मारक मंदिर, पुणें २

यशवंत रामकृष्ण दाते
चिंतामण गणेश कर्वे

**ता. क.**— महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोशाचें संपादनकार्य पुरें झालें असून तो कोश छापणें चालू आहे. तेव्हा या पुरवणी कोशाचें संपादन हातीं घेत आहों.

---

कोणती गोष्ट लक्ष्यांत येत असेल तर ती ही की वाङ्मयांत कथानकरचनेचें महत्त्व सगळ्यांत अधिक आहे असें तो वारंवार बजावून सांगतो. त्याचीं कांहीं वाक्येंच अुतरून घेतों म्हणजे ही गोष्ट स्पष्ट होअील.

"सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रसंगांची रचना."

"...स्वभाव हा घटनांच्या मानाने गौण आहे. म्हणून प्रसंग व कथानकरचना हींच दुःखान्त नाटकाचीं अंतिमसाध्यें होत. आणि अंतिम साध्य हीच सगळयांत महत्त्वाची गोष्ट असते."

"तसेंच विचार, शब्दयोजना आणि स्वभावदर्शन या बाबतींत सामान्य पण कथानक चांगलें आणि प्रसंगांची योजना कलात्मक, अशा दुःखान्त नाटकाचा जेवढा क्षोभक प्रभाव पडेल तेवढा शब्दयोजना आणि विचार या बाबतींत अुत्कृष्ट असलेल्या अशा स्वभावनिदर्शक भाषणांच्या गुंफणीचा पडणार नाही.

"तेव्हा कथानक हें नाटकाचें (दुःखान्त) आद्यतत्त्व- अगदी प्राणच- मानलें पाहिजे. स्वभावनिदर्शनाचें स्थान गौणच."

"कवि किंवा निर्माता" हा मुख्यतः कथानकांचा निर्माता असला पाहिजे, पद्यपंक्तीचा नव्हे."

साहित्यामध्ये कथानक आणि स्वभावदर्शन यांचें अन्योन्यमहत्त्व काय असावें याविषयी ॲरिस्टॉटलच्या ज्या कल्पना होत्या त्यांचा अंदाज वरील उताऱ्यांवरून सहज होअील. परंतु मीं वर म्हटल्याप्रमाणे त्याने हें तत्त्व मांडलें तें काव्याच्या स्वरूपाविषयी त्याची दृष्टि सूक्ष्म किंवा खोल जाणारी होती म्हणून नव्हे, किंवा वाङ्मयनिर्मितीविषयक प्रश्नांकडे पाहणारी त्याची विवेचक दृष्टि मूलतःच यथार्थ होती म्हणूनहि नव्हे, तर ज्या वाङ्मयासंबंधी त्याला विवेचन करावें लागलें ते वाङ्मयप्रकार अुघड अुघड कथानकप्रधान होते या योगायोगामुळे. तथापि नाटक (दुःखान्त) किंवा महाकाव्य यांमधील अत्यंत महत्त्वाचें मूलतत्त्व म्हणजे कथानकच या गोष्टीवर त्याने जो भर दिला आहे— कोणत्या का कारणामुळे असेना — तो साहित्यमीमांसेच्या दृष्टीने फार अुपकारक आहे. कारण त्यामुळे साहित्यामध्ये रचनेला (organization) महत्त्व आहे ही गोष्ट ठळकपणें नजरेसमोर येण्याला मदत होते.

ॲरिस्टॉटल् म्हणतो, "कथानक याचा अर्थ मी कथाप्रसंगांची रचना असा करतों." दुःखान्त नाटक किंवा महाकाव्य यांच्या मर्यादित क्षेत्रांत या रचनेच्या तत्त्वावर भर देणें हें त्याच कल्पनेचा- सर्व वाङ्मयकृतींना व्यापील असा- विस्तार करून काव्य किंवा अितर ललितसाहित्यनिर्मितींत घटकतत्त्वांच्या रचनेला श्रेष्ठ महत्त्व आहे हें मान्य करण्यासारखेंच आहे. साहित्य किंवा कलाकृति म्हणवणारें आणि अितर प्रकारचें लेखन यांतला मुख्य फरक हाच की पहिल्या प्रकारामध्ये माध्यम रूपरचनांकित असतें व दुसऱ्यांत नसतें. पहिल्या प्रकारच्या लेखनामध्ये त्याच्या माध्यमाचे निरनिराळे घटक सांधून त्यांची एक स्वयंपूर्ण रचना केलेली असते तर दुसऱ्यामध्ये ते घटक सुटेच मांडलेले असतात. ललितकृतींना अितर लेखनांपासून वेगळें काढण्यांत हा जो रचनागुण, त्याच्या मर्यादेवर आणि मूल्यावरच ललितकृतीच्या अुत्कृष्टत्वाची खरी पारख अवलंबून राहील. ललितकृतींचें अंतिम साध्य जें सौंदर्यदर्शनजन्य समाधान, त्यामध्ये रचनेचें असलेलें महत्त्व ठळकपणें पुढे आणण्याची जी कामगिरी ॲरिस्टॉटलने केली आहे, ती साहित्यमीमांसेच्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे. परंतु ललितवाङ्मयाच्या बाबतींत प्रस्तुत अशी जी ही रचना तिच्या स्वरूपाचें निदान करतांना मात्र त्याची दिशाभूल

झाली, आणि त्याला कारण त्याचे कांहीं तत्त्वज्ञानात्मक पूर्वग्रह, आणि या पूर्वग्रहांपासून उद्-मवलेली वाङ्मयाकडे पाहण्याची मीं वर अुल्लेखिलेली मूलतःच चुकलेली दृष्टि. आणि याचा परिणाम म्हणजे मीमांसाविषयक सिद्धान्तांसंबंधी माजलेला गोंधळ.

वाङ्मयामधील रचनेसंबंधी ॲरिस्टॉटलची जी कल्पना आहे, तिचें स्वरूप काय आहे हें आपण आतां पाहूं. ॲरिस्टॉटलच्या मतें दुखान्त नाटक किंवा कोणतीहि ललितकृति असें आपल्याला म्हणायला हरकत नाही— ही अेक "स्वयंपूर्ण रचनानिर्मिति आहे." यांतील दोन्ही शब्द महत्त्वाचे आहेत. नाटक हें "अेखाद्या संपूर्ण आणि स्वयंपूर्ण घटनेचें प्रतिबिंब असतें..." आणि स्वयंपूर्ण घटना म्हणजे जिला आदि, मध्य आणि अंत असतो अशी घटना." तसेंच महाकाव्याचा विषयसुद्धा "एक आदि-मध्य-अन्तयुक्त संपूर्ण आणि स्वयंपूर्ण अशी घटना असली पाहिजे." ॲरिस्टॉटलने आपल्या दृष्टीसमोर ज्या प्रकारची स्वयंपूर्ण ललितकृति अुभी केली आहे तिच्यामध्ये कशाची रचना केलेली असते याचा विचार तूर्त आपण बाजूला ठेवूं. सध्या आपल्याला अेवढेंच पाहावयाचें आहे की, कशाचीहि रचना करून स्वयंपूर्ण कृति निर्माण केलेली असो, या कृतीचें पृथक्करण केलें तर ती आदि-मध्य-अन्तयुक्त असली पाहिजे अेवढें खास. कोणत्याहि पूर्ण वाङ्मयकृतीमध्ये या तीन अवस्थांचा गोड मिलाफ झाला असला पाहिजे.

पण रचना म्हटली म्हणजे तिच्या मुळाशीं तिच्या वेगवेगळया घटकांना अेकत्र सांधणारें अेखादें तत्त्व असलें पाहिजे. यावरून हें सिद्ध आहे की, कोणत्याहि ललितकृतीला जी अेक-रूपता (unity) येते ती तिच्यांतील आदि-मध्य-अन्त यांना अेकत्र सांधणारें अेखादें तत्त्व असतें म्हणूनच. आता अेखाद्या ललितकृतीपासून जर निःशेष समाधान लाभायला हवें असेल तर अर्थातच हे निबन्धनतत्त्व अेखाद्या आगंतुक घटनेपासून आलेलें असून चालणार नाही, तर त्या स्वयंपूर्ण घटनेच्या स्वभावधर्मांतच त्याचें मूळ असलें पाहिजे. स्वयंपूर्ण रचनेला अेकरूपता येते ती तिच्या मूलभूत स्वयंपूर्ण तत्त्वाच्या आधारावर. अेखाद्या आगंतुक घटनेमुळे नव्हे. ॲरिस्टॉटल-च्याच शब्दांत सांगायचें म्हणजे कथानकाची अेकरूपता म्हणजे कांही लोकांना वाटतें त्याप्रमाणे नायक अेकच असणें ही नव्हे. पण काल-स्थलांची अेकता म्हणजेहि कथानकाची अेकरूपता होत नाही. स्वयंपूर्ण कृतीमध्ये 'तिच्या विविध घटकांची अशी परस्परचना केलेली असते की, त्यांपैकीं अेकाचें स्थलांतर झालें किंवा अेकहि काढला गेला तर सबंध रचना खिळखिळी होते किंवा बिघडून जाते. कारण ज्या घटकाची अुपस्थिति किंवा अनुपस्थिति ही दोन्हीहि जाणवत नाहींत तो घटक त्या रचनेचा अंगरूप भाग केव्हाहि होअूं शकणार नाही. यावरून हें अुघड होअील की स्थल-काल किंवा व्यक्ति यांची अेकता यांच्यापासून कांहीहि अनिवार्य परस्परावलंबिता निष्पन्न होत नाही.

तर मग ललितकृतीला अशी आभ्यंतरिक अंगभूत अेकरूपता देणारें हें तत्त्व कोणतें? आणि आता या ठिकाणीं ॲरिस्टॉटल्च्या संभाव्य किंवा अपरिहार्य अनुक्रमाच्या तत्त्वाचा संबंध येतो. "संभाव्यता किंवा अपरिहार्यता यांसंबंधीच्या नियमांना अनुसरून जें घडणें शक्य असेल" त्यावर कवीची दृष्टि रोंखलेली असते. संभाव्यतेच्या किंवा अपरिहार्यतेच्या नियमानुरूप अमुक अेका स्वभावाची व्यक्ति अमुक अेका प्रसंगीं कशी वागेल किंवा बोलेल हें आपल्या सामान्य अनुभवावरून माहीत असतें. आणि हे सिद्धान्त दृष्टीसमोर ठेवूनच काव्यामधील पात्रांना विशिष्ट स्वभाव व्यंजक नांवें दिलेलीं असतात. प्रासंगिक घटनांवर आधारलेलें (episodic) कथा-नक त्याज्य समजलें गेलें आहे, कारण "अशा कथानकांतल्या प्रासंगिक घटना संभाव्य किंवा अप-रिहार्य अशा अनुक्रमाने बांधल्या गेलेल्या नसतात." पात्रांच्या दैवगतीची अुचनीचता ही "कथा-

नकाच्या अंतर्रचनेंतूनच अुद्‌भवली पाहिजे, कोणतीहि घटना ही पूर्वगामी घटनेची अवश्य किंवा संभाव्य परिणति असली पाहिजे." गुंतागुंत आणि अुलगडा हीं दोन्ही "कथानकांतूनच निघालीं पाहिजेत, अलौकिक-अस्वाभाविक घटनांचा त्यांत हात असतां कामा नये." आणि कथानकामध्ये तर्काला विसंगत असें कांहीहि असतां कामा नये.

वर दिलेले सगळे अुतारे आणि त्यांत आलेलें संभाव्यतेचें तत्त्व या सगळ्यांचा थोडक्यांत सारांश असा देतां येअील. अमुक प्रकारची वस्तुस्थिति स्वभाव किंवा घटना—असली—तर अमुक परिणाम होअील. प्राप्त परिस्थिति आणि तीपासून निष्पन्न होणारे परिणाम यांचा संबंध जोडणाऱ्या संभाव्यतेच्या प्रमाणावर सर्व भिस्त असते. ललितकृति कोणतीहि असो, तिच्यांतील घटक जर या संभाव्य अनुक्रमाच्या नात्याने बांधले गेले नसतील तर ती ललितकृति समाधान देअू शकणार नाही. कारण तिच्यामध्ये कोणतेंहि असें तत्त्व नाहीं की ज्याच्या बळावर हे घटक परस्परांशीं अवश्यमेव सांधले जातील. अमुक घटना प्रत्यक्ष घडल्या आहेत म्हणून त्या वापरल्या आहेत असा युक्तिवाद करून चालणार नाही. कारण प्रत्यक्ष घटना किंवा 'शक्य पण असंभाव्य' गोष्टी यांपेक्षा 'अशक्य पण संभवनीय' गोष्टी यांचें कवीच्या दृष्टीने जास्त महत्त्व असतें. कारण पहिली घटना बुद्धीला पटत नाही पण दुसरी पटते.

वर जें ॲरिस्टॉटलच्या मताचें अगदी स्थूल आणि संक्षिप्त दिग्दर्शन केलें आहे 'त्यावरूनसुद्धा वाचकांच्या हें लक्षांत आलें असेल की वाङ्मयाला युक्त (appropriate) असलेल्या घटनाप्रकारासंबंधीची (type of organization) त्याची कल्पना तर्कशास्त्रीय विचारसरणीने भारलेली आहे. त्याच्या मतें वाङ्मयीन घटना (organization) ही अंतर्यामीं तार्किकच घटना आहे. आणि या घटनेचें निबंधन-तत्त्व जी संभाव्यता तिचीहि सगळी भिस्त तार्किक अनिवार्यतेवर आहे. ॲरिस्टॉटलचें मत विशद करतांना बुचर म्हणतो, "काव्यान्तर्गत अनुक्रम हा प्रत्यक्षानुभूत घटनांचा अनुक्रम नसून तर्कानुमेय तात्त्विक कल्पनांचा अनुक्रम असतो; आणि त्यांतून आगंतुक गोष्टी वगळून टाकून स्वभाव आणि प्रसंगघटना यांत अंतर्भूत असलेली एकता आणि अर्थवत्ता व्यक्त करून दाखविलेली असते." तसेंच ॲरिस्टॉटलच्या दुःखान्त नाटकविषयक सिद्धान्ताला व्यापणारी जी अपरिहार्यतेची कल्पना आहे ती अपरिहार्यताहि तार्किक आणि तात्त्विक स्वरूपाची आहे. तेव्हा या प्रकरणीं ॲरिस्टॉटलने अवलंबलेली दृष्टिहि मुळांतच तर्कशास्त्रवेत्त्याची आहे, सौंदर्यमीमांसकाची नाही. अेखादी कृति सौंदर्यदृष्ट्या समाधानकारक व्हायला हवी असेल तर तिच्या ठिकाणीं सौंदर्याचा प्रत्यय येण्याला कोणते संकेत पाळले पाहिजेत, याचें संशोधन करीत असतांना ॲरिस्टॉटल आपल्या नैयायिक पूर्वग्रहांना बेसावधपणें बळी पडला आणि त्याने जो नियम शोधून काढला तो अेखादी कृति तर्कदृष्ट्या समाधानकारक व्हावी यासाठी अवश्य असणारा असा.

अरिस्टॉटलच्या मनावर तर्काचें कसें दडपण पडतें या गोष्टीवर अल्पसा पण मजेदार आणि अुद्बोधक प्रकाश पाडणारी अेक गोष्ट त्याच्या काव्यमीमांसा या ग्रंथांत आढळून येते. अुदाहरणार्थ, तो म्हणतो, "योग्य रीतीने खोटें बोलणें हें कवीचें कर्तव्य आहे," आणि तें त्यानें केलेंच पाहिजे. या कलेचा परात्पर गुरु म्हणजे होमर या कलेचें मर्म अेकप्रकारच्या हेत्वाभासांत आहे. तें असें की आधी अेक संकेतार्थी विधान करून त्याच्या आधारावर पुढील विधान अनुमानावयाचें. गृहीत तत्त्वाच्या सत्यासत्यतेविषयीं नैयायिकाला कांही परवा नसते. त्यापासून निघणारें अनुमान तर्कशुद्ध असलें म्हणजे झालें. अशा रीतीने ॲरिस्टॉटलने सूचित केलेली आणि त्याच्यानंतरच्या टीकाकारांनी पावन केलेली ही न्यायनिष्ठ दृष्टि अद्यापपर्यन्त आपल्या चिकि-

त्मक बुद्धीला व्यापून कलुषित करीत आहे, आणि त्याचें संभाव्यतेचें किंवा तार्किक अनिवार्यतेचें तत्त्वहि साहित्यमीमांसेमध्ये आपल्या योग्यतेपेक्षा अधिक श्रेष्ठ आसन बळकावून बसलें आहे.

वाङ्मयाला लागू करण्यासाठी ॲरिस्टॉटलने प्रतिपादलेलें हें संभाव्यतेचें तत्त्व मुळीं अर्थशून्य आणि अप्रस्तुत आहे; व्यापक आणि संकुचित अशा दोन्ही दृष्टींनी तें सदोष आहे. पहिली गोष्ट म्हणजे 'अशक्य पण संभाव्य' आणि 'शक्य पण असंभाव्य' या दोहोंमध्ये तो जो भेद दाखवतो तो तत्त्वतः कोणत्याहि बुद्धिगम्य विश्लेषणामध्ये टिकाव धरूं शकणार नाही.

ऐखादी गोष्ट घडून येण्याला वस्तुधर्मानुसार कांही प्रत्यवाय नसेल तर ती गोष्ट घडणें शक्य आहे असें म्हणतां येईल; असा प्रत्यवाय असेल तर ती आपण अशक्य मानतों. पण 'संभाव्य' आणि 'असंभाव्य' यांमध्ये असा विरोध नाही. मूळ ऐकाच प्रक्रियेच्या सामर्थ्याच्या प्रमाणांतील भिन्नतेचीं तीं निदर्शक आहेत. ऐखाद्या घटनेमागील वस्तुजाताचें आणि त्याच्या प्रक्रियेचें आपल्याला जें ज्ञान असेल त्याच्या बळावर जर आपल्याला ती गोष्ट बहुधा घडेल असें वाटलें तर आपण तिला 'संभाव्य' म्हणतों; त्याच ज्ञानाच्या बळावर जर आपल्याला वाटलें की अमुक गोष्ट बहुधा घडणार नाही तर आपण तिला 'असंभाव्य' म्हणतों. आणि हीं दोन्ही अनुमानें भावरूप (positive) आहेत, आणि विशिष्ट कालीं विशिष्ट वस्तुजाताचे कोणते घटक कार्यव्यापृत आहेत यासंबंधीं आपलें जें ज्ञान त्यावर तीं अवलंबून असतात. पण वस्तुजाताचे सर्वच घटक सर्व काल कार्यव्यापृत असतात. परंतु आपली बुद्धि मर्यादित असल्यामुळे आपल्याला ह्या सर्वांचें ज्ञान होणें शक्य नसतें म्हणून आपलीं सर्वच अनुमानें खरोखर 'संभाव्य' याच सदरांत येतात. कांही कमी कांही अधिक ऐवढेंच. अर्थात ऐखादी गोष्ट कमी किंवा अधिक प्रमाणांत संभाव्य आहे असें मानलें म्हणजे ती शक्य आहे हें क्रमाने आलेंच. आणि जी गोष्ट अशक्यच आहे— म्हणजे वस्तुधर्मच जिच्या निष्पत्तीच्या आड येतो—ती केव्हाहि संभाव्य होणार नाही. तेव्हा 'अशक्य पण संभाव्य' ही कल्पना अनाकलनीय आहे; 'अशक्य आणि असंभाव्य' ही कल्पना आकलनीय आहे पण ती निरुपयोगी आहे; कारण जी गोष्ट अशक्यच आहे ती घडण्याचा संभव नाही ऐतकेंच नाही तर ती घडणारच नाही. 'अशक्य पण संभाव्य' घटनांसंबंधीं बोलणें म्हणजे वस्तुजाताचें नियमन करणारें त्याच्या स्वभावधर्माखेरीज़ दुसरें कोणीतरी आहे हें अप्रत्यक्षपणें कबूल करण्यासारखें आहे.

उलटपक्षीं ज्या अर्थी वस्तुजात हें स्वनियत (Self-determined) आहे त्या अर्थी जें जें कांही शक्य आहे तें तें अपरिहार्य आहे, तें अवश्यंभावि आहे, त्या ठिकाणीं संभाव्य आणि असंभाव्य हा वर्गविभाग अप्रस्तुत आहे. अशा रीतीने ॲरिस्टॉटलपुढे ऐक शृंगापत्ति उभी राहते. ऐक तर त्याने कार्यकारणतत्त्व (postulate of causality)— जें वस्तुनिष्ठ नियतीचें दृश्यरूप आहे— टाकून द्यावें आणि मग शक्य घटनांसंबंधींच बोलावें कारण मग अशक्य किंवा संभाव्य असें कांही राहणारच नाही; किंवा त्याने कार्यकारणतत्त्वाला चिकटून राहावें आणि संभाव्य घटनांसंबंधींच बोलावें, कारण जें संभाव्य आहे तें शक्य असलेंच पाहिजे. ऐक तर त्याने कार्यकारणतत्त्वाकडे पाठ फिरवून निसर्गाच्या किंवा वस्तुजाताच्या ठिकाणीं 'शक्य पण असंभाव्य' घटना असतात हें मान्य करावें आणि कवीला अशा प्रकारच्या घटना घेण्याचें टाळून 'शक्य आणि संभाव्य' किंबहुना 'अशक्य पण संभाव्य' घटनाच आपल्या काव्यांत वापरावयास सांगावें, किंवा त्याला जर वस्तुजातांतील घटनांमागील नियतीच्या कल्पनेला चिकटून राहावयाचें असेल तर त्याने वस्तुसृष्टींतील सत्य आणि काव्यसृष्टींतील सत्य यांत भेद करणें

टाकून दिलें पाहिजे. तेव्हा ॲरिस्टॉटलला आपल्या काव्यमीमांसेचा बचाव करायचा असेल तर त्याला आपल्या तत्त्वज्ञानाची किंमत दिली पाहिजे.

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने जर पाहिलें, तर शक्याशक्यतेच्या आणि संभाव्यासंभाव्यतेच्या आपल्या कल्पना मुळांत सत्तत्त्वा-संबंधीच्या आपल्या अेकाच प्रकारच्या आणि अेकाच मर्यादेपर्यंतच्या ज्ञानावर आधारलेल्या असतात. आणि त्यामुळे त्यांची अदलाबदहि करतां येते म्हणजे सत्तत्त्वासंबंधींचें ज्या प्रकारचें आणि ज्या मर्यादेपर्यंतचें आपलें ज्ञान आपल्याला अेखादी घटना शक्य किंवा अशक्य आहे हें सांगतें तेंच ज्ञान आपल्याला ती घटना संभाव्य आहे कीं असंभाव्य हेंहि सांगूं शकतें. तसेंच मूलरूप सत्तत्त्व आणि कार्यव्याप्त सत्तत्त्व असा भेद करणें हेंहि न्यायाला धरून होणार नाही.

आता यावर कदाचित् कोणी असें म्हणेल की, 'अशक्य पण संभाव्य' आणि 'शक्य पण असंभाव्य' यांतला भेद तत्त्वमीमांसेला जरी मान्य नसला तरी ही कल्पना या साहित्य-मीमांसेला अुपयुक्त ठरणें शक्य आहे. वाङ्मयाच्या अेका विशिष्ट प्रकाराला म्हणजे दुःखान्त नाटकाला अुद्देशून या नियमाची मांडणी कशी केली गेली हें आपण पाहिलें आहे. आटपशीर सांकेतिक भाषेंत ही कल्पना मांडायची झाली तर अशी मांडतां येअील. अेखाद्या वाङ्मय-कृतींतील सर्व व्यक्तींचा समुदाय हा "अ", घटनांचा समुदाय "ब", आणि "क" हा शेवट असें मानलें तर अ × ब = क असें समीकरण होअील.

आणि अशी मांडणी केली असतां हें समीकरण अगदी समाधानकारक असल्यासारखें दिसतें. पण जर अधिक सूक्ष्म निरीक्षण केलें तर आपल्याला असें दिसून येअील की हें सगळें विधान अर्थशून्य असून त्यामध्ये वाङ्मयकृतीच्या रसग्रहणाच्या प्रक्रियेसंबंधाचें अज्ञान व्यक्त झालें आहे. प्रत्यक्ष जीवनांत अनुभव कसाहि येत असला तरी नाटकांत किंवा गोष्टीमध्ये व्यक्तिहि ह्या कथानकांतून प्रकट होत असतात. लेखक आधी आपल्यापुढे अेखादी व्यक्ति सबंध अुभी करून मग त्याच्यासंबंधीचे प्रसंग सांगतो असें नाही, तर विविध प्रसंगांच्या अनुरोधाने त्या त्या व्यक्तीचें चित्र आपल्या मनामध्ये रचलें जातें. व्यक्ति ही अेक गृहीत वस्तु नसून अनुमान्यजन्य आहे. वास्तविक ही गोष्ट अगदी अुघड आहे; परंतु C. W. Richward यांनी The Calender of Modern Letters च्या अेका अंकामध्ये कथा या वाङ्मय-प्रकारासंबंधीं लिहिलेलें अेक टांचण माझ्या दृष्टीस पडेपर्यंत ही गोष्ट कोणाहि टीकाकाराने लक्ष्यांत घेतलेली मला आढळली नव्हती. तो म्हणतो :

तेव्हा जीवशास्त्राच्या परिभाषेंत बोलायचें म्हणजे व्यक्ति ही वस्तुतः कादंबरीचा अेक अुद्गामी धर्म आहे (emergent quality). भाषेच्या किंवा वाणीच्या रचनेंतून कथा निष्पन्न होते आणि या कथेंतून व्यक्ति प्रकट होते.

याचा अर्थ असा होतो की, वर ज्याला आपण "अ" म्हटलें आणि जो ॲरि-स्टॉटलच्या "संभाव्य आणि अपरिहार्य अनुक्रमा"च्या तत्त्वाप्रमाणे "क" चा निर्णायक घटक असायलाच पाहिजे तो तसा तर नाहीच, अुलट त्याला स्वतःच्याच स्वरूपनिर्णयासाठी "क" वर अवलंबून राहावें लागतें. "अ" हा "संभाव्य आणि अपरिहार्य अनुक्रमा"ला अनुसरून "क"पर्यंत येअून पोचला कीं नाही हें आपण सांगूं शकणार नाहीं, कारण "क"चें स्वरूप काय आहे हें कळेपर्यंत आपल्याला "अ" संबंधी पूर्ण ज्ञान होणारच नाही. "अ" मध्ये "क" चा अंतर्भाव होतो असें केवळ नाही तर "क" हा असें स्वरूप निश्चित ठरवतो. "अ" आणि "क" यांचे परस्परसंबंध योग्य रीतीने स्पष्ट झाले म्हणजे "संभाव्य आणि अपरिहार्य

अनुक्रमा"च्या तत्त्वाचा पोकळपणा आणि अर्थशून्यता तावडतोब उघडकीला येतात. "क"च्या अनुरोधानेच "अ"चा अर्थ लावणें आपल्याला भाग असल्यामुळे अेकदा आपल्याला हवा तसा "अ" निर्माण केला म्हणजे कोणताहि अनुक्रम अगदी संभाव्यतेच्या तत्त्वाला अनुसरूनच "क"कडे गेला आहे हें सिद्ध करून दाखवतां येअील. अुलटपक्षीं आपण जर असा हट्ट धरण्याचें धैर्य दाखवलें की "अ"चें चित्र रंगवितांना "क"चा विचार सुद्धा मनांत येअूं द्यावयाचा नाही तर अगदीं अेखादा नैयायिकाग्रणी किंवा प्रत्यक्ष ॲरिस्टॉटल जरी आला तरी त्याला सुद्धा अमुक अेक अनुक्रमच संभाव्यतेच्या तत्त्वाला अनुसरणारा होअील असें सिद्ध करून दाखवतां येणार नाही.

मीं वरती जें मत प्रदिपादिलें आहे त्याच्या खरेपणासंबंधीं जर कोणाला संशय वाटत असेल तर त्याने आपल्या मनाशीं आपल्या ईडिपस, लिअर आणि फाउस्ट या पात्रासंबंधींच्या कल्पनांचें परीक्षण करून पाहावें, आणि त्या त्या कल्पना तयार होतांना त्या त्या कथानकाचें पर्यवसान किंवा उत्कर्षस्थल यांचें किती साहाय्य झालें आहे हें मनाशींच ठरवावें. त्यानंतर आपल्या कल्पनाशक्तीस चांगला ताण देअून पात्रासंबंधीच्या कल्पनेंतून पर्यवसानाचा विचार दूर करावा. तसेंच ती कल्पना तयार होतांना पर्यवसानाचें जें साहाय्य झालें असेल तेंहि काढून टाकावें आणि मग विचार करून पाहावा की तितक्याच थोर योग्यतेचा दुसरा अेखादा लेखक असता तर त्याला त्याच प्रसंगानुक्रमाला धरून, तितक्याच अपरिहार्यपणें, अगदी निराळें असें पर्यवसान करून दाखवतां आलें असतें कीं नाही.

थोडक्यांत म्हणजे आपण जी अेक गोष्ट सदोदित लक्ष्यांत ठेवली पाहिजे ती ही की, ॲरिस्टॉटलच्या संभाव्यतेच्या तत्त्वाला आरंभींच स्पष्ट निर्गित झालेल्या पात्रांची अपेक्षा असते. परंतु ही अट पुरी होणें स्वभावतःच अशक्य आहे. कारण ज्या परिस्थितींत आणि ज्या घटकेला अमुक ज्ञानसंचय असावा अशी या तत्त्वाची अपेक्षा असते त्या परिस्थितींत आणि त्या घटकेला तशी अपेक्षा करण्याचा त्याला कांही अधिकार नाही.

वस्तुस्थिति अशी आहे की उद्गामी (inductive) तर्कशास्त्राची संभाव्यतेसंबंधीची आज जी कल्पना आहे ती ॲरिस्टॉटलला मुळीच नव्हती. त्याच्या मताप्रमाणे (कथानकाचे) आदि-मध्य-अंत यांना बांधणारा जो अपरिहार्यताधर्म तो त्रिपदात्मक तर्कपद्धतींत अंतर्भूत होणारा तोच. पहिलीं दोन पदें दिलीं की तिसरें आलेंच पाहिजे. या अपरिहार्यतेचें तार्किक मूल्य हेंच आहे.

सत्यान्वेषणामध्ये गुंगून गेल्यामुळे—अजाणतेपणाने कां होअीना पण—तो वाङ्मयविषयक प्रश्नांचा विचार करतांना तर्कशास्त्राच्या चाकोरींत घसरला हें तर खरेंच पण अेरव्ही देखील तर्काच्या चष्म्यांतून वाङ्मयाकडे पाहण्याचा मोह त्याला कां पडावा आणि त्याच्या नंतरच्या मीमांसकांनीहि त्याच चष्म्याला कां चिकटून राहावें हें कळणें फारसें कठिण नाही. अनुभवांची भावात्मक संघटना म्हणजे साहित्य, विचार, क्रिया, घटना, प्रसंग आणि अनुभवांचे विविध आणि असंख्य प्रकार साहित्यामध्यें अुपयोगांत आणले जातात ते केवळ त्यांच्या भावजनन सामर्थ्यामुळे; भावानुभूतीच्या आधारामध्ये ते परिणत होतात म्हणून. बुचर म्हणतो "म्हणून, क्रियारूपांत व्यक्त झालेला भाव किंवा इच्छाशक्ति म्हणजेच नाटक", आणि साहित्याचे विविध प्रकार या भावात्मक संघटनेच्या अभिव्यक्तीच्या साधनांच्या किंवा पद्धतीच्या विविधतेमुळे

निर्माण होतात--म्हणजे अभिनय आणि शब्द यांच्या साहाय्याने ही अभिव्यक्ति करायची कीं नुसत्या शब्दांच्या साहाय्यानेच; शब्दांची रचना विशिष्ट नियमांनी बांधली गेली आहे किंवा नाहीं अि.

आता ज्या अर्थी हे अनुभव आणि हे भाव अेका किंवा अधिक माणसांचे अनुभव किंवा भाव असतात, आणि ज्या अर्थी मनुष्य हा सामान्यतः विचारशील प्राणी समजला जातो, त्या अर्थी होतें असें की सामान्यतः भावसंघटना ही अेकप्रकारच्या अंतर्गत विचारात्मक प्रक्रियेशीं समांतर अशी त्याच्या मनांत वसत असते. या दोन प्रक्रिया अेकाच वेळीं आणि अेकाच ठिकाणीं वसत असल्यामुळे अेकीचें निबंधनसूत्र तेंच दुसरीचें असावें असें अनुमान काढण्याचा मोह होतो. परंतु यामुळे ॲरिस्टॉटलची फसगत व्हावी हें जरा चमत्कारिकच नव्हे तर थोडेंसें आश्चर्यजनकहि आहे. कारण आरंभींच त्याने साहित्य आणि संगीत-नृत्य यांसारख्य अितर ललितकला यांची संगति लावून साहित्यनिर्मितीचा कलात्मक निर्मितीशीं असा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे की ज्यामुळे ललितसाहित्याची ललितकलेचाच अेक विशिष्ट प्रकार म्हणून गणना किंवा मीमांसा करतां यावी. आणि संघटनेचें महत्त्व वाङ्मयांत जितकें तितकेंच अितर कलांतहि आहे; आणि तिचें खरें स्वरूप त्या कलांतच अधिक स्पष्टपणें प्रत्ययाला येतें; याची ॲरिस्टॉटलला जाणीव झाली नव्हती असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण तो म्हणतो की "नुसत्या खडूने काढलेल्या अेखाद्या चित्राच्या बाह्याकृतीनेसुद्धा जितका आनंद होअील तितका कांही अगदी अुत्कृष्ट रंग घेअून ते वाटेल तसे लिंपण्याने होणार नाही." पण यांत जी कल्पना सूचित केली गेली आहे तिचा मागोवा घेतला गेला नाही, तसेंच साहित्यावरं प्रकाश पाडण्याच्या दृष्टीनें अितर कलांच्या विवेचनाचा अुपयोग झाला असता पण तें विवेचनहि नेटाने केलें गेलें नाही.

त्याने जर ही गोष्ट केली असती, आणि अितर ललितकलाकृतींमध्ये असणारी आणि सौंदर्य आणि तज्जन्य आनंद यांचा वास्तव आधार अशी जी संघटना ती कोणत्या तत्त्वांवर अधिष्ठित झालेली असते याचा अधिक खोल विचार केला असता तर त्याला साहित्याची पारख करण्यासाठी संभाव्यतेची आणि तर्कनिष्ठ अपरिहार्यतेची कसोटी लावणें किती चुकीचें आहे हें कळून आलें असते. दुसरी गोष्ट अशी की ॲरिस्टॉटल हा नाटक या वाङ्मयप्रकाराचा विचार करीत होता. आता नाटक किंवा सामान्यतः साहित्य यांमधली जी संघटना– (विचार–क्षेत्रामधली जी तर्करूप संघटना तिचें भावक्षेत्रांतील प्रतिरूप अशी)– तिच्यामध्ये स्वभावतः असें कांही नाही की ज्यामुळे ती कलादृष्ट्या किंवा काव्यदृष्ट्या आनंददायक होअू नये. अेकच संघटना अेकाच वेळीं तर्कात्मक आणि सौंदर्यात्मक असूं शकेल; पण ती तशी असलीच पाहिजे असें मात्र नाही. आणि ही गोष्ट ॲरिस्टॉटलला अधिकच स्पष्टपणें जाणवायला हवी होती. कारण त्याच्या चर्चेचा विषय नाटक हा साहित्यप्रकार होता. सहजप्रवृत्तिजन्य क्रियांच्या संयोगांमधून नाटक (नाटकानुकूल प्रसंग) जितके वेळां निर्माण होतें तितकें तें तर्कनिष्ठ विचार-प्रेरित क्रियांच्या संयोगांमधून होत नाही. म्हणूनच न्यूयॉर्क शहराच्या दाटलेल्या रस्त्यांपेक्षा-सुद्धा आफ्रिकेच्या अरण्यांत नाटकानुकूल प्रसंग अधिक आढळतात; आणि मनुष्याच्या क्रियांच्या नियंत्रणामुळे विचारशक्तीचें जें नतोन्नत स्थान असेल त्याच्या अनुरोधाने नाटकाच्या ऱ्हासाचा अितिहास लिहिणें शक्य आहे.

संघटनांचे प्रकार पुष्कळ आहेत. परंतु प्रस्तुत विषयाच्या चर्चेला अनुसरून त्यांचें खालीलप्रमाणे वर्गीकरण करूं:--




व्यवहारपर संघटनेचें अुद्दिष्ट तिच्याबाहेर असतें. या प्रकारच्या संघटनेसंबंधीं मीं मागच्या निबंधांत विवेचन केलें आहे, आणि सौंदर्यात्मक संघटनेशीं तिचा विरोध दर्शविण्यासाठी मीं तिला त्या वेळीं अ-सौंदर्यात्मक (सौंदर्येतर) असें नांव दिलें आहे. अ-व्यवहारपर संघटनेचें अिष्ट साध्य हें त्या संघटनेमध्येंच असतें. तिचें अिष्टसाध्य "सत्य" असेल तर संघटना तर्कात्मक होअील; तें जर "सौंदर्य" असेल तर ती सौंदर्यात्मक होअील. तर्कात्मक संघटनेंतील घटकांना तर्कशास्त्राच्या नियमांनुसार वैचारिक पूर्णता दिली जाते; सौंदर्यात्मक संघटनेंतील विविध घटक सौंदर्यनिर्मितीच्या नियमांनी बांधले गेलेले असतात. गणितशास्त्रविषयक किंवा तत्त्वमीमांसाविषयक अेखादा प्रबंध हा तर्कात्मक संघटनेचा अेक अत्यंत जटिल असा नमुना होअूं शकेल; आणि अेखादें त्रिपदघटित विधान हा त्याच संघटनेचा अत्यंत साधा नमुना होअील; बीटहोफनर्निर्मित स्वरसंयुति ही सौंदर्यात्मक संघटनेचा अत्यंत संश्लिष्ट नमुना होअील आणि अेखादा विशिष्ट स्वरक्रम हा त्याच संघटनेचा साधा नमुना होअील. तर्कात्मक संघटनेचें अंतिम अधिष्ठान– मग ती संघटना साधी असो की संश्लिष्ट– म्हणजे विचारविषयक नियम. परंतु कोणतेहि विचारविषयक नियम आपल्याला सौंदर्यात्मक संघटनेचा मार्ग दाखवूं शकणार नाहीत.

अेखाद्या चित्रकाराने आपल्या कॅन्व्हसवर अेक हिरव्या रंगाचा ठिपका दिला, किंवा अेखाद्या वाद्यनिपुणाने आपल्या वाद्यावर अेखादा स्वर छेडला, तर मोठ्यांतल्या मोठा नैयायिक सुद्धा हिरव्याच्या शेजारीं अमुकच रंग किंवा अमुक स्वराच्या मागोमाग अमुकच स्वर आला पाहिजे असें सांगूं शकणार नाही. तर्काचे कोणतेहि नियम या गोष्टीचा निर्णय करूं शकणार नाहीत. या क्षेत्रांमधील निर्णयाचे अंतिम सर्वाधिकार सौंदर्यानुभूतींत प्रतीत होणाऱ्या आणि सौंदर्यानुभूतींतून प्रकट होणाऱ्या सौंदर्यविषयक नियमांकडे आहेत. या सौंदर्यविषयक नियमांपैकी कांही, विरोध, संगति, समतोलपणा, लयबद्धता हे आहेत. या नियमांचें सविस्तर किंवा चिकित्सापूर्ण विवेचन या निबंधाच्या कक्षेंत येत नाही. मला जो मुद्दा मांडावयाचा आहे तो हा की सौंदर्यात्मक संघटनेचें मूलभूत आणि अंतिम नियंत्रण या नियमांनुसार होतें. तिचा आनंद देण्याचा गुणहि या नियमांवरच अवलंबून असतो, तर्कशास्त्राच्या नियमांवर नाही. सौंदर्यात्मक कलाकृतीची युक्तता ही तिच्यांतील घटकांची सौंदर्याच्या नियमांनुसार रचना करण्यावर अवलंबून असते. तर्कपद्धतींतील सुसंगतता साधल्याने येणारी युक्तता ती ही नव्हे.

आता अर्थात् नियम म्हटले की अपरिहार्यता आलीच. जेव्हा अेखादी कृति नियमांवर आधारली जाते तेव्हा साहजिकच तिचें स्वरूपहि निश्चित केलें जातें. हा नियम जर तर्कशास्त्रीय असेल तर ही अपरिहार्यताहि तर्कनिष्ठ असेल. हा नियम जर सौंदर्यविषयक असेल तर ही अपरिहार्यताहि सौंदर्यात्मकच असेल. म्हणजे ज्या संघटनांचें महत्त्व त्यांच्या सौंदर्यामुळे असतें– म्हणजे ज्या ललितकलाकृति असतात– त्यांचें नियमन करणारी जी अपरिहार्यता ती सौंदर्यात्मक

असते. ॲरिस्टॉटलला किंवा निसर्गवादी मीमांसकांना वाटते त्याप्रमाणे तर्कशास्त्रीय नसते; तशीच सूर्‌रिअलिस्टांना वाटतेशी दिसते त्याप्रमाणे मानसशास्त्रीयहि नसते, तर ती सौंदर्यात्मकच असते; अर्थात् तर्कशास्त्रीय किंवा मानसशास्त्रीय नियम ती अगदी वर्ज्य मानते असें मात्र नव्हे.

पुन्हा आपण आता ॲरिस्टॉटलच्या संभाव्यतेच्या किंवा अपरिहार्यतेच्या तत्त्वाकडे आलों. ज्या अर्थी काव्य किंवा साहित्य हें संगीत चित्र आणि नृत्य यांप्रमाणेच अेक ललित-कला आहे ही भूमिका त्याने मान्य केली आहे, त्या अर्थी साहित्यकृति, संगीत, चित्र आणि नृत्य या सगळ्यांकडे सौंदर्यात्मक संघटनाकृति म्हणून पाहण्याला तो बांधला गेला आहे हें अुघड आहे. पण जर या सगळ्या संघटना सौंदर्यात्मक संघ असतील तर त्या सर्वांना सौंदर्यात्मकता देणारें तत्त्व त्या सर्वांमध्यें सामान्यत्वाने असलें पाहिजे. अेखादी साहित्य-कृति जर सौंदर्यात्मक संघटना व्हायला हवी असेल तर ती, ज्या गुणामुळे गीत, चित्र किंवा नृत्य सौंदर्यात्मक होअूं शकेल त्याच गुणामुळे होअूं शकेल तदितर गुणामुळे होअूं शकणार नाही. ज्या अर्थी गीत-चित्र-नृत्यादि कृतींना सौंदर्यात्मकत्व देणारा व्यवच्छेदक धर्म त्यांचें नियंत्रण करणाऱ्या सौंदर्यात्मक अपरिहार्यतेच्या ठिकाणींच असतो, त्या अर्थी अेखाद्या वाङ्मयात्मक कृतीला ललितकृतीची पदवी प्राप्त करून घेण्याची आकांक्षा असेल तर तिचा अंतिम सम-निर्णय सौंदर्यात्मक अपरिहार्यतेनेच केला पाहिजे, अितरांनी करून चालणार नाही.

वाङ्मयीन अुत्कृष्टत्वाची कसोटीहि या अपरिहार्यतेंतून निघाली पाहिजे. या अपरिहार्यतेचा नियम अेखाद्या कृतींत ज्या मानाने कमीअधिक पाळला गेला असेल त्या मानाने तिच्या लालित्याचें कमीअधिक मूल्य ठरवलें गेलें पाहिजे, दुसऱ्या कसोटीने तें ठरतां कामा नये. थोडेंसें पुढे जाऊन असेंहि म्हणतां येअील की, तर्कनिष्ठ विचार-सरणीच्या नियमांवर आक्रमण करून किंवा तर्कशास्त्रीय अपरिहार्यता झुगारून देअूनसुद्धा अेखादी वाङ्मयीन कृति पूर्ण सौंदर्यात्मक आनंद देअूं शकेल. पण ही आत्यंतिक भूमिका मान्य केली नाही तरी असें मात्र म्हणतां येणार नाही की, सौंदर्यात्मक अपरिहार्यता ही तर्कात्मक अपरिहार्यतेची अेक केवळ दुसरी बाजू आहे; कारण वर आपण पाहिलेंच आहे की वाङ्मयाच्या क्षेत्रांत संघटनातत्त्व म्हणून तर्कशास्त्रीय अपरिहार्यतेला कांहीं अर्थ नाही, कारण कोणतीहि गोष्ट तर्कदृष्ट्या अपरिहार्य आहे असें दाखवणें शक्य आहे, तसेंच अमुक गोष्ट अपरिहार्य असलीच पाहिजे असें नाही असेंहि दाखवणें शक्य आहे.

सारांश, ज्या तर्कशास्त्रीय अपरिहार्यतेच्या तत्त्वावर ॲरिस्टॉटलने आपला संभाव्य आणि अपरिहार्य अनुक्रमाचा नियम बसविला आहे ती तर्कशास्त्रीय अपरिहार्यता साहित्यमीमांसेचे नियम ठरवण्याच्या कामीं अर्थशून्य आणि अप्रस्तुत आहे असें सिद्ध होतें.

मीं वर म्हटलेंच आहे की, वाङ्मयीन कृतीला युक्त असा जो संघटना विशेष त्यासंबंधीं ॲरिस्टॉटलची गैरसमजूत होण्याचें बव्हंश कारण म्हणजे त्याच्या पुढे असलेल्या वाङ्मयीन माध्यमाचें स्वरूप. मी येथे पुन्हा हेंहि मान्य करतों की मीं वर जें विवेचन केलें आहे त्यामुळे आपल्या टीकात्मक निर्णयांच्या मांडणीमध्यें प्रत्यक्ष फरक पडेल असें नाही; आणि या माझ्या मान्यतेचा आधारदेखील वाङ्मयीन माध्यमाचें हें स्वरूपच. परंतु वाङ्मयीन कृतीच्या अंतरंगांतून तिच्या सौंदर्यात्मक स्वरूपाचें त्याने निरीक्षण केलें असतें तर त्याने दुःखभागी नायक, आक-स्मिकता आणि शुद्धीकरण यांसंबंधीं जें जें कांहीं म्हटलें आहे त्या सगळ्यांचा समावेश काव्यासंबंधीच्या अेखाद्या अधिक व्यापक मीमांसेमध्ये केला असता.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्रांतील जानपद ओवी



(लेखांक ३ रा)

(लेखिका — कु. अनसूया भागवत)

विषयानुरूप पाडलेल्या जानपद ओव्यांच्या चार प्रमुख विभागांपैकी पुराणकथाविषयक ओव्या मागील दोन लेखांत दिल्या. या लेखांत दुसऱ्या विभागांतील ओव्या देत आहे. या विभागांत संतकालीन भक्तिमार्गाचा परिणाम होऊन रचल्या गेलेल्या सर्व ओव्या येतात. पुराण-विषयक ओव्यांपेक्षाहि या भक्तिप्रचुर ओव्या स्त्रीवर्गाच्या मुखीं अधिक प्रमाणांत आढळतात.

**संतकालीन भक्तिप्रचुर ओव्याः--**

पंढरपूरच्या भक्तिपंथाचा आरंभ केव्हा झाला हें अजून निश्चित अुपलब्ध झालेलें नाही. तेराव्या शतकांत ज्ञानेश्वरप्रभृति संतमंडळींचें पृथ्वीवर आगमन होण्यापूर्वीपासूनच पंढरपूरचें विठ्ठलमंदिर अस्तित्वांत आहे व ११९५ मध्ये या मंदिराचा जीर्णोद्धार करण्यास भाविकांनी प्रारंभ केला होता ही गोष्ट मात्र सिद्ध झालेली आहे. परंतु पंढरपूरक्षेत्राचा व त्याबरोबर भागवतधर्म व भक्तिमार्ग यांचा महिमा वाढवून त्यांचा प्रचार सर्वत्र करण्याचें मुख्य श्रेय ज्ञानेश्वर, नामदेव व त्यांच्यानंतर अेकनाथ-तुकारामादि संतकवींनाच आहे. आपल्या तत्त्वांचा प्रचार समाजाच्या कानाकोपऱ्यांतून करण्याकरिताच ज्ञानेश्वरादि संतकवींनी आपल्या ग्रंथांस सहजसुलभ व लोकप्रिय ओवीछंदाचें साहाय्य कसें घेतलें असावें हें आपण मागेच पाहिलें. अर्थात् ओवीबद्ध ग्रंथांकरवीं संतकवींनी केलेल्या जोराच्या प्रचारानंतर भक्तिमार्गाची ही लाट श्रीमंतांपासून गरीबांपर्यंत, सुशिक्षितांपासून अशिक्षितांपर्यंत सर्वत्र अुसळली. स्त्रीवर्गाचीं भावनाशील हृदयें या लाटेने काबीज केलीं असल्यास कांहीच नवल नाही. त्यांतून भक्तिमार्गाचा प्रसार करणाऱ्या मंडळींत मुक्ताबाअी, जनाबाअी यांसारख्या संतकवयत्रीहि होत्या ही गोष्ट भक्तिमार्गाचा प्रभाव स्त्रियांवर जास्तच करण्यास कारणीभूत झाली असावी.

तेराव्या शतकांत ज्ञानेश्वरांनी भक्तिमार्गाला जोराचें चालन दिलें व त्यानंतर सोळाव्या व सतराव्या शतकांत अेकनाथ-तुकारामांनी त्याला कळसास पोचवलें. या चारशे वर्षांत व त्यानंतरहि कांही शतकें विष्णुभक्तीने लोक वेडे झाले होते. पंढरपूर हें भक्तिमार्गाचें केंद्र झालें व विष्णूचा किंवा कृष्णाचा पंढरपुरांतील लोकावतार विठ्ठल हें महाराष्ट्रीय जनतेचें परम दैवत झालें. संतांच्या अुदयाने पंढरपुराप्रमाणे अितरहि अनेक स्थलांना क्षेत्रांचें माहात्म्य प्राप्त झालें. महाराष्ट्रांत वारकरीपंथ निर्माण झाला व त्यांत प्रवेश मिळण्यास सुशिक्षित-अशिक्षित, श्रीमंत-गरीब किंवा स्त्रीपुरुष यांपैकी कुठलाच भेद आड येत नव्हता. वर्षांतून दोनदा आषाढी व कार्तिकी या दोन महाअेकादशांना पंढरपूर, आळंदी अित्यादि क्षेत्रांची वारी करण्याची प्रथा या पंथाने जोरांत अमलांत आणली. विठ्ठल व त्याबरोबर त्याचा महिमा वाढवणारे संत यांचा अुत्सवहि केला जाअूं लागला; व अशा तऱ्हेने भक्तिमार्गाला त्याच्या मूळच्या तात्त्विक स्वरूपा-

पासून कांहींसें स्वतंत्र असें हें लोकस्वरूप प्राप्त झालें. अशिक्षित बहुजनसमाजावर या लोक-स्वरूपाचाच प्रभाव अधिक झाला.

स्त्रीपुरुषांच्या जीवितक्रमांत भक्तिमार्गाला याप्रमाणे महत्त्वाचें स्थान मिळाल्याबरोबर स्त्रियांनी आपल्या ओवीगीतांतून पंढरपूर, आळंदी वगैरे क्षेत्रांचा व त्याबरोबरच संतकवींचाहि महिमा गाण्यास सुरुवात करावी हें सहजच होतें. महान् विभूतींच्या चरित्रांना अलौकिकत्वाची जोड पुष्कळदा दिली जाते. संतकवींचीं चरित्रें अशा तऱ्हेच्या अलौकिक चमत्कारांनी भरलेलीं आहेत, व भोळया अशिक्षित जनतेने त्यांचा सांकेतिक अर्थ लक्षांत न घेतां त्यांच्या दृश्य स्वरूपा-वर विश्वास ठेवलेला आहे. विठोबाच्या अवतारासंबंधीं दंतकथा; चमत्कारांनी भरलेलीं संतचरित्रें व भक्तिपंथाला पंढरपुरांतील अुत्सवाचें मिळालेलें दृश्यस्वरूप या गोष्टींतूनच स्त्रियांच्या या ओवीगीतांचा उगम झालेला आहे.

संतकालीन किंवा त्यानंतरचे 'भक्तविजय', 'संतलीलामृत' वगैरेसारखे भक्तिविषयक ग्रंथ यांतून प्रामुख्याने दिसून येणारी अेक गोष्ट म्हणजे लोकांचा भाविकपणा त्या वेळीं अितक्या कळसाला पोचला होता की विठ्ठल-रुक्मिणी यांना या ग्रंथांतून जरी देव म्हणून मानलें असलें तरी हे देव पुष्कळदा मानवी पातळीवर अुतरलेले दाखवलेले असतात. विशेषतः साधुसंतांच्या व भक्तांच्या आयुष्यांत विठ्ठल-रुक्मिणी त्यांच्या मित्रांप्रमाणे भाग घेत असत अशा कल्पना या ग्रंथांतून सर्वत्र मिळतात. आणि साधुसंतांच्या संसारचित्रांबरोबर विठ्ठल-रुक्मिणींचीं काल्पनिक संसारचित्रें रंगविलेलीं आढळतात. मुख्यतः पंढरपूर हें विठ्ठलाचें राज्य कल्पून तो अितर मानवां-प्रमाणे आपल्या राज्यांत कसा वावरत असावा याचीं वर्णनें या ग्रंथांतून पुष्कळदा मिळतात. आणि अशिक्षित जनतेमध्ये श्रुतिपरंपरेने किंवा आता लेखी स्वरूपांतहि जें वाङ्मय लोकप्रिय झालेलें आहे त्यामध्ये अशा तऱ्हेच्या भक्तिविषयक वाङ्मयाचा भाग फार मोठा आहे. त्यामुळे ओवीसारख्या लोकगीतांतूनहि पंढरपूर किंवा विठ्ठल-रुक्मिणी यांकडे पाहण्याचा दृष्टिकोन पुष्कळ अंशीं अशाच तऱ्हेचा दिसून येतो. शिवाय या सर्व ओव्यांतून या क्षेत्रांचें व तेथील अुत्सवांचें पुष्कळसें यथास्वरूप वर्णनहि आढळतें.

सर्व क्षेत्रांत महत्त्वाच्या ठरलेल्या पंढरपुरावरील ओव्यांची संख्या सर्वांत मोटी आहे. पंढरपुरला जाणें म्हणजे आयुष्यांत किती महत्त्वाची गोष्ट असते, पंढरपूरच्या दर्शनाने घडलेलें पुण्य किती अढळ असतें (ओवी १८६) किंवा पंढरपूरला जाण्याचें सामर्थ्य नसल्यास किती दुःख होतें (ओवी १८७) वगैरे कल्पनांवरून स्त्रियांचें अुत्कट भक्तिप्रेम दिसून येतें. याच अुत्कटतेमुळे आपल्या सर्व नातलगांवरून पंढरपूरचे गोडवे गाअिलेले आढळतात. विठोबावरील अनन्यभक्तीमुळे जनाबाअीला ज्याप्रमाणे विठोबा प्रत्यक्ष आपल्याबरोबर सर्वत्र असल्याचा भास होत असे, त्याप्रमाणे या ओव्यांतूनहि विठ्ठल आपला फार जवळचा नातलग आहे, किंवा पंढरपूर हें आपलें आवडतें माहेर (क्वचित् प्रसंगीं सासर) आहे ही कल्पना विखुरलेली आहे. विठ्ठलाच्या दर्शनाची अुत्कट अिच्छा शेवटच्या चार ओव्यांतून (ओ. २१३ ते २१६) ज्या कल्पनांनी विकसित केली आहे त्या कल्पना फारच बहारीच्या आहेत.

---

१ पंढरपूरच्या मंदिराचें वर्णन सोलापूर गॅझेटियरमध्ये दिलें आहे त्याच्याशीं या ओव्यांतील वर्णन बहुतेक ठिकाणीं जुळतें.

आल्या जल्मामधीं पंढरी पहावी वेड्या ।
मधीं कुंडलीक मीमाजल दोही थड्या ॥१८१
आल्या जल्मामधीं मला पंढरी पाह्याची ।
पाण्यामधीं माडी देव कुंडलिकरायाची ॥१८२
पंढरीला जावं मनीचा मनीं भाव ।
कुंडलीकाच्या पुढं दगडाची पहावी नाव १८३
विठ्ठल विठ्ठल चैन पडेना जीवाला[1] ।
अेकदां जायाचें पांडुरंगाच्या गांवाला ॥१८४
पंढरीला जातें मला आडव येअूं नका ।
धनी दोपाला होअूं नका ॥१८५
बारा वर्सें झालीं तुला पंढरीं गेल्याला ।
बुक्कीयाचा वास तुझ्या अजुनी शेल्याला १८६
पंढरीला जाया देती पैसा बुक्क्याला ।
दुबळपण माझं सांगा विठ्ठल सखयाला ॥१८७
पंढरीला जावं संग न्यावं आओीला ।
तांब्याच्या कळशींनीं पाणी घालावं जाओलीं[2] ॥
पंढरीला जावं संग घ्यावं बापाला ।
तांब्याच्या कळशींनीं पाणी घालावं चाफ्यालीं[3] ॥
पंढरीला जावं संग घ्यावं भावाला ।
तांब्याच्या घागरींनीं पाणी सर्व्या देवाला ॥१९०
पंढरीला जातें संग घेतें वडील बंधु ।
अंघोळीला जाया चंद्रभागेचा तास रुंदु ॥१९१
पंढरीला जातें संग नेतें मी मावशी ।
हातीं तांब्याची कळशी पाणी घालतें तुळशी ॥
पंढरीला जाती वारकरी बाया ।
गंधारी माझी बया त्यांत माझी अनुसया ॥१९३

पंढरीला जाया तयारी झाली माझी ।
माझ्या बंधुराया गाडीबैल घे जा तुझी ॥१९४
पंढरीला जाअूं बहिणीभावंडं आम्ही दोघं ।
देवा विठ्ठलाचं तीर्थ झालं मनाजोगं ॥१९५
पंढरीची हवा सांगित्या माझ्या जावा ।
देवा विठ्ठलाचा तीनताळाचा रथ नवा ॥१९६
पंढरीला जाती माझीं अुलीं अुलीं बाळं ।
तान्ह्या राघोबाच्यों हातीं साधूच्या टाळ ॥१९७
पंढरीला जाती माझ्या आळीच गोपाळ ।
विठ्ठलाला शेला रुखमाबाओीला पातळें ॥१९८
शेजारीण साळू पंढरीला दोघी जाअूं ।
वाळवंटीं अुभ्या राहूं येळनाथाचं दरशान घेअूं
कुंडलीकाला भेट देअूं मग रावळांत जाअूं ॥
सावळी मूर्त पाहू ।
सांगती खूण तुला पायरीला नामदेअूं ॥१९९
पंढरीला जातें संगसोबत नाहीं कुणी ।
म्होर विठ्ठल माग जनी ॥२००
हौस मला मोठी पंढर माहेराची ।
देवा विठ्ठलाची माडी कौलारी राह्याची ॥२०१
पंढरी पंढरी माझं माहेर साजरी ।
अिठ्ठलसखा हरीनामाची गुजरी ॥२०२
अिठ्ठल अिटेवरी नामदेव धक्यावरी ।
फार माझा हेतु पुंडलीकसख्यावरी ॥२०३
अिठ्ठल माझा पिता नामदेव बा चुलता ।
चंद्रमार्गी अुभा बंधु पुंडलीक नेणता ॥२०४

१ किंवा पहिली ओळ : विठ्ठल म्हणूं म्हणूं छंद लागला जीवाला ।

२ या ओवीची दुसरी ओळ निरनिराळ्या तऱ्हेने म्हटली जाते. अुदाहरणार्थ:— 'तांब्याच्या कळशींनीं' या ठिकाणीं 'हातांत बेलतांब्या' असा चरण; किंवा दुसरी ओळ :

"गोपाळपुऱ्यांत कडवा सोडावा गाओीला ॥"
"गोपाळपुऱ्यांत दवणा चारीते गाओीला ॥"
"ताओीत माझा बंधु सोडी पेंढी गाओीला ॥"

३ किंवा दुसरी ओळ: "तांब्याच्या घागरींनीं पाणी दवण्याच्या रोपाला ॥"

४ लहान मुलाला "राघू" व मुलीला "मैना" हे शब्दप्रयोग ओव्यांतून नेहमी आढळतात.

५ किंवा "गोपाळ" व "पातळ" यांबद्दल "खेळगडी" व "शालजोडी" अशीहि रचना मिळते.

६ साधुसंतांचे पाय आपल्याला नित्य लागावेत म्हणून नामदेवांनी विठ्ठलमंदिराच्याच अेका पायरी-वर समाधि घेतली अशी कथा प्रचलित आहे.

७ किंवा दुसरी ओळ : "पाण्यामधीं माडी कुंडलीक बांधवाची ॥"

विठ्ठल माझा पिता रुक्मीण माझी माता ।
शिणभाग गेला दोघांना ओव्या गीतां[1] ॥२०५
अिठ्ठल माझा पिता माझी बोळवण करी ।
रुक्मीण माता अंबरानं ओटी भरी ॥२०६
आअी रुक्मिणीपरीस बापा विठ्ठलाला माया ।
होती कार्तिकाची बोली आला आखाडीला न्याया
पंढरीला जाया औंदा नव्हतं माझं मन ।
बापा माझ्या विठ्ठलानं चिठ्ठ्या पाठवल्या दोनें[2] ॥
येडा माझा जीअू वाऱ्याच्या पाठी लाग ।
सावळा पांडुरंग मला दमाच्या गोष्टी सांग ॥
पंढरी सासर धन्य नारीच्या कपाळाची ।
चंद्रभागेला धुणं धुवी गार सावली पिपळाची॥

पंढरपुरांत गलोगलीं गायमुख ।
कुण्या हौशानं दिली लेक त्याची हरली तहानभूक
पंढरीला जातें घरसंसार सोडोनी ।
विठ्ठलासारखे आले सोयरे जडोनी ॥२१२
पंढरपुराची मी त होअीन चिमणी ।
देवा विठ्ठलाच्या मोती अुधळील अंगणीं ॥२१३
पंढरपुरीची बाअी मी होअीन शेवंती ।
जाअीन वेलीं तुझ्या रावळा भोंवतीं ॥२१४
पंढरपुरीची होअीन केरसुणी ।
देवा विठ्ठलाच्या नित जाअीन दरशानीं ॥२१५
पंढरपुरीची होअीन लाल माती ।
येत्याल साधुसंत त्यांच पाअूल रंगती ॥२१६

खालील ओव्यांतून पंढरपुरांतील मंदिरांचीं वर्णनें आढळतात—

पंढरीची वाट मला दिसते लालीलाल ।
देवा विठ्ठलानीं यानीं लावली मखमल ॥२१७
पंढरी पंढरी दुरुन दिसते पसाऱ्याची ।
देवा विठ्ठलाची अूंच माडी कासाराची ॥२१८
पंढरपुरामध्यें अूंच माड्या अत्तराच्या ।
देवा विठ्ठलाला अुदबत्त्या रतींबाच्या ॥२१९
पंढरी पंढरी अिठुदेवाची नगरी ।
घस्त हिंडती चहुकोनी टाळमृदुंगाची ध्वनि ॥
पंढरीच्या वाट सर्वी रावळं रावळं ।
चंद्रभागेमधीं बापलेकाचीं देवळं ॥२२१
पंढरीला वेढा वेढा पडला भीवराचा ।
देवा कुंडलीकाचा मध्यें वाडा गुजराचा ॥२२२

पहिली माझी ओवी चंद्रभागेचा आकार ।
देवा कुंडलीकाचं पाण्यामधीं शिखर ॥२२३
येताळ अुमाठी लक्षुंबाअी तळवटीं[3] ।
देवा विठ्ठलाची मधीं लालाची राहुटी ॥२२४
पंढरी पंढरी नांव लअी अवघड ।
रावळाच्या मागं कान्होपात्र्याचं[4] झाड ॥२२५
देवामधीं देव कुंडलीक किती गोरा ।
चंद्रासारख्या त्याच्या कोरा ॥२२६
अिठ्ठल अिटेवरी रुक्मीणी रावळांत ।
तिथून कथा होती दोघांचं अेक चित्तें[5] ॥२२७
विठ्ठल रावळांत आहे रुक्मिणी देवळांत ।
दोघांच्या भेटी झाल्या कमानीं[6] दरवाजात २२८

१ किंवा दुसरी ओळ : "असा येळ गेला दोघाचं नांव घेतां ॥"

२ किंवा दुसरी ओळ : "देवा विठ्ठयला तुझ्यासाठीं केलं येणं ॥"

३ पंढरपुरांत डोंगरावर वेताळाचें व पायथ्याशीं लक्ष्मीचें मंदिर आहे त्यांना अुद्देशून.

४ कान्होपात्रा नायकीण विठ्ठलाची भक्त होती. तिच्या रूपसंपदेबद्दल अैकून बादशहाने तिला बोलावणें पाठविलें. जातांना ती विठोबाला भेटायला आली व त्याची प्रार्थना करूं लागली तेव्हा त्याने तिला आपल्या मांडींत गुप्त केली. त्याच वेळीं त्याच्या मूर्तीच्या मागे तरटीचें अेक झाड अुगवलें अशी कथा भक्तविजयांत आहे. हें तरटीचें झाड अजूनहि कान्होपात्रेचें झाड म्हणून प्रसिद्ध आहे.

५ किंवा २ री ओळ : "तिथून साथ देती कंठ दोघांचा अेक ॥"

पुंडलीकाच्या मातृपितृभक्तीमुळे विठोबा पंढरपुरांतील विटेवर अवतार घेअून अुभा आहे अशी दंतकथा आहे. कृष्णाच्या मांडीवर राधेस पाहून रुक्मिणी रागावून पंढरपुरांत आली अशीहि कथा आहे. या कारणांनीं पंढरपुरांत विठोबा व रुखमाअी यांच्या मूर्ति दोन स्वतंत्र मंदिरांत आहेत.

६ पंढरपुरांतील विठ्ठलमंदिरांत जी मोठी चौरस जागा आहे तिला 'कमान' म्हणतात.

विठ्ठल विटेवरी रुक्मिणी दारावरी ।
सारंगी वोली करी कबीराच्या वीण्यावरी २२९
विठ्ठल वीटेवरी वर्सं झालीत आटीकोटं[1] ।
विठ्ठल सख्याला कुणीं म्हणना खाली बस २३०
विटेवरी अुभा कुण्या येवगीचा[2] राजा ।
अुभ्यानं करी पूजा राअीरुक्मिणी कंत तुझा ॥
विटेवरी अुभ बामणाचं बाळ ।
देवा विठ्ठलाच्या गळ्या रुद्रकाची[3] माळ ॥२३२
कुंभाराची वीट काय पुण्याअी तुझी थोर ।
बापा माझ्या विठ्ठलानं पाय ठेविला तुझ्यावरं ॥
नऊ लाख पायरी चढता झालं अुन ।
देवा विठ्ठलाचं कधीं झालं दरशान ॥२३४

देवामधीं देव विठ्ठल किती काळा ।
भांगटीळयाला मोती सोळा ॥२३५
तुळशीच्या माळा घेतें पैशाच्या नऊ ।
देवा माझ्या विठ्ठलाला हात पुरना खालीं लऊ ॥
जाअीच्या फुलाबाचा कुटं केला म्यां अुगानागा ?
देवा विठ्ठलाच्या हार गुफीतें गळ्याजोगा ॥
विठ्ठल पावेना आला झोपेच्या भरामधीं ।
आबीराचा पुडा साक्ष टेविला दारामधीं[6] ॥
विठ्ठलाचा शेला कुण्या पींप्यानं शिवला ? ।
वर अभंग लिवला ॥२३९
विठ्ठलाच्या शेल्यावर अभंग झाले दाट ।
रुक्मिणीच्या चोळीवर लिवले हरीपाठ ॥२४०

पंढरपुरांतील पवित्र नदी चंद्रभागा हिचीं वर्णनें खालील ओव्यांत मिळतात. पावसाळ्यांत या नदीला बराच पूर येअून सहा महिनेपर्यंत हिच्यांत नावाहि चालतात. विशेषतः आषाढी व कार्तिकी अेकादशांना ज्या वेळीं पंढरपुरांत यात्रा भरते त्या वेळीं ही नदी भरलेलीच असते व तिचें माहात्म्यहि क्षेत्राच्या दृष्टीने वाढतें. विशेषतः या नदीला जास्त पूर आला की पाणी गांवांत शिरून पुष्कळदा नुकसानहि होतें. अशा प्रसंगांचीं वर्णनें या ओव्यांतून मोठ्या प्रमाणांत मिळतात व त्यांवर विठ्ठल-रुक्मिणींचीं काल्पनिक संसारचित्रें अुभारलेलीं आहेतः—

मायबापाअीची सेवा देवा कुंडलीकानं केली ।
दोघांच्या अंघुळीला चंद्रभागा ओळविली[8] ॥
चंद्रभागेमधीं आहेती अुदंड रावळं ।
कुंडलीकाशेजारी बापलेकाचीं देवळं ॥२४२
चंद्रभागेमधीं आहेती चंदनाच्या शिळा ।
विठ्ठल धुणं धुवी रुक्मिणी घाली पिळा ॥२४३

बाराच्या अमलांत चंद्रभागा झोपी गेली ।
देवा ज्ञानोबांनीं अंघोळीला जागी केली ॥२४४
चंद्रभागेच्या तीरीं कुणी सुपारी फोडियिली ? ।
बंधवानीं माझ्या तिथं बारसं सोडियिली ॥२४५
चंद्रभागेयेचं पाणी चांदीच्या पेल्यामधीं ।
नेणता माझा राघू तान्हेला काल्यामधीं[10] ॥२४६

---

१ 'आठीकोट'च्या ठिकाणीं 'अेशीकोट' अशीहि रचना मिळते. "युगें अठ्ठावीस अुभा विटेवरी" या अभंगाचाच हा अपभ्रंश दिसतो. २ योगी. ३ रुद्राक्षाची.

४ किंवा, "काय पुण्यं केलं अग तूं कुंभाराच्या विट ।
पांडुरंगाचा पाय तुला सापडला कुठ ? ॥"

५ "नअू" व "लअू" या ठिकाणीं अनुक्रमें "वीस" व "बस" असेहि शब्दप्रयोग आढळतात.

६ या ओवींतील शब्दांवरून देवाला झोप आली म्हणून तो पावत नाही असा भाव वाटतो. परंतु याचाच अपभ्रंश होअून खालीलप्रमाणेहि ओवी आढळते:—

"देव विठ्ठल पावणा माझ्या झोपेच्या भरामधीं ।
आबीराचा पुडा साक्ष ठेविला दारामधीं ॥"

७ कीं शिंप्यानं ? ८ मातृपितृभक्तीने पुंडलिकाने विठोबा व भागीरथी या दोघांनाहि पंढरपुरांत आणल अशी दंतकथा आहे. (ही संपूर्ण कथा सोलापूर गॅझेटमध्ये दिलेली आहे.)

९ द्वादशी (कार्तिकी). १० पंढरपुरांत गोकुळाष्टमीला गोपाळकाल्याचा अुत्सव करतात. "पेल्यामधीं" व "काल्यामधीं" यांअैवजी अनुक्रमें "कुंडीमधीं" व "दिंडीमधीं" अशीहि शब्द-रचना आढळते.

अनुक्रमणिका

भरली चंद्रभागा चालल्या काव्याकुव्या ।
पोहणाराच्या दंडीपेव्या ॥२४७
भरली चंद्रभागा चालली दोन्ही थड्या ।
पोहणार माझा टाकी उड्या ॥२४८
भरली चंद्रभागा येळ लवंगाचं पुरद्यान ।
विठ्ठलाच्या आधीं कुंडलीकाचं दरद्यान ॥२४९
विठ्ठल विठ्ठल हाका मारितें कन्हाची ।
भरली चंद्रभागा झाली गर्दी नावाची ॥२५०
भरली चंद्रभागा नावा लागल्या बुडाया ।
विठ्ठल रुक्मीणं आली नारळ फोडाया ॥२५१
भरली चंद्रभागा नावचा घोडा बुड ।
विठ्ठलाच्या रुक्मिणी पतिवर्ता न्हावं पुढं ॥२५२
भरली चंद्रभागा नावा चालल्या नाचत ।
रुक्मीण बोल नाहीं हावर्ल्या वाचत ॥२५३
भरली चंद्रभागा नाव झालीया नवरी ।
रुक्मीण नार शेला बुतीचा आवरी ॥२५४
हातुपायीं शेला का र निजलास देवा ।

भरली चंद्रभागा रस्त्यांत आल्या नावा ॥२५५
भरली चंद्रभागा पाणी लागलं वडालीं ।
रुक्मीण बोल माझा कुंडलीक बुडाला ॥२५६
विठ्ठल विठ्ठल हाका मारिती सर्व्याला ।
भरली चंद्रभागा पाणी लागलं सोप्याला ॥२५७
भरली चंद्रभागा पाणी लागलं हवेलीला ।
विठ्ठल रुक्मीण उभी रथाच्या सावलीला ॥
भरली चंद्रभागा पाणी झालं गल्लोगल्लीं ।
विठ्ठलदेव बोल वारकऱ्याचीं मुलं तान्हीं ॥२५९
भरली चंद्रभागा पाणी शिरलं पेठेंत ।
विठ्ठलदेव बोल लावा मंगुडँ वाटेंत ॥२६०
भरली चंद्रभागा पाणी शिरलं गांवांत ।
विठ्ठल रुक्मिणी पोथी वाचिती नावांत ॥२६१
भरली चंद्रभागा पाणी झालं रानोमाळा ।
देवा कुंडलीकाची बुडाली धर्मशाळा ॥२६२
भरली चंद्रभागा नदीपञ्चाल कशी जाऊं ? ।
देवा विठ्ठलानं फुलाची केली नाऊ ॥२६३

पंढरपुराबरोबर आसपासच्या लहान गांवांनाहि थोडें थोडें महत्त्व प्राप्त झालेलें आहे हें खालील ओव्यांवरून दिसतें. विशेषतः पंढरपूर-आळंदी या मार्गावरील स्थलांना हें महत्त्व मिळणें साहजिकच आहेः—

पंढरीला जाया येळापूरची वसति ।
देवा विठ्ठलाची माडी साधुची दिसती ॥२६४
पंढरीला जाया आडवं लागतं मोवाळ ।
देवा विठ्ठलाचं गांव साधुचं जवळ ॥२६५
पंढरीला जाया आडवं लागतं बामुळगांऊ ।
देवा माझ्या विठ्ठलाच्या दिंड्या आल्यात बहु ॥
पंढरीला जाया आडवं लागतं अिरवाल ।
माझ्या बांधवाचं पाहिलं नालिस्ति कोण गांव ॥

पंढरीला जाया आडवं लागतं देऊळगांऊ ।
श्रीगोंद्यांत होतो न्याऊं नगराला नका जाऊं ॥
पंढरपुरामधीं अठराविसी चौदा मोऱ्या ।
विठ्ठलदेवाच्या अंघोळीचं पाणीजातं गोपाळपुऱ्या
पंढरीपासून गोपाळपुऱ्याचा दिवा दिस ।
विठ्ठल कीर्तनाला बस ॥२७०
पंढरीपासून गोपाळपुऱ्याची लामण ।
बाळ पांडुरंग संग सोवळ्याचा बामण ॥२७१

१ ही ओवी भावावरून म्हटलेली आहे.

२ या ठिकाणीं "राअीरुक्मीण" किंवा "प्रीतीचा पांडुरंग" असेहि शब्दप्रयोग आढळतात.

३ किंवा दुसरी ओळ : "विठ्ठल देव बोल या ग बायांनो पाणी थोडं ।।" ४ हवेल्या.
५ अुतावळो. ६ किंवा "नाव्याला." ७ मंगोडें हें पंढरपुराजवळील अेक गांव आहे. ८ न्याय.

९ गोपाळपूर हें पंढरपूरच्या दक्षिणेस अेक मैलावर अेक वाडीवजा गांव आहे. यासंबंधी अशी कथा आहे की रुक्मिणी जेव्हा कृष्णावर रागावून निघून गेली त्या वेळीं ती पंढरपुरांत निघून आली. शेवटीं कृष्णाने तिला शोधून काढली. नंतर दोघांचा राग गेल्यावर अेका डोंगरावर बसून दोघांनीहि अेकत्र फराळ केला. त्याच ठिकाणीं हें गोपाळपूर वसलें आहे. या ठिकाणीं गोपाळकृष्णाचें मंदिर असून दर आषाढी व कार्तिकी पूर्णिमेला तेथे दहिकाल्याचा अुत्सव करतात.

पंढरपुऱ्यांत विण्याला विणा दाट ।
साधुला साधु भेट ।
गोपाळपुऱ्यांत गोपाळकाला वाट ॥२७२

गोपाळपुऱ्यांत गोकुळकाला झाला ।
फुटली हंडी चंद्रभागेला लोंढा गेला ॥२७३

आषाढी व कार्तिकी अेकादशांना पंढरपुरास जें महत्त्व चढतें व त्या वेळीं तेथे जो अुत्सव होतो त्याचीं वर्णनें खालील ओव्यांतून मिळतात. विशेषतः या वेळीं पंढरपुरांत विठोबा-रखुमाअीची व आळंदीहून ज्ञानेश्वराची, देहूहून तुकारामाची किंवा अुत्तरहिंदुस्थानांतून कबीराची वगैरे पालख्या निघून त्यांची जी मिरवणूक किंवा "दिंडी" जाते तिचीं वर्णनें यांत मुख्यत्वें-करून आहेत :—

पंढरीला जातें अेकादशीच्या ओढीनं ।
विठ्ठल रुकमीण मला भेटलीं जोड्यानं ॥२७४
पंढरीला जाया पठाडी माझी येणी[1] ।
साधुच्या संगतीनं पहिल्या आखाड्या केल्या दोन्ही ॥२७५
पंढरीला जाया अहित मोकळे माझे केस ।
साधुच्या संगतींत मला अेकादस ॥२७६
तातगडीच्यां[2] कामा बाअी मोकळी माझी येणी।
देवाच्या बराबरीच रथ निघालेत दोन्ही ॥२७७
कारकीतीपासून आखाडीची महिमा मोठी ।
देवा विठ्ठलाचा रथ निघाला वाळवंटीं ॥२७८
पंढरीच्या वाट खारकाला आल घोस ।
ताअीत बांधवाला साधुला अेकादस ॥२७९
पंढरीची वाट चालाया हलकी ।
देवा विठ्ठलाची संग साधुची पालखी ॥२८०
पंढरीची वाट चालाया चांगली ।
देवा विठ्ठलाची वर पावलं रंगलीं ॥२८१
पंढरीची वाट कुण्या पाप्यानं नांगरीली ? ।
देवा विठ्ठलाची गाडी बुक्क्याची हादरली॥२८२
पंढरीच्या वाट पताका पिवळी ।
देवा विठ्ठलाची शिण साधुची कवळी ॥२८३
पंढरपुरांत काय वाजत गाजत ।
सोनेरी बासिंग लग्न देवाचं लागत ॥२८४

रुक्मिणी नवरी राजा भीमकाच्या घरीं ।
विठ्ठल नवरा पंढरीच्या पारावरी ॥२८५
पंढरीची वाट चुन्यानं सारविली ।
विठ्ठलदेवाची रात्रीं वरात मिरविली ॥२८६
पाअूस पडतो पंढरीच्या माळावरी ।
देवा विठ्ठलाचे भिजले वारकरी ॥२८७
पाअूस झिरमिरी पंढरीच्या माळावरी ।
माझा सदाशिव नवसाचा वारकरी ॥२८८
पंढरीच्या वाट गुरुबहिणीचा मेळा दाट ।
आळंदी करुनी मला शिकव हरीपाठ ॥ २८९
पंढरीच्या वाट अुडती पिवळी माती ।
देवा विठोबाची दिंडी पंढरीला जाती ॥ २९०
पंढरीची वाट सडकेसारखी ।
ज्ञानोबा तुकोबाची आली दिंडी म्हेर देहूची पालखी ॥२९१
विठ्ठल विटेवरी रुक्मिणी मोरांवरी[3] ।
ज्ञानोबा तुकोबाची सोपानमहाराजाची आली दिंडी आळंदी शहरावरी ॥२९२
चंद्रभागेच्या वाळवंटीं सारीं निशाणें जराअीचीं।
देवा ज्ञानोबाची दिंडी आळंदीकरायाची॥२९३
चंद्रभागेच्या काठायाला समअी जळते मोरायाची
ज्ञानोबा तुकाराम दिंडी आळंदी करायाची २९४

१ मोठे केस म्हणजे आरोग्याचें चिन्ह अशा तऱ्हेची कल्पना ओव्यांतून नेहमी असते. म्हणजे पंढरपूरला जाण्याचें सामर्थ्य आहे असा भाव.

२ "तांतडीच्या"— ओवी गातांना चरण जुळवून आणण्याकरिता पुष्कळदा ग, बाअी वगैरे अक्षरें शब्द फोडून मधेहि घालतात.

३ पंढरपुरांतील रुक्मिणीची मूर्ति मयूरासनाधिष्ठित आहे.

आळंदीपसअीन अुरली पंढरी अैशीं कोस ।
देवा विठ्ठलाच्या टाळत्रीण्याला मोती घोस २९५
पंढरीच्या वाट दिंडी कुणाची थोपली ।
देवा विठ्ठलाची तार विण्याची तुटली ॥२९६
नवस ब्रोललें टाळाच्या टोपणा ।
तान्हा माझा राघू साऱ्या दिंडींत देखणा २९७
वाजत गाजत दिंडी आली माझ्या घरा ।
ब्रांधवाला माझ्या मृदुंग्याला जागा करा ॥२९८
वाजत गाजत दिंडी आली रमत ।
नेणता राघू माझा खेळ करीतो गंमत ॥२९९
पंढपुरामध्यें मृदुंगाची झाली दाटी ।
माझ्या ब्रांधवाला भजनवाल्याला आली चिठ्ठी॥
हिरवी माझी चोळी बुक्यानं झाली काळी ।
विठ्ठलदेवाच्या साधुसंताच्या गेली आळीं ॥३०१

पंढरपूर हें विठ्ठलाचें राज्य, त्याचा तो सर्वाधिकारी, ही कल्पना बऱ्याच ओव्यांतून जास्त विकसित केलेली आहे. खालील ओव्या अशाच प्रकारच्या आहेत. विठोबाचें पंढरपूरनगरींतील वैभव त्यांतून चितारलेलें आहे. अर्थात् विठोबाचें वैभव वर्णन करण्यास रुक्मिणीचा सर्व साज पुरेसा आहे :—

विठ्ठलाशेजारीं रुकमीण बसली भारांनीं ।
तिच्या मंदिरांत बुका विकतो शेरांनीं ॥३०२
रुक्मीण नेसली नवलाखाचं सोवळं ।
देवा विठ्ठलाचं राज्य पृथिमीं[1] आगळ ॥३०३
रुक्मीणी लेणं लेली सोन्याच मूदगोंड ।
देवा विठ्ठलाला पंढरीचं राज्य दंड ॥३०४॥
रुक्मीण लेणं लेली पायभरून जोडव ।
पंढरीचं राज्य कुकु दंडत आडवं ॥३०५
रुक्मीण लेणं लेली सोन्याच्या केकातें ।
देवा विठ्ठलाला चौदा जिल्ह्याची जकात॥३०६
रुक्मीण लेणं लेली सोनियाच तोड ।
नवलाख खेड पंढरीखाली मोड ॥३०७
रुक्मीण लेणं लेली नवलाखाच्या पाटल्या ।
विठ्ठलसखा ब्रोल किती भोवरें[3] आटल्या ? ॥३०८
रुक्मीण लेणं लेली सोन्याच्या बुगड्या ।
देवा विठ्ठलाच्या खिडक्या रथाच्या अुघड्या
सवा शेर सोनं रुक्मिणीच्या कांकण ।
पडवी ब्रसली राखण ॥३१०
सवा शेर सोनं रुक्मिणीच्या केसाला ।
अुजेड पडतो चंद्रभागेच्या तासाला ॥३११
सवाशेर सोनं देवा विठू चंद्रू झारी ।
ग्यानं तान्हेले श्रीहरी ॥३१२
रुखमीन म्हन कशाची देअूघेअू ?
विठ्ठलदेव ब्रोल शिंपी आलेत नामदेअू ॥३१३
विठ्ठल शिवी चोळ्या रुक्मीण गेली पाह्या ।
हिऱ्याकंकराची पाठ मोत्यांच्या जोडी बाह्यां ॥
भर्तांराचं राज्य रुक्मिणी सांगते आअीला ।
सूपभर मोती माझ्या चोळीच्या ब्राहीला ॥३१५

पंढरपूर हें विठ्ठलाचें राज्य असें धरूनच खालील ओव्यांत पंढरपुरांतील विठ्ठल-रुक्मिणीचीं काल्पनिक संसारचित्रें रेखाटण्याचा प्रयत्न केलेला आहे. विठ्ठलपेक्षाहि रुक्मिणीच्या स्वभाव-चित्राला या ओव्यांतून जास्त महत्त्व दिसतें. रुक्मिणीला अगदी मानवी पातळीवर आणून स्त्रीसुलभ असें वर्णिलेलें तिचें स्वभावचित्र मनोरंजक आहे. पतिप्रेम हा जसा तिच्या स्वभावांतील विशेष दाखवला आहे तशीच थोडीशी शृंगारिक मनःप्रवृत्तिहि तिच्या ठिकाणीं दाखवलेली आहे.

सकाळीच्या पारीं रुकमीण घालती रांगुळ ।
देव करीतो अंघुळ ॥३१६
सकाळींच्या पारीं रुकमीण पाडिती पातरं ।
देव नेशितो धोतर ॥३१७

१ पृथ्वीवर. २ केगाद– केवडा. ३ फेरे.
४ किंवा : "शेर सोनीयाच्या रखमाअीच्या बुगड्या ।
देवा विठ्ठलानीं खिडक्या ठेविल्या अुघड्या ॥"
५ किंवा दुसरी ओळ : "चांदीच्या लगवाथ्या ॥"

पहिल्या पंगतीला रुकमीण वाढून गेली गुळ।
विठ्ठलसखा बोल पिवळं पातळ पायघोळ॥३१८
दुसऱ्या पंगतीला रुकमीण वाढून गेली भात।
अिठ्ठलसखा बोल नाकीं सरजची नथ॥३१९
तिसऱ्या पंगतीला रुकमीण वाढून गेली पोळी।
अिठ्ठलदेव बोल अंगीं कुतनीची चोळी॥३२०
चवथ्या पंगतीला रुक्मीण वाढून गेली खीर।
अिठ्ठलदेव बोल गळयामधीं हार॥३२१
पाचव्या पंगतीला रुक्मीण वाढून गेली भजं।
विठ्ठलसखा बोल पायीं पैंजण झालं ओझं[1]॥
पंढरपुरामधीं शाळु आल्यात हुरड्याला।
विठ्ठल रुकमिणी हाका मारिती भरुड्याला[2]॥
पंढरीच्या वाटं सांडला चुनाकात[3]।
विठ्ठल रुकमिणी गेलीं जोड्यांनीं पानं खात॥
विठ्ठलाची माडी रुक्मिणी येंग झरोझरां।
विठ्ठलाला अेकादस ओटीला राजगिरा॥३२५
रुखमीन बोल अेक रातरा अेक अिळ।
देवा विठ्ठलाला गार पाण्याची अंघुळ॥३२६
सूर्याच्या तळीं रुखमिनी तुझी न्हाणी।
विठ्ठलदेव बोल चंद्रभागेला जाअी पाणी॥
पंढरीच्या माळावरी अुडती पिवळी माती[4]।
रुकमीण सारविते रंगमहालाच्या आठ भींती॥
पंढरीची वाट कशानं झाली वली?।
रुखमीण न्हाली केस वाळवीत गेली॥३२९
पंढरपुरामधीं चोरी झाली वाळकाची।
रुखमीण किऱ्याकरी हातीं धरून वाळकाची॥
रुकमीण बोल भूपाळी अगोचर।
अिणेच्या निमित्तानं फिरे देवाच्या खांद्यांवर॥
पहाटच्या पाऱ्यांत माधवगिरी[5] कुठं केली?।
अिठ्ठलमहाराजानं अिणं ठेविलं माझ्या घरीं॥
दंडदंड पाणी जातं जाअी ग वाअीला।
देवा विठ्ठलानीं मधें गुलाब लाविला॥३३३
चंदनाचे पाट मी ठेवितें ठाअीठाअी।
पोथी वाचायला बस माझी विटाबाअी[7]॥
विठ्ठलाची काया अुभी माझ्या वाड्यामधीं।
झोप चंडाळीण कशी आली डोळयामधीं[8]॥
विठ्ठल म्हणे तूं देवा रुकमिणी माझी काठी।
साधु आले पैठणकर रावळांत झाली दाटी॥
विठ्ठल देव बोल दे ग रुकमिणी गडवा।
आल्यात साधुसंत जातो दिंडीला आडवा॥
विठ्ठल देव बोल टाक रुकमिणी घोंगडी।
जेजुला तुकाराम बोली त्यांची हेंगाडी॥
विठ्ठलदेव बोल दे ग रुक्मिणी माझा मंदील।
आला आळंदीचा साधु नेतो कथेला कंदील॥
विठ्ठलदेव बोल सोड रुखमिनी बंडी।
येशीमध्यें साधुसंतांची आली दिंडी॥३४०
विठ्ठलदेव बोले सोड रुक्मिणी दुफाटा।
आल्यात साधुसंत झाला कथेचा बोभाटा॥
रुकमीण बोल विठ्ठलदेवाला तुम्ही कथेला नका जाअूं।
चिरबंदी वाडा[9] त्यांत वाटतं मला भ्यअू॥
रुखमीण बोलती शेजबाज माझी सुनी।
देवा विठ्ठलाला कथेला नेलं कुणीं॥३४३

कृष्णाच्या मांडीवर राधेला पाहून व आपण समोर गेलों असतांहि राधा तिथून अुठली नाही हें पाहून रुक्मिणी अेकदा खूप रागावली व दिंडीरवनांत (पढरपुरांत) निघून गेली अशी जी कथा पुराणांत आहे तिला अुद्देशून खालील ओव्या पंढरपूरच्या पार्श्वभूमीवर रचलेल्या दिसतात.

---

१ अशाच प्रकारची सहावी ओवी खालीलप्रमाणे आहे. पण ती या ठिकाणीं घालणें शोभणार नाहीं. यासाठी जनाबाअीवरील ओव्या पाहा.

"सहाव्या पंगतीला रुकमीण वाढून गेली भाजी।
विठ्ठलदेव बोल जना पिरत तुझी माझी॥"

२ भरवाड = अेक धनगरजात. ३ किंवा "काळा कात".

४ किंवा पहिली ओळ "अिथून दिसते पंढरीची लाल माती।" ५ माधुकरी. ६ वीणा.
७ विठोबाला कौतुकाने 'विठाअी' किंवा 'विठाबाअी' म्हटलेलें ज्ञानेश्वर-तुकारामांच्या अभंगांत वारंवार आढळतें. ८ किंवा "वाड्यामधीं" व "डोळयामधीं" यांअैवजीं "वाड्याम्होर" व "डोळ्यावर".

९ किंवा तिसरा चरण "सातातळची दामोदरी".

रुकमीण बोल देवा रुसून जाअीन ।
अवघी पंढरी तुला धुंडाया लावीन ॥३४४
रुसली रुकमीण देवाशेजारीं बसना ।
अबीरबुक्याचा तिला अुकाडा सोसना ॥३४५
रुसली रुकमीण बसेना पालखींत ।
रथावरून देव देतो हात ॥३४६॥
रुसली रुकमीण अुभी राहीना कथला ।
विठ्ठलदेव बोल सरज लावितो नथला ॥३४७
रुसली रुकमीण बसली धोंडाआड ।
आला दिवाळीचा सण देवा माहेरीं धाड ॥३४८
रुसली रुकमीण अवघ्या पंढरींत नाहीं ।
विठ्ठलदेव बोल अिच्या रागाला करूं काय ॥
रुसली रुकमीण गेली पद्मतळ्याला ।
पिरतीचा पांडुरंग हात घालतो गळ्याला ॥३५०
रुसली रुकमीण बसली वाळवंटीं ।
विठ्ठलदेव तिची धरितो मनगटीं ॥३५१
रुसली रुकमीण जाअुन बसली वावरीं ।
प्रीतीचा पांडुरंग अंगीं पालखी सावरी ॥३५२
रुसली रुकमीण गेली मंगळवेढ्याला[1] ।
पिर्तीचा पांडुरंग जीन घालितो थोड्याला ॥३५३
रुसली रुकमीण गेली धामणगांवाला[2] ।
चिठ्ठया पाठविल्या तिच्या बोधल्या भावाला
रुसली रुकमीण बसली खिडकींत ।
पिर्तीचा पांडुरंग सारी पंढरी हुडकींत ॥३५५
विठ्ठल बोलतो रुकमीण बहु कपटी ।
पांडवाची द्रौपदी आमची बहीण धाकटी ॥३५६

याप्रमाणे विठ्ठल-रुक्मिणीवरून रचलेल्या असंख्य ओव्या मिळतात. त्यांत पुष्कळदा देव व भक्त हें नातें ठेवलेलें असतें किंवा पुष्कळदा वरीलप्रमाणे विठ्ठल-रुक्मिणींना आपल्यासारखेच मानव कल्पून अनेक कल्पित ओव्या रचलेल्या असतात.

विठ्ठल-रुक्मिणीप्रमाणेच साधुसंतांच्या चरित्रावर थोड्याबहुत ओव्या मिळतात. यांतून संतांच्या 'संतपणा'ला मोठेपणा देअून त्यांना देवाप्रमाणेच कल्पिलेलें असतें.

खालील ओव्या निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाअी या संतभावंडांच्या चरित्रावर रचलेल्या आहेत. या चौघांच्यांत ज्ञानेश्वरांचें कार्यच सर्वांत मोठें असल्याने अर्थात् त्यांच्या ओव्याच जास्त आहेत. ज्ञानेश्वरांच्यामुळे ज्या आळंदीला क्षेत्रत्व प्राप्त झालें त्या आळंदीचाहि महिमा गाअिलेला आहे:—

आळंदी वसवली धन्य धन्य माझ्या बापा ।
इंद्रावणीला देअी धापा ॥३५७
आळंदीला गेल्या सया यांनीं काय ग पाहिलं ?
देवा कुंडलीकाचं देअूळ पाण्यांत राहिलं ॥३५८
आळंदीला जाव ओटीला घ्यावं केळं ।
ग्यानोबा मुक्ताबाई कोण्या येवग्याचीं बाळं ३५९
पंढरीपासून उरली आळंदी चौऱ्याअैंशी ।
देवा विठोबाच्या घरीं देवा ग्यानोबा गंध वासी ॥
पंढरीची वारी विठ्ठलदेव पेरी ।
त्यांच्या पाबरीला गिन्यान नंदीं चारी ॥३६१
पंढरीपासून आहे आळंदी अैंशी कोस ।
देवा ग्यानोबाच घोड येत्यात सावकाश ॥३६२
ग्यानोबा गोसावी जातो गांवाच्या फेरीला ।
अुशीरं काय झाला याच्या माधवगिरीला ॥३६३
चाकणी चवऱ्याशी पुण्याला बारायशी ।
पंढरी चालला आळंदीचा मोकाशी[3] ॥३६४
अड्याल पड्याल टाळपताकाचा भार ।
पंढरी चालला आळंदीचा सुभेदार[3] ॥३६५
माझीया वाड्यायांत कोण आल्यात साधुबुवा ।
ग्यानोबा तुकाराम टाळ वीण्याला नाद नवा ॥
भरतारी शिरवळी आळंदीकरण नारी ।
सोन्याचा पिंपळ झाड ज्ञानोबाच्या दारीं ॥३६७
चल सये जाअूं आळंदीला रातोरात ।
सोन्याचा पिंपळ काशीला गेली मात ॥३६८

---

१ मंगळवेढें हें गांव पंढरपूर रस्त्यावर आहे.

२ धामणगांव हें पंढरपूर रस्त्यावर आहे. विठोबाचा परमभक्त बोधला हा धामणगांवचा पाटील होता.

३ ज्ञानेश्वर.

नाशिक शहराला गेला सुदामासारखा ।
निवृत्तिमहाराजाची सर्वी सोन्याची द्वारका ३६९
निवृत्ति बोल कां र सोपाना रागांत ।
तुला दिली जागा सासवडच्या[1] बागांत ॥३७०
गांव सासवड पुणंधराची[2] पायरी ।
देवती सोपान नांद नगरी बाहेरी ॥३७१
गाव सासवड गांवाला नांव साज ।
देवा सोपानाचा नित्त चवघडा वाज ॥३७२
आळंदी करूनी सोपानाला दिला धक्का ।
विठ्ठल माझा काशीमधीं प्राणसखा ॥३७३
पंढरी करूनी आळंदीला दिला झोका ।
आडव झाल्यात सोपानकाका ॥३७४
आळंदी करूनी मला देहूला जायाचं ।
देवा सोपानाचं मला लळीत पाह्याचं[3] ॥३७५
सुपान सासवड यमाबाअी शिवरीं ।
दुरून दिसते मलूदेवाची जेजुरी ॥३७६
आषाढी अेकादस हिंडतें मी कापूराला ।
आषाढी अेकादस देवा माझ्या सोपानाला ॥
मुक्ताबाअीला मागत चिंचावणीच्या देशाचं ।
आळंदी वतन तिच्या गेनूबा मावाचं ॥३७८
निवृत्ति बोल नाहीं मुक्ताबाई द्यायाची ।
चवघा भावंडांचीं नाहीं लगनें व्हायाचीं ॥३७९
देवा ग्यानोबाच्या भेटीला चांगदेव येती ।
पंचारिती घेअूनी मुक्ताबाअी ओवाळिती ॥३८०
गिन्यान्देव बोल मुक्ता अिमानाची मली ।
चांगदेवाच्या भेटीला मीत चालवीत नेली ॥
आळंदीला जाअूं वरल्या माळांनीं ।
समाधि घेतली पांचें[4] वर्षाच्या बाळांनीं ॥३८२

नामदेवासंबंधीं खालीलप्रमाणे ओव्या मिळतात :—

चिरबंदी वाडा मुंगीला नाहीं वाव ।
रावळाभोवतीं गस्त घालितो नामदेव ॥ ३८३
पंढरीच्या वाट शिंपी नामदेव येतो ।
सोन्याच्या तारा पाल पाटवाची देतो ॥ ३८४
पंढरपुरामधीं कोण हिंडत टोपीवाला ।
जनाबाअीच्या टोपीसाठीं नामदेव शिंपी झाला ॥
पंढरीला जाया मन माझं जाअूं राहूं ।
देवा विठ्ठलाच्या पायरीला नामदेअू ॥३८६

खालील ओव्या अेकनाथासंबंधीं आहेत : —

पंढरीचा देव पैठणाला गेला ।
देवा विठ्ठलांनीं अेकनाथ गुरु केला ॥३८७
देशामधें देश पैठणदेश चांगला ।
पाण्याच्या कडेला अेकनाथाचा बंगला ॥३८८
पंढरीला जातें आडवं लागतं नातपुतं[5] ।
विठ्ठलाच्या संग भेटला अेकनाथ ॥३८९
गांव पैठणींत अेकनाथा तुझी पिंडी ।
करडली फांदी बामण झालें जायबंदी ॥३९०

तुकारामासंबंधीं मोठ्या विपुल प्रमाणांत ओव्या आहेत. त्यांतल्यात्यांत तुकाराम वैकुंठाला जावयाला निघाले व त्यांचें सांगणें न अैकतां त्यांना वेड लागलें म्हणून जिजाअी मागेच राहिली या प्रसंगाला अुद्देशून बऱ्याच ओव्या अहेत. तुकारामाबरोबर अर्थात् देहू गांवाचाहि महिमा गाअिलेला आहे.

---

१ सोपानदेवाने सासवडला समाधि घेतली. या ओवीची दुसरी ओळ खालीलप्रमाणेहि गायली जाते.

"पंचवडी गाव तुला दिलं बागाअीत" ।

किंवा "गांव सासवड सोडुनी वस्ति घेतली बागांत" ।

२ पुरंधर किल्ला. ३ या ओवींत स्थल-व्यक्तिविषयक घोटाळा झालेला दिसतो. देहूला तुकारामाचा समाधि आहे व सोपानदेवाची समाधि सासवडला आहे.

४ ज्ञानेश्वरांनी समाधि घेतली त्या वेळीं ते २१ वर्षांचे होते. लहानपणीं समाधि घेतली अवढ्या भावावर केलेली ही अतिशयोक्ति फार आहे.

५ नातेंपुतें गांव.

पंढरपुरामधें नवलक्ष टाळ जड ।
येवढ्या भागामधें तुकारामानं केला चढ ॥३९१
हरीच्या कीर्तनाला रातीं आला होता तुका ।
सभामंडपावरी यानं अुधळला बुका ॥३९२
तुका तुका म्हणे तुका देहूच्या दरडीं ।
गोपाळपुऱ्यांत वही निघाली कोरडी ॥३९३
हातीं टाळवीणा तुका हिंडतो घरोघरीं ।
आम्ही जातों वैकुंठाला आमच्यावरी येता कुणी
तुकाराम बोल जीजा माझ्यासंग चल ।
माझ्या मागं होत्याल चोळी बांगडींचे हाल ॥
जीजाबाओी बोल येड लागलं तुकाला ।
आपुन जातो वैकुंठाला हांका मारीतो लोकाला ॥
गोपाळपुऱ्यांत टाळमृदुंग बोलत ।
तुका जातो वैकुंठाला वडपारवी हालत ॥६९७
देहूगांवींची हवा सांगते जनालोका ।
तुका जातो वैकुंठाला हालते नांदरुकी[1] ॥ ३९८

विठ्ठल विठ्ठल हांका मारितो उन्हाची ।
आम्ही चाललों वैकुंठाला छाती होअीना कुणाची
रुकमीण लेणं लेली सोन्याचं कांकण ।
तुकारामाचं उडुनी त्याचं गेलं मांडी कैलासी दुकान ॥ ४००
अिंद्रावणीचा डोह दिसतो काळानिळा ।
तुका जातो वैकुंठाला वर अुफावल्या माळा ॥
तुका तुका म्हणे तुका देहूच्या गांवांत ।
गुपित झाला बाओी अिंद्रावणीच्या डोहांत ॥
सरगींची वाट तुकारामानं पाहिली ।
अिंद्राणीच्या कांठ जीजा कशाला राहिली? ॥
आळंदीपासून पंढरी अैशी कोस ।
तुका ती रामाची दिंडी जाते बारी मास ॥
आळंदी करूनी वाट देहूची पुसयीतें ।
गेनुबा तुकाराम यांच्या त्रिफणी नांदते ॥ ४०५

संतांविषयींच्या सर्व ओव्यांमध्ये जनाबाओीसंबंधी ओव्या सर्वांत चित्ताकर्षक व मौलिक आहेत. राधा किंवा तुळस यांच्या बाबतींत ज्याप्रमाणे ओव्यांतून विठ्ठल-रुक्मिणी व राधा किंवा तुळस यांचा त्रिकोण निर्माण केलेला असतो त्याचप्रमाणे याहि ठिकाणीं विठ्ठल-रुक्मिणी व जनाबाओी यांचा त्रिकोण निर्माण केलेला आहे. जनाबाओीची विठ्ठलावर अनन्यभक्ति होती. त्याला आळविण्यांत ती अितकी तन्मय होत असे की विठ्ठल सदैव आपल्या सहवासांत आहे असा तिला भास होअी व तो आपल्याला दळूंकांडूं लागतो व प्रत्येक कामांत मदत करतो अशा तऱ्हेचे अुल्लेख तिच्या अभंगांतून आढळतात. त्यांवरच आधारून या ओव्या रचलेल्या आहेत. याहि पार्श्वभूमीवर रुक्मिणीच्या स्वभावास अुठाव दिलेला आहे. विठ्ठलाचें जनाबाओी-कडील विशेष लक्ष पाहून तिच्या ठिकाणीं जनाबाओीचा सवतीमत्सर जागृत झालेला दाखविला आहे. शेवटच्या दोन ओव्यांत जनीहि रुक्मिणीचा सवतीमत्सर करते अशी अस्फुट कल्पना दिसून येते:—

विठ्ठलाच्या अिथं जनीबाओी दासीपणा ।
अशी आठविती हळहळ नारायणा ॥४०६
पंढरपुरमधीं जनाबाओीचं सुखसोहळं ।
नकींचं पातळ नित बुक्यामधीं लोळं ॥४०७
रावळीं झाली चोरी जनाबाओीचा गेला तवा ।
विठ्ठलदेव बोल गस्त घाला नामदेवा ॥४०८
विठ्ठलाच्या घरीं साधु आलेत पावणं ।
विठ्ठलदेव बोल जनाबाओीशीं कर संतांशीं भजन ॥

विठ्ठल म्हण जनी जनी कीर्तनीं बसना ।
आबीरबुक्याची हिला गरमी सोसना ॥४१०
आशा करूं येरझाऱ्या जनी म्हणे पांडुरंगा ।
जनी म्हणे गोपीरंगा पाणी पुरव पांडुरंगा ॥४११
जनी बसली न्हायायाला पाणी नाहीं इसणाला ।
वेअूनी कावडी देव गेलेत गंगेला[2] ॥ ४१२
आबलुक मेवा आवडीला लोणी ।
जनी वनवासी म्हणूनि तिला पाणी[3] ॥४१३

१ किंवा "चैताच्या महिन्यांत चैनी पालव खुलला । तुका गेले वैकुंठाशीं मागं नांदुक हालला"॥
२ किंवा दुसरी ओळ "हातांत गडूतांब्या देव भरीत रांजणाला ॥"
३ किंवा "तुळशीच्या वहिणी तळतावरी लोणी । विठू जनीला घाली पाणी ।"

दळणाची पाटी विठू अुचलून बघी ।
विठू जनीला दळूं लागी ।।४१४
दळणाची पाटी ठेविली जात्यापुढं ।
विठ्ठलदेव बोल अुठ जनाबाअी अुजाडलं।।४१५
विठ्ठलदेव बोल माझ्या जनाला नाहीं कुणी ।
हातांत घेअूनी नाडाफणी जनाची घाली येणी[1] ।।
विठ्ठलदेव बोल जनी माझी वनवासी ।
चंद्रभागेमधीं धुणं धुतीया अुपाशीं ।।४१७
विठ्ठलदेव बोल जना माझी वनवासी ।
कथेच्या नादामधीं जना येतेया रानापाशीं।।४१८
विठ्ठलदेव बोल जना माझी कुणबीण ।
कुठं सांपडली तुला गिन्यानाची धन ।।४१९
विठ्ठलदेव बोल जना माझीच संवसार ।
तांब्याच्या अुतरंडीं नाग टाकिती धुंदकार ।।
विठ्ठलदेव बोल जना सुटना तुझी माया ।
मी जातों अंघोळीला चंद्रभागेला याव धोया।।
चंद्रभागेमधीं चंदनाच्या[2] शिळा ।
जनाबाअी धुवी धुणं देव विठ्ठल घाली पिळा।।
पंचामृत भोजन रुपया ठेवितें काढूनी ।
अिठ्ठलदेव बोल देतों जनीला घाडूनी ।।४२३
अिठ्ठल अिठ्ठल हाका मारिती रावळांत ।
हातीं टाळवीणी अुभा जनीच्या देवळांत ।।
विठ्ठल विठ्ठल हाका मारीत भडवी ।
अिठु जनाच्या पडवीं ।। ४२५
पंढरीखालतीं जनाबाअीची झोंपडी ।
हातांत टाळवीणा देव चालले तांतडी ।।
पंढरीखालतीं जनाबाअीचं सपारं[3] ।
देवा विठ्ठलाचं अंघोळीचं वाळतं धोतार ।।

अिठ्ठलदेव बोल जनी नको बसूं अिवानांत ।
घरीं दुमती म्हैस तिला पिळील कोण ? ।।
विठ्ठल पावणा जनाबाअीला तांतडी ।
साळीचे तांदुळ जना अुम्यांनं पाखडी ।। ४२९
भरली चंद्रभागा धोंडा बुडला न्हानथोर ।
देवा विठ्ठलाचा शेला जनी धुवती पायावर ।।
जनाबाअी धुवी धुणं देवा विठ्ठलाचा झगा ।
आबीरबुक्यानं दरवळली चंद्रभागा ।।४३१
पंढरपुरामधीं कशाची चोरी झाली ? ।
विठ्ठलाचा शेला जनाबाअीच्या अुशाखालीं ।।
रुकमीण बोल विठ्ठलदेवाला तुला जनीचं काय नातं
सुखाचं पाखरूं रावळीं आलं होतं ।।४३३
विठ्ठलाच्या पाया रुकमीण लोणी लावी ।
खरं सांग देअूराया जनी तुला कोण व्हावी ।।
चंदनाच्या पाटावरी रखुमाअी धुवती पाय ।
विठ्ठलदेव बोल जातो जनीला घालवाय ।।४३५
विठ्ठलदेव बोल कां ग रुक्मिणी रागरागं !
कथेच्या नादामधीं जना आलीया माझ्या मागं ।।
रुकमीण म्हणं देवा जनीचं नातं कोण ?
पांडुरंग म्हणं जनी आमची मायाबहीण ।।
रुक्मिणी बोल कोठं राहिली अिमानी ?
विठ्ठलदेव बोल माझ्या जनीला नाही कोणी ।।
रुसली रुकमीण जेवीना दूधपेढ ।
विठ्ठलदेव बोल तुला जनीचं भिंद पडं ।।४३९
विठ्ठल रुकमीण बोलती गुजगोष्टी ।
जनी कुधीनं शिव्या देती ।।५४०
विठ्ठल रुकमीण जोड्यानं पानं खाती ।
जनी कुधीनं वाडा लोटी ।।४४१

अितर संत किंवा भाविक लोकांवर खालीलप्रमाणे तुरळक ओव्या मिळतातः—

मायबापाअीची सेवा कुणी केली हंबीरानं ।
रोहीदासें[4] चांभारानं ।।४४२
पंढरी पंढरी अिठुरायाची नगरी ।
कुंडलीकाशेजारीं म्हार चोखुबा[5] बिगारी ।।४५३

पंढरपुरामधें आबीराला काय अुणं ।
कबीराची[6] सुन माप टाकिती सोप्यांतून ।।४४४
पंढरीचीं लोकं शिव्या देत्याती बोधल्याला[7] ।
भागीरथी सुन दाण करीती कबीराला ।।४४५

१ किंवा "विठ्ठलदेव बोल जना माझी कां नाहीं कोणी ?
आणे नाडाफणी, जना माझीच, घाले येणी ॥ "

२ किंवा "रंगशीळेवरी". ३. छप्पर.

४-५-६-७ रोहिदास, चोखा मेळा, कबीर व बोधला या सर्व विष्णुभक्तांच्या कथा "भक्तविजयां"त आहेत.

# राष्ट्रकूटकालीन मराठी

## कनकामरकृत करकण्डचरित*

(लेखक— श्री. ग. वा. तगारे, अेम्. अे., बी. टी.)

म. सा. पत्रिकेंतून गतवर्षी प्रसिद्ध झालेली पुष्पदन्तावरील लेखमाला[1] पुष्कळांना आवडली असें दिसलें. पुष्पदन्ताचें वाङ्मय व तत्कालीन महाराष्ट्राचें चित्र 'सह्याद्रीं'तून लौकरच प्रसिद्ध होणार असल्यामुळे पुष्पदन्तानन्तर लौकरच होअून गेलेल्या आणखी अेका महाराष्ट्रीय कवीची माहिती मी आज देत आहें; पण तत्पूर्वी माझी भूमिका थोडक्यांत मांडतों.

हिंदुस्थानांत बोलल्या जाणाऱ्या आर्यभाषा मध्ययुगीन प्राकृतांतून अर्वाचीन स्वरूपांत विकसित होण्यापूर्वी—सामान्यतः अि. स. ६००-१२०० या काळांत—त्या 'अपभ्रंश'नामक अवस्थेंतून गेल्या असें मानतात[2]. 'अपभ्रंश' वाङ्मय अर्वाचीन आर्यभाषांना कालदृष्ट्या अत्यंत जवळ असल्यामुळे अर्वाचीन भाषांचा विकास व प्राचीनतम स्वरूप या वाङ्मयांत आढळण्याची स्वाभाविक अपेक्षा आहे. अपभ्रंश वाङ्मयावरील कृत्रिमपणाचा आरोप मान्य करूनसुद्धा त्याचें प्रादेशिक वर्गीकरण करून व त्यांचा कालानुक्रमाने होणारा विकास पाहून अर्वाचीन आर्यभाषांच्या प्रथमावस्थेशीं त्यांची तुलना करणें अुद्बोधक होअील व अर्वाचीन आर्यभाषांचा प्रारंभकाल निश्चित करतां येअील अशी कल्पना आहे.

ज्ञानेश्वरपूर्वकालीन शिलालेख व मराठीचे वाङ्मयीन अुल्लेख लक्षांत घेतां[3] राष्ट्रकूटकाळांत मराठीला अस्तित्व होतें असें म्हणण्यांत अनैसर्गिक कांहीच नाही. राष्ट्रकूट राजे कानडी होते हें मान्य करूनसुद्धा पुष्पदन्तवाङ्मयाचें मराठीपण अबाधित राहतें, कारण राष्ट्रकूटांनी आपली भाषा वा पंथ अितरांवर लादल्याचा पुरावा नाही आणि पुष्पदन्ताने आपलें वाङ्मय त्याचा प्रधान भरत याच्यासाठी लिहिलें आहे व तो कन्नड होता याचा पुरावा अजून अुपलब्ध नाही. शिवाय पुष्पदन्ताच्या भाषेचें प्रत्यक्ष प्रमाण समोर असतां बाकीच्या चिकित्सेचें कारण अुरत नाही.

सारांश, जैनपंथाच्या अूर्जितकाळीं जैन ग्रंथकाराने लिहिलेली प्राकृतप्रधान ग्रंथगत भाषा व त्यानंतर तीन शतकांनी अेका विद्वान ब्राह्मण ग्रंथकाराने अर्थगांभीर्य व सौष्ठव या गुणांत मऱ्हाटी संस्कृतच्या तोलाची आहे हें दाखवण्याच्या महत्त्वाकांक्षेने लिहिलेली संस्कृतप्रचुर भाषा यांच्या आधारभूत बोली अेकच असून अेक दुसरीचें पूर्वरूप आहे अेवढेंच मला म्हणावयाचें

---

* कारंजा जैन सेरीज ग्रंथ ४ था. सम्पादक प्र. हिरालाल जैन, अेम्. अे., अेल्अेल्. बी., किंग अेडवर्ड कॉलेज, अमरावती

१ म. सा. पत्रिका जानेवारी, अेप्रील, नोव्हेंबर १९४१.

२ ग्रियर्सन— Linguistic Survey of India, Vol. I, Part I.

३ म. सा. पत्रिका जानेवारी १९४१ मध्ये कांहींचा अुल्लेख केला आहे. याशिवाय भोजाच्या सरस्वतीकण्ठाभरणांत १.११८.१५८ (काव्यमाला आवृत्ति पृ.९४) १० व्या शतकांतील कांही शब्द दिले आहेत. हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरणांत ८.२.१७४ वरील टीकेंत त्याने महाराष्ट्रांतील बोलभाषेंतील कांही शब्द देअून बाकीचे शब्द वऱ्हाड-महाराष्ट्राच्या बोलींत पाहा असें सांगितलें आहे.

आहे. प्रत्ययप्रक्रिया व प्रादेशिक शब्द हे माझ्या म्हणण्याचे भाषिक पुरावे असून ग्रंथकारांची स्थलकालनिश्चिति हें बाह्य प्रमाण आहे. या दोन कालिक स्वरूपांतील भेद शिवकालीन मराठी व आजची भाषा यांच्याअितकासुद्धां नाही.

पुष्पदन्त व ज्ञानेश्वर यांच्यामधील काळांत वैदिक पंथाचें पुनरुज्जीवन होअून संस्कृत भाषेला अमर्याद लोकप्रियता मिळाली. देशी भाषा मागे पडल्या. बहुजनसमाजापर्यंत प्राचीन विद्यांचा संदेश पोचविण्यासाठी देशी भाषांची जरूर लागते व त्यांचें संस्कृत भाषेशीं समानत्व पटवण्यासाठी महानुभावांनी व मुकुंदराज-ज्ञानेश्वरांनी देशी भाषेंत ग्रंथरचना करावयाचा अट्टाहास केला व मऱ्हाटीची थोरवी पटवली. ज्ञानेश्वरकालीन मराठीच्या संस्कृत-प्राचुर्याची कारण-परंपरा अशी आहे.

'अपभ्रंश' समजल्या जाणाऱ्या वाङ्मयांतून मी राष्ट्रकूटकालीन मराठीचें स्वरूप दाखवीत असल्यामुळे अपभ्रंश व मराठी यांच्या संबंधाबद्दल प्रा. ब्लोक यांनी घेतलेले आक्षेप विचारांत घेण्याचें कारण नाही तथापि त्यांची विचारसरणी लक्षांत घेण्याअितके ते महत्त्वाचे आहेत हें निश्चित.

La Formation de la Langue Marathe या मराठीवरील अुत्कृष्ट ग्रंथांत[५] त्यांनी मराठी ही पुढील कारणांमुळे अपभ्रंशापासून झाली नाही असें म्हटलें आहे.

(१) व्यंजनानंतर र येणाऱ्या संयुक्त व्यंजनांचा अभाव व स चा ह न होणें.

(२) प्रत्ययप्रक्रियेंतील महाप्राणाचा अभाव.

(३) प्रथम व द्वितीय या पुरुषांचीं आरप्रत्ययान्त षष्ठ्यन्त विशेषणें नसणें.

डॉ. ब्लोकनी आपलें मराठीवरील पुस्तक लिहिलें त्या वेळीं फारसें अपभ्रंश वाङ्मय अुपलब्ध नेव्हतें त्यामुळे त्यांना प्राकृत व्याकरणकारांनी दिलेलीं अपभ्रंशाचीं लक्षणें मान्य करावीं लागलीं. शिवाय पिशल किंवा ब्लोक यांनी अभ्यासलेले प्राकृत व्याकरणकार महाराष्ट्रा-बाहेरील असून महाराष्ट्रीय 'अपभ्रंशा'ची कल्पना ते देत नाहीत. तसेंच व्याकरणकारांचें 'अपभ्रंश' व प्रत्यक्ष 'अपभ्रंश' वाङ्मय यांचे संबंध अनिश्चितै आहेत. यामुळे या अनिश्चित व मराठीशीं असंबद्ध अशा पुराव्यावरील निर्णय संशयास्पद आहे. आता या आक्षेपांचा आपण क्रमवार सामान्य विचार करूं:—

(१) प्रा. ब्लोक यांच्या मतें व्यंजनानन्तर र राहणें किंवा लोपणें हें प्रादेशिक लक्षण

---

४ पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतील डॉ. रा. ग. हर्षे यांना शक १२७२ मधील हस्तलिखित ज्ञानेश्वरी सच्चिदानंदबावांच्या घराण्यांतून मिळाली असें कळतें. तिच्यांतील कांही भाग प्रसिद्ध झाल्यावर याबद्दल अधिक लिहीन.

५ FLM § 22 त्यांचें अलीकडील दुसरें पुस्तक L' Indo-Aryen हें नुकतेंच मला मिळाल्या-मुळे त्याचा विचार येथे केला नाही.

६ प्रस्तुत पुस्तक १९१४ सालीं प्रबंधस्वरूपांत बाहेर पडलें. अपभ्रंशांतील पहिला महत्त्वाचा ग्रंथ 'भविसत्तकहा' याकोबीनी १९१८ त प्रसिद्ध केला. अपभ्रंशावरील ब्लोक यांचे आधारग्रंथ म्हणजे पिशल-कृत Grammatik der Prakrit Sprachen (सन१९००), Materialen zur Kenntnis des Apabhrams'a (सन १९०२) व पिशलसंपादित हेमचंद्र देशीनाममाला. ४०-४२ वर्षां-पूर्वी लिहिलेल्या या ग्रंथांच्या मर्यादा आता स्पष्ट होत चालल्या आहेत.

७ ह्या प्रश्नाचा मी सध्या अभ्यास करीत असल्यामुळे यावर आज मत न देतां या वर्षअखेरपर्यंत मी कांही तरी निश्चित सांगूं शकेन अेवढें अभिवचन देअूं शकतों.

आहे. कदाचित्, अशोकाच्या शिलालेखांतील शहाबाजगडी व मान्सेरा येथील शासनांत तो आढळतो, अितरत्र दिसत नाही, यावरून त्यांची तशी समजूत झाली असल्यास न कळे.

पण भारतीय आर्यभाषांचा विकास विहंगम दृष्टीने अवलोकन करतां अघोषवर्णांचा घोष होणें (voicing the voiceless consonants) अनादि व असंयुक्त क-ग-च-जादि वर्णांचा लोप किंवा य-व-ह श्रुति होणें, संयुक्त व्यंजनांतील रकार लोपणें वगैरे सामान्य प्रवृत्ति सर्व आर्यभाषांत असल्या तरी सर्व प्रान्तांत त्या समकालीन कधीच नव्हत्या. अितकेंच नव्हे तर अेकाच भाषेंत सर्व अघोषवर्णांचा घोष अेकदम समकालीन झाला, किंवा क-ग-च-जादि वर्णांचा लोप अेकाच वेळीं होअून या श्रुति रूढ झाल्या असा पुरावा नाही. तसें होणें अनैसर्गिक आहे. या प्रवृत्तींचा विकास कित्येक शतकें होअून मगच भाषाशास्त्रज्ञ त्या सर्वांना अेकत्र गुंफून त्यांच्या प्रक्रियेचे सामान्य नियम बसवतात. अशोकाच्या वायव्यसीमेकडील शासनांतील रयुक्त संयुक्त व्यजनांचा अर्थ अेवढाच की त्या काळीं वायव्येकडील भाषांची वर्णप्रक्रिया अेका विशिष्ट अवस्थेपर्यंत पोंचली असून रकारलोपाची प्रवृत्ति अजून सुरू व्हावयाची होती व अितर प्रान्तांतील भाषा तिच्यापुढील अवस्थेंत गेल्या होत्या. सारांश, हें कालिक लक्षण आहे, प्रादेशिक नव्हे.[८]

प्राकृत व्याकरणकारांच्या अपभ्रंशांत मात्र या लक्षणाला पारम्परिक रूप आलें होतें असें चण्डापासून मार्कण्डेयापर्यंत (अि. स. ६००-१७००) होअून गेलेल्या पूर्व, पश्चिम, दक्षिण हिंदुस्थानांतील व्याकरणकारांवरून वाटतें. कारण अुदाहरणेंच नव्हे तर सूत्रांची भाषा-शब्द-सुद्धा ते आपल्या पूर्वींच्या वैयाकरणांपासून अुचलतात. हीच परम्पराप्रियता प्राचीन हस्तलिखितांतून आढळते. पुष्पदन्ताच्या महापुराणाच्या हस्तलिखितांत ऋ व संयुक्तव्यंजनांतील र कायम ठेवणारी अेक हस्तलिखित परम्परा (Mss.Tradition) व दुसरी यांचा लोप करणारी आहे[१०]. यामुळे भाषेचें स्वरूप थोडें गूढ राहतें पण त्याचा अर्थ भाषेंत ऋचा व रयुक्त व्यंजनांचा अभाव होता असा नव्हे. डॉ. वैद्य व प्रा. जैन यांनी संपादिलेल्या महापुराणादि पुष्पदन्तवाङ्मयांत व कनकामराच्या करकण्डचरितांत तो आहे अेवढें निश्चित.

प्रत्ययप्रक्रियेंत स चा ह होतो हें आपण पुष्पदन्तावरील लेखमालेंत पाहिलें आहे. कनकामराच्या प्रत्ययप्रक्रियेंत हीच गोष्ट आढळते.

---

८ डेक्कन कॉलेजच्या प्रा. कत्र्यांनी ही गोष्ट माझ्या नजरेस आणल्याबद्दल त्यांचा मी आभारी आहें.

९ अुदाहरणर्थ, याच प्रवृत्तीसंबंधी पुढील सूत्रें पहा—

(१) चण्ड (६ वें शतक) न लोपोऽपभ्रंशेऽधो रेफस्य । ३.३७.

(२) नमिसाधु (११ वें शतक)-चें आधारभूत व्याकरण } न लोपोऽपभ्रंशेऽधो रेफस्य । तद्वद्भूतोऽपि काप्यधोरेफः क्रियते । रुद्रटाच्या काव्यालंकार २.१२ वरील टीका.

(३) हेमचन्द्र (१२ वें शतक) वाधो रो लुक् । अभूतोऽपि क्वचित् । ८.४-३९८-९९

(४) त्रिविक्रम (१३ वें शतक) रो लुक्मधः । क्वचिद्भूतोऽपि । ३-३.५-६

(५) क्रमदीश्वर ( ,, ) ५.२, ५.५, ५.१६ पाहा.

(६) पुरुषोत्तम (११ वें शतक) व्यासादीनामादे रधो रः । र ऋतौ प्रकृत्या च । १७.१४-१५.

(७) मार्कण्डेय (१७ वें शतक) व्यासादेर्यस्य रेफः स्यात् । प्रकृत्या रऋतौ क्वचित् । १७.३-४.

(८) रामशर्मतर्कवागीश (१७ वें शतक) ३.२.४ पाहा.

"प्राकृत व्याकरणकार व अपभ्रंश" या विषयावर मी स्वतंत्र लिहीत असल्यामुळे व मराठी वाचकांना त्यांत स्वारस्य वाटण्यासारखें नसल्यामुळे या विषयांत येथे खोल न जातां प्राकृत व्याकरणकारांचे पुरावे चिकित्सक बुद्धि जागृत ठेवूनच स्वीकारावे लागतात अेवढें सुचवतों.

१० डॉ. अुपाध्ये– योगिंदुकृत परमात्मप्रकाश– प्रस्तावना पृ.५६ टीप २.

११ म. सा. पत्रिका जाने., अेप्रिल नोव्हें. १९४१.

(२) प्रत्ययप्रक्रियेंतील हकार.

क्रियापदरूपांतील अहि,—अहु— अहिं प्रत्ययांपासून झालेलीं रूपें गुजरायेंत दिसतात व मराठींत दिसत नाहीत असें त्यांचें मत आहे. त्यांनी Journal Asiatique 1912. I पृ. ३३४ मधील ज्या लेखाचा हवाला दिला तो लेख मजसमोर नाही त्यामुळे मी या मुद्यावर सविस्तर लिहूं शकत नाहीं पण पुष्पदन्ताच्या भार्षेतील क्रियापदांच्या प्रत्ययप्रक्रियेंत हकार होतो[१२] व ज्ञानेश्वरकालांत पोथींगत भाषेंत हकार लोप झाला असें आपण पाहिलें आहे.

मराठी प्रत्ययप्रक्रियेंत हकारलोप (dis-aspiration) होण्याचें कारण वैदिक पंथाच्या वर्चस्वानंतर मराठ्यांनी मातृभाषेची आबाळ करून संस्कृतचा केलेला पुरस्कार. अेरवी प्राचीन महानुभावांना किंवा मुकुंदराज-ज्ञानेश्वरांना मराठीसाठी अितक्या हिरीरीनें झुंजण्याचें कांहीच कारण नव्हतें.[१३] गुजराथ हा जैनपंथाचा बालेकिल्ला आहे. अपभ्रंशांतील बरीच ग्रंथरचना जैनांची आहे आणि 'गुजराथी' या अर्वाचीन स्वरूपांत त्या प्रान्तांतील भाषा विकसली तरी अपभ्रंशांत ग्रंथरचना चालू होती.[१४] त्यामुळे गुजराथमधील अपभ्रंशाची प्रत्ययप्रक्रिया (जी सुप्रसिद्ध गुर्जर व्याकरणकार हेमचन्द्र यानें आपल्या प्राकृत व्याकरणांत दिली आहे) अर्वाचीन गुजराथी प्रत्ययप्रक्रियेला अितकी सदृश आढळते.

(३) पुरुषवाचक सर्वनामांचीं आरप्रत्ययांत षष्ठयंत विशेषणें.

हमार, तुम्हार अशीं प्रथम व द्वितीयपुरुषांचीं षष्ठयंत विशेषणें पुष्पदन्तवाङ्मयांत आढळतात. त्याहून जरा कमी प्रमाणांत कनकामरकृत करकण्डचरितांत आढळतात. अि. स. १०००-१३००पर्यंतचें महाराष्ट्रांत रचलें गेलेलें वाङ्मय (असल्यास) प्रसिद्ध होअीपर्यंत याबद्दल कोणत्या प्रमाणांत हीं रूपें मराठींतून कमी होत जाअून १३ व्या शतकांत लोप झाला हें आज सांगतां येणार नाही. पण भाषेच्या इतिहासांत शब्द व प्रत्ययांची अुत्पत्ति-स्थिति-लय हा क्रम चाललेला असतो. ज्ञानेश्वरदर्शनांत ज्ञानेश्वरींतील कांही गुजराथी शब्द म्हणून दिलेला 'रसोअि' शब्द पुष्पदन्दवाङ्मयांत पुष्कळदा येतो पण ३-४ शतकांनंतर त्याचा लोप झालेला आढळतो. तृतीयेच्या अनेकवचनाचा हिं प्रत्यय मध्ययुगीन प्राकृतापासून १९ व्या शतकापर्यंत महाराष्ट्रांत रूढ होता पण त्याचा आज लोप झाला आहे. तीच गोष्ट अुपर्युक्त विशेषणांची. हा विकास कोणता व तो केव्हा, कसा होत गेला हें अैतिहासिक भाषाशास्त्र सांगतें पण त्याची कारणमीमांसा त्याच्या क्षेत्राबाहेर आहे.

प्रो. ब्लोक यांनी घेतलेले आक्षेप त्यांच्या आधार ग्रंथांच्या मर्यादा व मराठी मातृभाषा नसल्यामुळे त्यांना मराठीच्या बोलभाषांची तितकी कल्पना नसल्यामुळे असावेत. पण यामुळे

---

१२ म. सा. पत्रिका जाने., अेप्रिल, नोव्हें. १९४१.

१३ हकारयुक्त बोलण्याची व गाण्याची लकब अजून खालच्या वर्गांतील लोकांत आढळते. मुद्रणकलेच्या प्रसारामुळे मराठीच्या प्रादेशिक बोली व जातीय वैशिष्ट्यें नाहीशीं होत चाललीं आहेत. भाषा ध्वनिमय असते हें तत्त्व लक्षांत घेतां या बोली नाहीशा होण्यापूर्वी त्यांचें ध्वनिमुद्रण करणें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे. हॉव, हेठ, माह्या, अि० प्रादेशिक शब्द व त्यांचे विशिष्ट अुच्चार मराठीच्या प्राचीन अितिहासावर व विकासावर प्रकाश पाडणाऱ्या आहेत. त्यांचा लोप होणें अपरिहार्य असलें तरी ध्वनिमुद्रितावर संग्रह करणें आपल्याला महत्त्वाचें नाही का?

१४ हेमचंद्राच्या व्याकरणावरून अि. स. च्या १२ व्या शतकांतच गुजराथमधील 'अपभ्रंश' मृत्युपंथाला लागला असें दिसतें. हेमचंद्राच्या पृथक्करणांतील महाराष्ट्री व शौरसेनी अपभ्रंशांतील गोंधळ अेरवी अुकलत नाही.

त्यांच्या ग्रंथाचें महत्त्व मुळींच कमी होत नाही. मराठींचें अितकें सुन्दर व शास्त्रशुद्ध विवेचन कोणत्याहि मराठी वा अिंग्रज लेखकाने केलें नाही व करणारांना तें तितकें जमलें नाही.

मोल्स्वर्थ–कँडीचा कोश आणि भाषाशास्त्रानभिज्ञ सरकारी अधिकाऱ्यांकडून नोंदवलीं गेलेलीं अेका बायबलकथेचीं बोलभाषांतील रूपान्तरें आणि त्यांवर आधारलेला Linguistic Survey यांच्या मर्यादा आज सांगायला का हव्या आहेत ? प. वा. ग्रियर्सन किंवा प्रा. कोनाउ यांना नांवें ठेवण्याचा अुद्देश नाही. त्यांचें कार्य अितकें मोठें व बिकट होतें की त्यांनी स्वीकारलेल्या मार्गाखेरीज त्या काळीं गत्यंतरच नव्हतें. प्रत्येक बोलभाषेच्या नमुन्याचा शब्दन् शब्द तीन चार वेळां निरनिराळ्या दृष्टीने तपासून त्यांनी तीस वर्षांच्या परिश्रमाने निर्माण केलेला प्रचण्ड ग्रंथ व त्यांनी लिहिलेलीं बोलभाषांचीं व्याकरणें बहुमोल आहेत. पण समोरील नमुनेच सदोष असतील तर ते तरी काय करणार ?

ग्रियर्सन, कोनाउ किंवा ब्लोक यांच्या कृतींतील दोष त्यांच्या अभ्यासपद्धतीचे वा तर्कदुष्ट निर्णयाचे नसून त्यांच्या समोरील साहित्यांतील आहेत अेवढेंच मला म्हणावयाचें आहे. आणि त्यांच्या चुकांपासून आपण धडे घेअून त्यांनी आरंभलेल्या कार्यांत अधिकाअधिक प्रगति करणें हें त्यांचें ऋण आपण लागत आहों.

प्रो. ब्लोक यांच्या आक्षेपांचा सामान्य विचार केल्यानंतर प्रथमतः कनकामर या कवीच्या महाराष्ट्रीयत्वाचीं प्रमाणें देतों.

(१) कनकामराने हें पुस्तक 'आसाअिय' (सं. आशापुरी) येथे लिहिलें. माझ्या मतें 'आसाअिय' नगर हें निजामराज्यांतील अि. स. १८०३ मध्ये अिंग्रज-मराठ्यांचें युद्ध झालेलें 'असअी' नामक गांव असावें. कारण प्रस्तुत ग्रंथाच्या ४ थ्या व ५ व्या संधींत सविस्तर वर्णन केलेलीं तेरापूरचीं लेणीं असअीजवळच असून तीं आज धाराशिवाचीं लेणीं म्हणून प्रसिद्ध आहेत.

Burgess च्या Archaelogical Survey of Western India च्या तृतीय खण्डांतील धाराशिवाच्या लेण्यांच्या वर्णनाचा तपशील प्रस्तुत ग्रंथांतील तेरापूर लेण्यांच्या तपशीलाशीं जुळतो. असअी, तेरापूर (अर्वाचीन निजाम राज्यांतील 'तेर') व धाराशिव (अर्वाचीन अुस्मानाबाद) हीं गांवें जवळ जवळ असून प्राचीनकाळीं राष्ट्रकूटांच्या राज्यांत मोडत होतीं.

(२) राष्ट्रकूट राजा तिसरा कृष्ण (पुष्पदन्ताच्या भाषेंत 'कण्ह,' कनकामर याचा 'कण्ण' असा अुल्लेख करतो) याने चेर, चोल, पाण्डय, सिंहल अि० दाक्षिणात्य राजांवर विजय मिळविले. कनकामराने तेच विजय आपल्या कथानायकाने मिळविले असें दाखवलें आहे.

(३) ग्रंथकाराची भाषा व पुष्पदन्ताची भाषा यांत अत्यंत साम्य वा अभिन्नता असून दोघे यादवकालीन मराठीचें पूर्वरूप दाखवतात.

(४) आसाअिय नगर व करकण्डचरितांतील अुल्लेखित राजेरजवाड्यांचीं नांवें महाराष्ट्राबाहेरील राजवटींत सांपडत नाहीत.

सारांश, कनकामराला महाराष्ट्रीय समजण्यास कांहीच प्रत्यवाय दिसत नाही.

## व्यक्तिदर्शन

प्रस्तुत ग्रंथांतील प्रशस्तिपद्यावरून (१०.२८-२९) हा ग्रंथकार जन्माने ब्राह्मण असून तो चन्द्रऋषीचा वंशज होता. त्याच्या गुरूचें नांव मंगलदेव असून कदाचित् त्याच्या अुपदेशा-

मुळे हा दिगंबरपंथांत शिरला असावा. असअी येथे होअून गेलेले किंवा ज्यांच्या राज्यांत असअी असावी अशा विजयपाल, भूपाल व कण्ण (कर्ण, कृष्ण?) या राजांचा तो अुल्लेख करतो. या राजांचीं नांवें कलचूरी, कालिंजर व राष्ट्रकूटघराण्यांतील राजांच्या नांवांशीं जमतात पण 'आसाअिय' नगराचा अुल्लेख लक्षांत घेतां राष्ट्रकूट राजा तिसरा कृष्ण अभिप्रेत असावा व विजयपाल व भूपाल हे असअीचे सरदार असावेत असा तर्क वाहतो.[१५]

प्रशस्तिपद्य १.२ वरून हा ग्रंथकार मान्यखेट येथील पुष्पदन्तानन्तर होअून गेला असावा असें दिसतें. यावरून कनकामराचा काल अि. स. ९७५-१०२५ ठरतो.

## करकण्डचरित

'करकण्ड' हा जैन व बौद्ध पंथाच्या मतें फार प्राचीन काळीं (अि.स.पूर्वी ६००-८००) होअून गेलेला राजर्षि असून, त्याला स्वतःच्या प्रयत्नाने साक्षात्कार होअून, मतप्रसार न करणाऱ्या 'प्रत्येक बुद्ध' नामक सत्पुरुषवर्गांत पहिलें स्थान आहे. अुरलेले तीन 'प्रत्येक बुद्ध' म्हणजे पांचालदेशांतील राजा दुर्मुख, विदेहदेशचा राजा नमि व गान्धारांतील नग्नजित् (?) होते[१६]. 'प्रत्येक बुद्ध' अवस्थेंतील मनुष्य मुण्डन करून, पिवळी कफनी धारण करून सर्वसंगपरित्याग करून हिमालयांतील गुहेंत राहतो अशी बौद्धांची समजूत आहे.

करकण्डकथा मध्ययुगीन लेखकांना अितकी आवडली की त्यावर १६ पुस्तकें लिहिलीं गेलीं.[१७]

कनकामराने दिलेली करकण्ड-कथा थोडक्यांत अशी आहे :

करकण्ड हा अंग देशचा राजा धाडीवाहन (जातककथेंत दहिवाहन व संस्कृत कथेंत दधिवाहन) याचा मुलगा. हा पोटांत असतां त्याच्या आअीचे राजासह हत्तीवर बसून हिंडण्याचे डोहाळे पुरवले जात असतां तो हत्ती पिसाळला व राजा-राणीची ताटातूट झाली व याचा जन्म दन्तिपुराजवळील स्मशानांत झाला. तें मूल मातंग झालेल्या अेका शापभ्रष्ट विद्याधराने शापमुक्ततेसाठी वाढवून त्याचा विद्याभ्यास करवून घेतला. त्याच्या हाताला कण्ड (a dry scab) असल्यामुळे त्याचें नांव करकण्ड ठेवलें. करकण्डाची आअी राणी पद्मावती मात्र समाधिगुप्त मुनीचा अुपदेश घेअून विरक्त झाली.

---

१५ प्रा. जैन व मी या बाबतीत सहमत आहोंत. करकण्डचरित प्रस्तावना पृ. ४१.

१६ करण्डु नाम कलिंगानं गन्धारानञ्च नग्गभि ।
निमिराजा विदेहानं पञ्चालानञ्च दुम्मुखो । कुम्भकारजातक (क्रम ४०८)

अुत्तराध्ययनसूत्र (श्वेतांबर जैन आगमांतील अेक ग्रंथ) पुढील यादी देते.

करकण्डू कलिंगेसु पंचालेसु य दुम्मुहो ।
नमी राया विदेहेसु गन्धारेसु य नग्गअी ।।१८.४६।।

डॉ. चार्पेंटियरनी 'प्रत्येक बुद्ध'चरितावरील आपल्या पुस्तकांत — Paccoka-buddhageschichten- करकण्डूचरितासंबंधी सर्व भारतीय कथा गोळा केल्या आहेत. पण वैदिक पंथाच्या पुराणांत करकण्डचरिताशीं संबद्धकथा त्यांना आढळली नाही असें दिसतें.

१७ प्रा. जैन— करकण्डचरित प्रस्तावना पृ. ३२-३३.

दन्तिपुरचा राजा निपुत्रिक वारल्यानंतर प्रधानमंडळाने हत्तीच्या सोंडेंत जलकुंभ देअून भावी राजास अभिषेक करण्यास सांगितलें. हत्तीने थेट श्मशानांत येअून मांगाच्या घरांत वाढलेल्या करकण्डाला अभिषेक केला. अशा हीन जातींतील कुमाराला राजा करण्यास लोक कचरत असतां तो शापभ्रष्ट विद्याधर मातंगयोनींतून मुक्त होअून त्याने मुलाचा कुल-वृत्तान्त सांगून त्या लोकांची खात्री पटविली व करकण्ड दंतिपूरचा मूर्धाभिषिक्त राजा झाला, व त्याच्यावर आसक्त झालेल्या काठेवाडच्या राजकन्येशीं– मदनावलीशीं– त्याचें लग्न झालें.

पुढे लौकरच अंग देशाचा राजा (व त्याचा बाप) धाडीवाहन याने करकण्डास आपलें सार्वभौमत्व मान्य करण्यास सांगितलें. करकण्डाने तें अमान्य केलें. अितकेंच नाही तर गंगापार होअून अंग देशावर स्वारी केली. त्यांत अुभयपक्षांचा बराच नाश झाला. अितक्यांत राणी पद्मावती— जी आता श्रमणी झाली होती— तिने बापलेकांची ओळख पटवून देअून युद्ध थांबविलें व राजा धाडीवाहनाने करकण्डास राज्यपद देअून संसारत्याग केला.

आपल्या राज्याचा बंदोबस्त केल्यानंतर करकण्डाने चोड, चेर व पाण्ड्य देशांना नमविण्याचें ठरवलें; पण तेथील राजांनी त्याच्या वकिलाला धुडकावून लाविल्यामुळे करकण्डाने त्या राजांच्या मस्तकावर पाय न दिल्यास संसारत्याग करण्याची प्रतिज्ञा करून दक्षिणेंत स्वारी केली. वाटेंत तेरापूरजवळ (निजामराज्यांतील अर्वाचीन तेर, अुस्मानाबाद जिल्हा) त्याचा मुक्काम पडला असतां तेथील राजा शिव याने ह्याला भेट दिली व बोलतां बोलतां जवळील टेकडीवर अेक हजार खांबी लेणें असून अेक हत्ती टेकडीच्या शिखरावरील वारूळाची रोज पूजा करतो. असें सांगितलें. करकण्डाने शिवाबरोबर जाअून त्या दोन्ही गोष्टी पाहिल्या, व वारूळ खणून पाहतांच त्याला पार्श्वनाथाची (२३ वा तीर्थंकर) मूर्ति सांपडली. ती त्याने अेका गुहेंत असलेल्या सिंहासनावर स्थापली व तेथे बंद केलेल्या अेका झऱ्याचा त्याने शोध लावला.

त्या जुन्या लेण्याचा अितिहास विचारतांच दक्षिणविजयार्ध पर्वतावरील नील व अमितवेग या दोन विद्याधर-राजकुमारांनी तेरापूर येथे राज्य स्थापन करून जैनपंथ स्वीकारला व त्यांनी हें पार्श्वनाथाचें लेणें बांधलें. अुत्तरविजयार्ध पर्वतावरील दोन विद्याधरांनी लंकेहून परत येत असतां मलय देशांतून अेक सुंदर जिनमूर्ति आणून या टेकडीवर ठेवली. पण नंतर ती तेथून हलेनाच. ही येथेच स्थापन होणार असें भविष्य अेका मुनीकडून अैकून ते अुत्तर-विजयार्ध पर्वतावरील विद्याधर मुनि बनले. त्यांपैकी दांभिकपणामुळे अेक हत्तीच्या जन्माला गेला, व तो या वारुळाची पूजा करतो. करकण्डाने नंतर त्या ठिकाणीं आणखी दोन लेणीं खोदविलीं.

तेरापूरच्याच मुक्कामांत अेक रानटी हत्ती येअून आपल्या छावणींत गोंधळ माजला आहे असें अैकतांच राजा त्याचा समाचार घेण्यास बाहेर पडला, तोंच तो हत्ती नाहीसा होअून राणी मदनावली नाहीशी झाली असें कळलें. तिचा पुष्कळ ठिकाणीं कसून शोध करूनहि पत्ता लागला नाही. राजाला अतिशय दुःख झालें. तेव्हा देवयोनींत गेलेल्या राजाच्या पोपटाने तिला अेका विद्याधराने नेली आहे व तूं आपल्या दक्षिणदिग्विजयाहून आल्यानंतर तुला ती परत मिळेल असें आश्वासन दिलें व अशा गोष्टी होअूं शकतात याबद्दल नरवाहनदत्ताची (कथा-सरित्सागरांतील) हकीकत सांगितली.

नंतर करकण्डाने सिंहलद्वीपावर स्वारी केली व तेथील राजधानीजवळ मुक्काम टाकून गंमत म्हणून अेका प्रचण्ड वटवृक्षाचें प्रत्येक पान बाण मारून अुडवलें. ही हकीकत अैक-

तांच तेथील राजाने त्याला आमंत्रण दिलें व त्याला पाहतांच राजकन्या रतिवेगा त्याच्यावर मोहित होऊन त्या दोघांचें लग्न झालें.

करकण्ड आपल्या नवपरिणीत वधूसह परत येत असतां पाण्यांत अेका प्रचण्ड माशाने त्यांच्या नावेवर हल्ला चढविला. करकण्डाने आपली तरवार अुपसून त्याच्यावर समुद्रांत अुडी घातली. त्यासरशी अेका विद्याधरराजकन्येने त्याला लांबविलें व तिलकद्वीपांत नेअून त्याच्याशीं लग्न केलें. करकण्डानेहि त्या विद्याधर राजाच्या शत्रूंचा निःपात करून विद्याधरांना आपलें स्वामित्व मान्य करावयास लाविलें.

अिकडे राणी रतिवेगा समुद्रकिनाऱ्यावर पोचली, पण आपला पति करकण्ड परत आला नाही हें पाहून तिने देवी पद्मावतीची अुपासना केली व देवीने प्रसन्न होअून करकण्डाची हकीकत सांगून तो सुखरूप तुला भेटेल व अशीं माणसें परत येतात, हें पटवण्यासाठी अरिदमन राजाची हकीकत सांगितली, आणि लौकरच करकण्ड आपल्या विद्याधरपत्नीसह परत आला व त्याने द्रविड देश जिंकून चोड, चेर व पाण्ड्य राजांना नमविलें. पण त्यांच्या मुकुटांना पादस्पर्श करतांना त्यांवर जिनमूर्ति आहेत हें त्याला आढळून आल्यावर त्याला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला व त्यांचीं राज्यें त्यांना परत केलीं. पण त्यांनी आपल्या मुलांस गाद्या देण्यास सांगून तपश्चर्येसाठी वनांत प्रयाण केलें. करकण्ड परत तेरापूरला परतला व तेथें त्याची पत्नी मदनावली ही ज्या विद्याधराने नेली होती, त्याने परत आणून आपण हा गेल्या जन्मांतील सूड अुगवण्यासाठीं केलें, असें सांगून राजाची क्षमा मागितली.

करकण्ड आपल्या सर्व पत्न्यांसह परत अंग देशांत आला आणि चम्पानगरींत त्याने बराच काळपर्यंत सुखाने राज्य केलें.

अेके दिवशीं राजा आपल्या दरबारांत असतां शीलगुप्त नामक साधू नगराजवळ आला आहे, असें कळल्यावरून तो त्याच्या दर्शनास निघाला. वाटेंत अेका स्त्रीचा आपल्या मृत बालकाबद्दल आक्रोश अैकून राजाच्या मनांत वैराग्य निर्माण झालें व अशा मनःस्थितींत तो तेथे पोचला असतां शीलगुप्ताने करकण्ड राजाला तो गेल्या जन्मांत तेरापूर येथे गुराखी असतां जिनाला भक्तिभावाने फूल अर्पण केल्यामुळे हा राजकुलांत जन्म मिळाला. पण त्या वेळीं स्वच्छ हातपाय धुतले नसल्यामुळे या जन्माला हाताला कण्ड निर्माण झाली असें सांगितलें. तसेंच त्याची माता पद्मावती हिला गेल्या जन्मींच्या अनैतिक आचरणामुळे या जन्मीं हा त्रास झाला. आणि त्याची पत्नी मदनावली राजाने आपल्या पोपटाचें नागापासून रक्षण केल्यामुळे विद्याधर जन्मांत गेलेल्या त्या नागाने सूडबुद्धीने नेली होती असें सांगितलें.

हें सर्व अैकून राजाला संसारत्याग करावा असें वाटूं लागलें. अितक्यांत त्याची आअी पद्मावती तेथे आली. तिला शीलगुप्ताने सुमित्रा नामक स्त्री कोणत्या पुण्याअीने पुढील जन्मांत अर्जुन झाली तें सांगून अुपोषणाचें माहात्म्य पटविलें व पद्मावतीने तें व्रत घेअून स्वर्गलोक मिळविला. करकण्डाने आपल्या मुलास राज्याभिषेक करून तीव्र तपश्चर्या केली व तो मोक्षाला गेला व त्याच्या राण्यांनीहि तोच मार्ग पत्करून स्वर्गांत स्थान मिळविलें.

अितर मध्ययुगीन कथांप्रमाणे करकण्डचरितांत याखेरीज नअू गोष्टी सांगितल्या आहेत. त्यांपैकी चार (२.१०-११, २.१३, २.१४-१५, २.१५-१८) बोधकथा असून त्या जानपदवाङ्मयांतून (Folk-lore) मधून घेतल्या असाव्यात. नरवाहनदत्ताची (६ वा संधी) हकीकत गुणाढ्याच्या बृहत्कथेवर आधारलेली असावी, कारण सोमदेवाच्या कथासरित्सागरांतील

या कथेचा तपशील थोडा निराळा आहे. नरवाहनदत्ताच्या गोष्टींत सूडबुद्धीच्या वाओीटपणाबद्दल आणखी अेक अुपकथा आहे (६.४-७). शुभशकुनासंबंधी कथा (७.१-४), अरिदमनाची कथा (८.१-१६) तत्कालीन परंपरागत कथावाङ्मयाचे भाग आहेत; अुदा० अरिदमन-कथेंतील शुककथा व बाणाच्या कादंबरींतील शुककथा सदृश आहेत. अरिदमन कथेंतील शुक पंचतंत्रांतील चित्रग्रीव कपोताप्रमाणे आपल्या सोबत्यासह अुडून जातो अेवढाच फरक आहे.

सारांश, कनकामराचें करकण्डचरित परम्परागत जैन करकण्डकथा, गुणाढ्याची बृहत्कथा, पंचतंत्रासारख्या नीतिकथा, रघुवंशकादम्बरीसारखें कथनपर वाङ्मय व तत्कालीन जानपदवाङ्मय यांवर आधारलेलें दिसतें. माझ्या मागील लेखांत वर्णन केलेलीं[१८] मध्ययुगीन कथांचीं लक्षणें हिला लागू पडतात. धाराशिवाच्या लेण्यांसंबंधी जैन अितिहास, प्राचीन महाराष्ट्रीय नगर तगर (ज्याचा येथे 'तेरापूर' 'तेरापट्टण' असा अुल्लेख आहे व हल्ली जें 'तेर' म्हणून ओळखलें जातें) याची माहिती व महाराष्ट्रीय घराणें— शेलार— यांच्याबद्दलची प्राचीन पौराणिक वा दंत-कथात्मक माहिती आपल्यास या ग्रंथावरून अुपलब्ध होते. पुष्पदन्तकालानंतरचा महाराष्ट्र व पर्यायाने भारतीय-समाजाचें चित्र आपल्यास यांत मिळतें. आणि शेवटची व महत्त्वाची गोष्ट म्हणजे पुष्पदन्त व ज्ञानेश्वर यांच्यामधील काळाचा मापिक दुवा आपल्यास या ग्रंथांत आढळतो.

कनकामराच्या भाषेची कल्पना पुढील लेखांत देअीन. पण पुनरुक्तीचा दोष पत्करून सुद्धा या अुपेक्षित वाङ्मयाकडे मराठीच्या विद्यार्थ्यांनी लक्ष दिल्यास प्राचीन मराठी भाषा, वाङ्मय, समाज अि०संबंधी अत्यंत अुपयुक्त माहिती मिळेल, या गोष्टीकडे पुनः लक्ष वेधूं अिच्छितों.

प्रस्तुत लेख लिहितांना अमरावतीच्या प्रा. हिरालाल जैन यांनी परिश्रमपूर्वक संपादि-लेल्या करकण्डचरिताचा अत्यंत अुपयोग झाला. त्याबद्दल त्यांचे आभार मानतों.

---

१८ म. सा. पत्रिका ऑगस्ट १९४१.

# खुलीं मतें पण ढिले शब्द

## फडके व जावडेकर यांचा सात्त्विक पण शाब्दिक वाद

(लेखक— प्रा. वा. म. जोशी)

प्राध्यापक ना. सी. फडके आणि श्री. शंकरराव जावडेकर या दोन विद्वानांचा 'पुरोगामी वाङ्मय' या नांवाच्या पुस्तकांत जो 'सात्त्विक व तात्त्विक' वाद प्रसिद्ध झाला आहे तो वाचल्यावर मला तरी असें वाटलें की वादाच्या या सौम्य वादळांत सांपडलेले हे दोघे विद्वान अेकाच होडींत बसले आहेत, दोघांना अेकाच दिशेने आणि अेकाच ठिकाणीं जावयाचें आहे, दोघांचीं मनें आणि मतें अेकच आहेत, पण शब्दांचे निश्चित अर्थ न ठरविल्यामुळे दोघांमध्ये मतभेद असल्याचा त्यांना आणि अितरांना आभास अुत्पन्न होत आहे. माझें हें म्हणणें पुष्कळांना चमत्कारिक वाटेल, पण सबंध लेख वाचून झाल्यावर तें सत्याला धरून आहे असें बऱ्याच जणांना वाटेल अशी मला आशा आहे.

शास्त्राला व कलेला व्यवहाराचें, नीतीचें, ध्येयाचें बंधन असावें (निदान त्यांनी या गोष्टी विचारांत घ्याव्या) असें जावडेकरांचें म्हणणें. याच्या अुलट शास्त्र आणि कला यांच्या प्रान्तांत अितरांनी लुडबूड करूं नये, तीं आपआपल्या प्रान्तांत स्वयंसत्ताक आहेत, असें फडक्यांचें म्हणणें. हीं मतें अन्योन्य विरोधक वाटतात, पण खरोखर येथे विरोधाभास आहे असें मला म्हणावयाचें आहे.

माझें म्हणणें अगदी थोडक्यांत मांडावयाचें योजिलें आहे म्हणून या अुभयतां विद्वानांची (व वाचकांची) नेमकी चूक कोठे होत आहे तें अेकदम सांगतों. ज्या वेळेस हे दोघे विद्वान् शास्त्र व कला हे शब्द वापरतात त्या वेळेस त्यांच्या मनांत पुढीलपैकी कोणता तरी अर्थ विवक्षित असतो, पण अेकाच्या मनांत अेक अर्थ आणि दुसऱ्याच्या मनांत त्या वेळीं दुसरा अर्थ, असा प्रकार होअून अुगाच वादळ अुत्पन्न झाल्यासारखें होअून अेकमेकांच्या आणि वाचकांच्या डोळयांत धूळ जाते. हे चार अर्थ : शास्त्र व कला म्हणजे (१) शास्त्रनियम, शास्त्रव्यापार किंवा शास्त्रपद्धति, त्याचप्रमाणे कलानियम, कलाव्यापार किंवा कलापद्धति; (२) शास्त्रसिद्धान्त व कलाकृति; (३) शास्त्र, सिद्धान्त किंवा कलाकृति यांचा प्रचार; (४) शास्त्रकार किंवा कलावन्त-अनेक नातीं, अनेक संबंध, अनेक कर्तव्यें, अनेक जबाबदाऱ्या, अनेक ध्येयें असलेली ही व्यक्ति. जावडेकर ज्या वेळेस शास्त्राला किंवा कलेला नीतीचें-ध्येयाचें वगैरे शासनबंधन पाहिजे म्हणतात त्या वेळेस त्यांच्या मनांत शास्त्रसिद्धान्त किंवा कलाकृति यांचा प्रचार असा अर्थ असतो; नाहीं तर शास्त्रकार किंवा कलावंत यांना व्यक्ति किंवा कुटुंबवत्सल मनुष्य किंवा नागरिक ह्या नात्याने शासनबंधन पाहिजे असा त्यांचा भावार्थ असतो. आणि फडके ज्या वेळेस शास्त्र व कला हीं स्वयंसिद्ध किंवा स्वयंसत्ताक आहेत असें म्हणतात त्या वेळेस त्यांच्या मनांत हे अर्थ नसून ते पहिल्या अर्थाने हे शब्द वापरीत असतात.

अनुक्रमणिका

पहिल्याप्रथम शास्त्राचाच विचार करूं. गणितशास्त्र, रसायनशास्त्र, अर्थशास्त्र अित्यादि शास्त्रांचा विचार चालू असतां केवळ शास्त्रदृष्ट्या विचार व विवेचन चालू असतां त्या त्या शास्त्राची नियमपद्धति वगैरेंना अनुसरूनच विचार व विवेचन करणें प्राप्त आहे. तेथे नीति, धर्म, वैयक्तिक जबाबदाऱ्या, समाजविषयक कर्तव्यें, समाजावर होणारे परिणाम अित्यादिकांचा विचार अप्रस्तुत आहे. अुदाहरणार्थ, अेखाद्या मोलकरीण बाअीचा महिना अमुक रुपयेप्रमाणे अमुक दिवसांचा पगार किती होअील याचा गणितशास्त्रदृष्ट्या विचार करतांना रुपये, आणे, पै अपूर्णांकासह काटेकोरपणाने बरोबर सांगितले पाहिजेत; परंतु अेखाद्या मोलकरणीने महिन्यापैकी २९ दिवस काम केलें तर आपण व्यवहारदृष्ट्या व औचित्यदृष्ट्या सौजन्याने कदाचित् महिन्याचाहि पगार देअून टाकूं. व्यक्ति या नात्याने असें करणें योग्यच नव्हे तर कदाचित् आवश्यकहि ठरेल. पण गणितशास्त्रदृष्ट्या जो हिशेब होअील त्याचा गणितशास्त्रदृष्टीनेच विचार करतां अपूर्णांकासह ज्या पया येतील त्या बरोबर सांगितल्याच पाहिजेत. रसायनशास्त्रदृष्ट्या संशोधन चालू असतां जें विचाराला पटेल तेंच आपण शास्त्रदृष्ट्या सत्य मानलें पाहिजे. हा शोध सामान्य जनतेंत प्रसृत झाला तर त्याचा दुरुपयोग होअील अशा प्रकारचे विचार शास्त्रदृष्ट्या विचार करतांना अप्रस्तुतच नव्हे तर अनुचितच होत. आपलें मत प्रसिद्ध करणें किंवा त्याचा प्रचार करणें हा प्रश्न व्यवहाराच्या किंवा नीतीच्या कक्षेंत येअूं शकेल, किंबहुना यावाहि. पण येथे हें ध्यानांत धरलें पाहिजे की शासन, बंधन किंवा मर्यादा जीं येथे मानलीं पाहिजेत म्हणून मी म्हणतों तीं शास्त्रनियमांना, शास्त्रपद्धतीला किंवा शास्त्रसिद्धान्तांना नसून शास्त्रसिद्धान्तप्रसिद्धीला किंवा तत्प्रचाराला आहे. रसायनशास्त्रविषयक किंवा गणितविषयक किंवा दुसऱ्या शास्त्रांसंबंधी अभ्यसन, व्यासंग किंवा संशोधन करतांना त्या त्या शास्त्राच्या दृष्टीनेच मनुष्याने शास्त्रमीमांसा करावी हें प्रो. फडके यांचें म्हणणें जसें आणि जितकें खरें आहे तसें व तितकेंच आचार्य जावडेकरांचें पुढील म्हणणें खरें आहे. त्या त्या शास्त्राचा विचार करणाऱ्या व्यक्तीची पत्नी किंवा आअी अत्यवस्थ असली किंवा त्याच्या शेजारच्या घराला आग लागली किंवा त्याच्या नगराला शत्रूचा वेढा पडला तर अशा वेळीं त्याने त्या शास्त्राचा विचार, त्याची मीमांसा वगैरे सर्व बाजूला सारून त्या त्या वेळचें आपलें कर्तव्य करणें प्राप्त आहे. येथे शास्त्रकार या व्यक्तीला हें नीतीचें वगैरे बंधन येतें हें प्रो. फडके देखील कबूल करतील अशी माझी खात्री आहे. पण ते तर्कपटु असल्यामुळे लगेच मला म्हणतील 'अहो हें बंधन शास्त्राला नाही, शास्त्र्याला नाही, शास्त्रमीमांसकाला शास्त्रमीमांसक या नात्याने नाही, तर शास्त्रमीमांसक हा केवळ तर्कबुद्धीचा पुतळा नसून पति-पुत्र, शेजारी, नागरिक हीं नातींहि त्याला असतात, ह्या नात्यांनी अुत्पन्न केलेलीं कर्तव्यें तो मानतो आणि म्हणून या दृष्टीनेच आणि अेतद्विशिष्ट नातीं असलेली व्यक्ति हिलाच हीं बंधनें आहेत.

कलेच्या बाबतींत देखील हीच विचारसरणि लागू पडते. अेखादा गायनपटु गात असतांना आपलें गायन गायनकलादृष्ट्या सुंदर आहे किंवा नाहीं हेंच त्याने कलाभिज्ञ व कलाभक्त या नात्याने पाहिलें पाहिजे. तें शेजारच्या अरसिकाला त्रास देतें किंवा काय, तें आपल्या श्रीमंत आश्रयदात्याला समजण्यासारखें किंवा आवडण्यासारखें आहे किंवा नाही, तें लोकप्रिय होअून त्यापासून द्रव्यप्राप्ति होअील किंवा नाही, याचा त्याने कलाभक्त या नात्याने विचार करूं नये; आणि खरा कलावंत केवळ कलाभक्तीने कलेची अुपासना करीत असतां याचा विचारहि करणार नाही. परंतु कलावंताला देखील देह असतो, त्याला तहान-भूक असते, त्याला मानापमान समजतो, त्याला बायको व मुलेंबाळें असतात, तेव्हा व्यवहार या दृष्टीने, सांसारिक मनुष्य या

नात्याने, त्याला कलेचे नियम किंवा कलेचें ध्येय क्वचित् प्रसंगीं बाजूला सारावें लागेल आणि त्याने तसें तें सारल्यास कलादृष्ट्या झालेला त्याचा दोष व्यवहारदृष्ट्या मी क्षम्य समजेन. अशा रीतीने केलेला मुरड घालावी लागते व कलावंत मुरड घालतात हें मोठें वाखणण्यासारखें नाही, परंतु क्वचित् प्रसंगीं कलावंताला आपला कलाव्यवसाय आणि आपलीं कलेचीं ध्येयें बाजूला सारावीं लागतात; आणि त्यांत त्याचा दोष नसतो अितकेंच नव्हे तर त्याचें तें कृत्य वाखाणण्यासारखेंहि होअूं शकेल. तानाजी मालुसरे हा पोवाडे म्हणण्यांत पटु होता असें हरिभाऊ आपटे यांनी दाखविलें आहे त्याला अैतिहासिक आधार काय आहे मला ठाअूक नाही—बहुधा नसावा असें वाटतें. प्रस्तुत विवेचनाच्या सोयीकरितां मी अशी अेक कल्पना करतों की तानाजी हा तानसेनासारखा गायनपटु होता. परंतु कोंडाणें येथील कोळी व इतर खेडुतांना त्याची अुच्चतम गायकी समजण्यासारखी व आवडण्यासारखी नसल्यामुळे त्याने त्या लोकांना आवडेल अशी पोवाड्याची चाल घेतली, आणि ती देखील खेडुतांना आवडावी म्हणून थोड्याशा सदोष पद्धतीने अुपयोगांत आणली. त्याचें तें सदोष म्हणणें अदृश्य यक्ष-किन्नर-देव वगैरेंना कलादृष्ट्या सदोष वाटेल आणि ते तानाजी स्वर्गांत गेल्यावर कलेचा तर त्या दिवशीं खून केलास असें ते त्याला म्हणाले असतील अशी मी कल्पना करूं शकतों; परंतु स्वर्गांत गेलेला तानाजी त्यांना असें म्हणेल की देव-यक्ष-किन्नरहो, मीं त्या दिवशीं पोवाडे म्हटले ते गायनकलेच्या हौशीने आत्मतुष्टीकरिता किंवा आत्माविष्काराकरिता केवळ कलाविलास म्हणून नव्हे, तर मला सिंहगड हा किल्ला कोणत्या तरी अुपायाने हस्तगत करून घ्यावयाचा होता आणि हें काम साधण्याकरिताच मला जी थोडीबहुत गायनकला येते तिला त्या खेडुतांच्या लायकीकडे पाहून गायनकलेला मुरड घालावी लागली, किंबहुना तुमच्यासारख्या कलारसिकांच्या दृष्टीने गायनकलेचें विडंबन करावें लागलें, किंबहुना गायनकलेचा खून करावा लागला. हें सर्व जरी खरें असलें तरी माझ्या जन्माचें अवतारकृत्य गायनकलेच्या विलासाचा आस्वाद घेणें किंवा आस्वाद देणें हें नसून शिवाजीसारख्याला साहाय्य करणें, धर्मरक्षण करणें, मराठ्यांना स्वातंत्र्य मिळवून देणें हें असल्यामुळे माझें हें ध्येय साध्य होण्याकरिता मीं जी गोष्ट केली ती योग्यच केली असें मला वाटतें आणि या दृष्टीने तुम्हीं विचार केल्यास तुम्हांलाहि ती योग्य वाटेल अशी मला खात्री आहे.

या अुदाहरणावरून मला हें दाखवावयाचें आहे की केवळ कलाविलास हेंच ध्येय असतांना कलेकरिता कला हेंच तत्त्व बरोबर आहे, परंतु कलावंताला कलावंत हा अनेक नात्यांनी व कर्तव्यांनी व ध्येयांनी बद्ध असल्यामुळे त्याला कलावंत या दृष्टीने नव्हे तर अनेक कर्तव्यबद्ध व्यक्ति या नात्याने आपल्या कलेला स्वैर विहार करूं न देतां तिला विशिष्ट परिस्थितींत साधन म्हणून राबवून घ्यावें लागतें.

हल्लीच्या महायुद्धांत अेखाद्या अिंग्रज कादंबरीकाराने किंवा नाटककाराने अेखादी कादंबरी किंवा नाटक लिहावयास घेतलें आहे अशी कल्पना करा. तें पुस्तक पुरें होण्याला अेक दोन महिने लागतील अशी कल्पना करूं. अशा परिस्थितींत आपण हातीं घेतलेलें वाङ्मयकलाविषयक काम शेवटास न्यावें का सैनिक म्हणून आपलें नांव नोंदवून घ्यावें असा त्याला पेचप्रसंग पडल्यास, आणि तो ध्येयनिष्ठ देशभक्त असल्यास, आपल्या वाङ्मयकलाकृतीचें काम बाजूला तो सारील आणि देशाच्या स्वातंत्र्याकरिता रणांगणांत अुतरून आपल्या प्राणांची आहुति देण्यास तयार होअील. येथे जावडेकर म्हणतील की कलेने नीतीचें वर्चस्व मान्य केलें आणि तें खरेंहि वाटतें. आणि प्रा. फडके हे वादांत चीत झाले असा क्षणभर आभास होतो. परंतु सूक्ष्मतेने

विचार केल्यास 'कलेने नीतीचें वर्चस्व मानलें' ही भाषा व्यवहारांत सोयीची असली आणि सुटसुटीत असली व परिणामकारक असली तरी खरा अभिप्राय व्यक्त करण्याच्या दृष्टीने ती अत्यंत ढिलेपणाची व भ्रमोत्पादक आहे. कारण येथे कला हा शब्द लक्षणेने कलावंत या अर्थाने वापरलेला आहे. आणि 'कलावंत' हा शब्द देखील कलावंत ही व्यक्ति म्हणजे देशाभिमानादि भावना असलेली व्यक्ति या अर्थाने वापरलेला आहे. केवळ कलोपासक, केवळ कलैक-दृष्टि रसिक, या अर्थाने वापरलेला नाही हें मर्मज्ञ वाचकास अुघड करून सांगण्याचें प्रयोजन नाही. शास्त्राचें ध्येय व अवतारकृत्य वास्तविक पाहतां सत्यशोधन व सत्यकथन. त्याचप्रमाणे कलेचें ध्येय व अवतारकृत्य कलाविलास. शास्त्र आणि नीति यांवर नीतीचें किंवा दुसऱ्या कशाचेंहि आधिपत्य नाही; अर्थाअर्थी त्यांचा कांही संबंधहि नाही. संबंध आहे असें जें आपणांस वाटतें किंवा नीतीस वगैरे जें आधिपत्य द्यावेंसें जें वाटतें, याचें कारण शास्त्र व कला हे शब्द वापरीत असतां पुष्कळ वेळां आपल्या मनांत लक्षणेने अुत्पन्न झालेला शास्त्रसिद्धान्त-प्रचार व कलाकृतिप्रदर्शन हे अर्थ विवक्षित असतात. फ्रॉअीडचे किंवा मार्क्सचे विशिष्ट सिद्धान्त सर्वतोपरी खरे व निर्दोष आहेत असें आपण क्षणभर समजूं या. हे सिद्धान्त अनधिकारी लोकांमध्ये प्रसृत करणें अनिष्ट होअूं शकेल या दृष्टीने या सिद्धान्तांना नीतीचें, औचित्याचें, व्यवहाराचें वगैरे आधिपत्य मान्य करावें लागेल. परंतु हें आधिपत्य अनधिकारी लोकांमध्ये प्रचार होअूं न देण्यापुरतेंच आहे, शास्त्रसंशोधनांत किंवा सिद्धान्तस्थापनेच्या बाबतींत किंवा प्रमाणचिकित्सेंत त्याचा कांही अेक संबंध नाही हें ध्यानांत धरलें पाहिजे. ज्याप्रमाणे अेखाद्या रोग्याला दोषिक ताप किंवा क्षयरोग झाला आहे किंवा नाही याची मीमांसा करतांना वैद्याने केवळ वैद्यकशास्त्रदृष्ट्याच याचा विचार केला पाहिजे, परंतु त्या रोग्याला किंवा त्याच्या पत्नीला किंवा मातेला आपण मनाशीं बांधलेला सिद्धान्त कोणीं, केव्हा, कसा सांगावा या बाबतींत रोगशास्त्रव्यतिरिक्त व्यावहारिक गोष्टींचा तारतम्याने विचार करणें त्याला आवश्यक असतें त्याचप्रमाणे शास्त्रसिद्धान्तप्रचार व कलाविलासप्रदर्शन या बाबतींतहि या गोष्टी केव्हा, कोणीं, कोणापुढे, कशा कराव्यात किंवा करूं नयेत यासंबंधाने औचित्यअनौचित्यविचार करणें शास्त्रकारास किंवा कलावंतास आवश्यक असतें. आणि या अर्थाने आचार्य जावडेकर यांचें विद्वत्त्वपूर्ण विवेचन मनाला पटतें; पण लगेच प्रो. फडके यांचें तर्ककठोर विवेचन आठवतें आणि आपण मनांत ओळखतों की 'अरे, येथे नीतीचें वगैरे आधिपत्य आहे तें प्रचाराच्या बाबतींत, प्रमाणमीमांसेच्या बाबतींत नव्हे.'

त्यांतली खरी गोष्ट अशी आहे की मनुष्याला सत्य पाहिजे, सौजन्य पाहिजे, कलानन्दहि पाहिजे. कै. कविवर्य तांबे म्हणतात त्याप्रमाणे पूर्णावस्थेस गेलेलें शास्त्र, नीति, सौजन्य आणि कलाविष्करण यांमध्ये विरोधच नसतो; अुलट तीं अेकमेकांना पोषक आणि अुपोद्बलक असतात; परंतु मनुष्याच्या अपूर्णावस्थेंत पूर्ण सत्य हस्तगत होत नाही आणि म्हणून तें कित्येक वेळां चमत्कारिक व सौजन्य-हानिकारक वाटतें; नीति पूर्ण-परिणत होत नाही आणि म्हणून सौजन्याला क्वचित् प्रसंगीं असत्याचा, हिंसेचा वगैरे आश्रय करावा लागतो आणि सौजन्याला बावळटपणा किंवा वेंगरूळपणा किंवा व्यवहारशून्यता असें स्वरूप येतें. तसेंच सौंदर्य देखील क्वचित् प्रसंगीं मनुष्याच्या अपूर्ण अवस्थेंत किंवा परिस्थितींत असत्याची अपेक्षा करतें आणि अनीतिवर्धक भासते किंवा होतेहि. आपण परमेश्वराप्रमाणे ज्या वेळेस होअूं त्या वेळेस सत्य हें सुंदर वाटेल आणि नीतिदृष्ट्याहि पूज्यहि होअील आणि असत्य हें हिडिस वाटेल आणि तें अप्रियहि होअील. परमेश्वराला सौजन्यांत सौंदर्य भासेल आणि तत्प्रीत्यर्थ असत्याचा आश्रय करण्याची केव्हाहि जरूरी भासणार नाही. Truth is Beauty and Beauty is Truth असें तो

सच्चिदानंदस्वरूप परमेश्वर म्हणेल; परंतु आजकालचे जे आपण मानव आहोंत किंवा दृष्टिपथांत येणाऱ्या भविष्यांतले जे मानव असतील, त्यांच्या बाबतींत सत्य, सौंदर्य आणि सौजन्य यांमध्ये नेहमीच सुसंवादित्व राहील असें म्हणतां येणार नाही. क्वचित् प्रसंगीं विरोध व कलह हे होणारच; पण हा विरोध किंवा कलह मिटविण्याकरिता तिहींपैकी कोठल्यातरी अेका अंगाचेंच आधिपत्य दुसऱ्यावर लादून अेकमुखी सर्वाधिकार त्याच्या हातीं देणें हें श्रेयस्कर होणार नाही. अंतरात्म्याच्या साम्राज्यांत या तिन्ही घटकांना आपापल्या प्रांतापुरते स्वयंशासनाचे अधिकार दिले पाहिजेत. त्यांनी आपण होअून अंतरात्म्याच्या प्रसन्नतेच्या सिद्धयर्थ अेकमेकांच्या गरजा, आकांक्षा वगैरेकडे लक्ष्य दिलें तर त्यांतच या सर्वांचें कल्याण आहे; परंतु अेकाने दुसऱ्यावर बळजबरी करून त्यांना अंकित करण्याचा प्रयत्न करण्यांत त्याचें स्वतःचें व अितरांचेंहि हित नाही; त्यांत कोणालाच खरा आनंद होणार नाही; आणि सर्वांवरच अप्रसन्नतेची कृष्णछाया पडल्याखेरीज राहणार नाही.

---

## डे. व्ह. ट्रा. सोसायटीने सन १९४१।४२ सालांत पहिल्या सहामाहींत बक्षिसें व प्रशंसापत्रें दिलेल्या पुस्तकांचा तक्ता

| पुस्तकाचें नांव | कर्त्यांचें नांव | बक्षिसाची रक्कम |
|---|---|---|
| १ जगांतील धर्मपंथ | रा. ब. द. ल. सहस्रबुद्धे | रु. ४० |
| २ प्रो. ब्लोककृत मराठी भाषेचा विकास | प्रो. बा. गो. परांजपे | रु. १०० |
| ३ व्याकरण महाभाष्य— मराठी भाषांतर भाग १ | म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर | रु. १०० |
| ४ यांत्रिक शोधांच्या नावीन्यकथा | रा. का. अ. दामले | रु. ३० |
| ५ साधनपरिचय अर्थात् महाराष्ट्राचा पत्ररूप अितिहास | प्रो. रा. वि. ओतूरकर व रा. द. वि. आपटे | रु. ४० |
| ६ हिंदुस्थाना तूं कुठें ? | डॉ. भा. म. टेंबे | रु. ५० |
| ७ व्यावहारिक ज्ञानकोश भाग ५ वा | रा. ग. रं. भिडे | रु. ७५ |
| ८ पंजाबांतील नामदेव | रा. शं. पु. जोशी | रु. ५० |
| ९ अंतरिक्षविजय अथवा विमानविद्येचा विकास | रा. ग. ना. जोशी | रु. ७५ |
| १० नरेंद्र कविकृत रुक्मिणीस्वयंवर | प्रो. वि. भि. कोलते | रु. ६० |
| ११ भारतीय संगीत भाग १ ला | प्रो. कृ. ग. मुळे | प्रशंसापत्र |
| १२ फुलांचा बाग | रा. वासुदेवाग्रज | ,, |
| १३ पाणपोअी | रा. पां. गो. लोहोकरे | ,, |

# देवाचें बालरूप



(लेखक— त्र्यं. सी. कारखानीस)

"अरे जा रे ! अेक हात असा अडला आहे म्हणून या तुझ्या गमजा. पण जिरवीन तरच हा बाळकृष्णाचा खरा सौंगडी !"

अीर्षेच्या आवेशांत निघालेले हे बाल आवाजाचे अुद्गार, अेका नदीच्या घाटावर माध्यान्ह-संध्येचें आसन घालून सूर्याला अर्घ्य देत बसलेल्या अेका वृद्धाच्या कानीं, नदीच्या वरच्या बाजूकडून वाऱ्याच्या धारेबरोबर किनरीसारखे येअून पडले.

नदी त्या बाजूने चंद्रभागेप्रमाणे मोठा वळसा घेअून त्या घाटाजवळ आलेली होती. वर्षाऋतूचे अखेरीचे दिवस. पावसाची सारखी संततधार या दिवसांत असत नाही. अेक दोन दिवस झोड तर मधेच अुघाड. त्या अुघाडींत अधीर झालेल्या सूर्योपासकांना सूर्यदर्शनहि घडतें. दोन दिवसांपूर्वी अशीच झोड लागलेली होती. त्यामुळे नदीला पूर येअून ती दुथडी भरून वाहत होती. आणि आता जरी अुघाडी होती तरी पूर म्हणण्यासारखा ओसरला होता असें नाही. पाणी जरा निवळलें होतें अितकेंच. आणि त्या निवळलेल्या पाण्यांत माध्यान्ह-सूर्याचें स्पष्ट बिंब जरी नव्हे, तरी जललहरींनी फाकून हेलावत असलेलें त्या बिंबाचें तेज, जणूं पोहतच असल्यासारखें दिसत होतें. पुरामुळे पाण्याचा ओघ वळणावरून अेक दोन ठिकाणीं चक्राकार गिरक्या घेअून भोवरे करीत करीत घाटाकडे आलेला होता. त्यांतीलच अेका भोवऱ्या-मधून वरील अुद्गार निघालेले होते.

नदीदरेच्या त्या वळणांतील मळअीजमिनीचें क्षेत्र लांबचलांब आणि प्रशस्त असून त्यांत हरतऱ्हेच्या वृक्षराजींनी समृद्ध अशी अेक अुपवनाप्रमाणे मुद्दाम तयार केलेली बाग होती. सर्वसामान्य अशा फळ-फुल-वृक्षवेलींबरोबरच या भागांत सहसा न होणाऱ्या कांही झाडांच्या जाती मुद्दाम जोपासना करून त्या बागेंत वाढविल्या होत्या. त्यांतल्या त्यांत कोंकणचा भास अुत्पन्न करणाऱ्या वृक्षवेलींचा भरणा विशेष होता. फणस, नारळी, पोफळी या तर होत्याच पण नीव नांवाची कोंकणांतच क्वचित् आढळणारी आणि सामान्यतः दुर्लक्षिलेली अुंचच अुंच वृक्षाची अेक जात या बागेंत जिज्ञासू ओषधीचिकित्सकांना आढळून येअी. या वृक्षाच्या फळालाहि नीव असेंच म्हणतात. तें आकाराने लिंबाअेवढें पण पृष्ठभाग नाजूक कांटेरी, रंग गर्द पिंवळा, चव किंचित् आंबट पण मधुर. या फळांत अेखादेंच अमृतफळ आढळतें अशी समजूत. आणि म्हणून फळांचा भर आला की त्याच्या लाभाच्या आशेने वांद्रें झाडावरचीं फळें नुसतीं चाखून पाहून खाली टाकतात अशी या वृक्षाबद्दलची अेक आख्याअिका आहे. मोसमांत झाडाखाली फळांचा सडा आढळतो अेवढें मात्र खरें !

घाटावर या वेळीं सूर्याला अर्घ्य देत जे वृद्ध बसले होते त्यांचीच ही बाग होती. यांचें मूळ कोंकणांत असून बाळपणींच वडिलांबरोबर हे अिकडे घाटावर आले. पुढें व्यवसायानिमित्ताने अिकडे राहिले ते स्थाअीकच झाले. पण पिंड मूळचा कोंकणचा. 'रम्य तें

बाळपण देईं देवा फिरुनि' अशी ज्याची पुढील आयुष्यांत हुरहुर लागते त्या रमणीय बाळपणाचे सारे संस्कारहि कोंकणचेच. पण अिकडेहि अिकडचे ऋणानुबंध जडले गेले. स्थाअीकपणा कायमचा झाला. कोंकण अंतरलें. तेव्हा निदानपक्षीं बाळपणच्या त्या रमणीयतेचा भास अुत्पन्न करील असें तेथील वातावरण तरी सभोंवार असावें या भावनेने त्यांनी ही बाग नदीकांठची वळणाची जागा मुद्दाम शोधून स्वकष्टाने मोठ्या हौसेने तयार केलेली होती. आणि शहरापासून जरी ही थोडी दूर होती तरी सेवानिवृत्त झाल्यापासून ते आपला दिवसांतला बराचसा काळ या बागेंतच काढीत असत.

ज्या घाटावर ते बसले होते तो कांही त्यांच्या बागेपैकी नव्हता. बागेलगतच अेक पुरातन शंकराचें देवालय होतें, त्या देवालयाचा तो घाट होता. देवालयाभोवतीं वड, पिंपळ, आंबे अित्यादि जुनाट वृक्षांची परंपरागत राअीहि अर्थात् होतीच. जनसंमर्दापासून दूर असें हें पुरातन, पवित्र आणि रमणीय स्थान पाहूनच त्यालगतची ही नदीच्या वळणाची जागा आपल्या बागेकरिता त्या वृद्धांनी पसंत केलेली होती. बाग अगदी राअीला येअून भिडलेली, त्यामुळे देवालय बहुतेक बागेंतच जमा झाल्यासारखें होतें. आणि म्हणून ते वृद्ध बागेंत आले की आपली स्नानसंध्यादि कर्मे या देवालयाच्या घाटावर आत्मीय भावानेच करीत असत. घाटावरून नदीचें अगदी वळशापासूनचें डौलदार वळण, पैलतीराकडील टेकड्यांच्या रांगांपर्यंत भिडलेली सुपीक शेतीवाडी आणि मधून मधून रायांरायांतून दृश्यमान होणारी तुरळक बंगल्यांची वसाहत असा देखावा मोठा सुंदर दिसत होता.

अशी ही भावनामय, पवित्र आणि रमणीय बाह्यसृष्टि आणि तिचा नेहमी अुपभोग घेत असणारें त्या वृद्धाचें अंतर्याम, या संयोगापासून निर्मळ प्रसन्नतेचीच अपेक्षा कोणी सहज करील. पण त्या वृद्धाच्या चर्येकडे केव्हाहि पाहिलें तरी फक्त यशस्वी जीवनाची साभिमान कृतार्थता आणि करडा करारीपणा, यांखेरीज दुसरा कोणताहि भाव तेथे प्रकट झालेला कोणालाहि सहसा दिसत नसे. हा विपरीत परिपाक तर खराच. पण तो या वृद्धांच्या बाबतींतच तेवढा अपवादात्मक होता असें कांही नाही. नोकरशाही आणि तिला पुरवठा करण्यासाठी अुभारलेले शिक्षणाचे कारखाने, अितकेंच काय, कोणतेहि संप्रदाय आणि त्यांच्या अभिवृद्धीसाठी मुद्दाम म्हणून काढलेल्या संस्था यांतून व्यवहारासाठी म्हणून जीं अेकच अेक ठशाचीं चलनी नाणीं निर्माण केलीं जातात, तीं आपापल्या व्यवहारांत कितीहि निष्णात आणि कार्यक्षम असलीं, तरी त्यांच्यांतील मूळचा अीश्वरी नैसर्गिक अंकुर त्या ठशाच्या दाबाने दडपला जाअून वर फक्त तो करडा करारी ठसाच कायमचा दिसतो. सामाजिक व्यवहार चालावयाला पाहिजेत हें खरें, पण त्यासाठी हे विपरीत परिपाक अपरिहार्यच का असतील?

कांही असो, मशारनिल्हे वृद्ध हे पूर्ववयांत अशा प्रकारच्या शिक्षणाच्या कारखान्यांतूनच ठसा घेअून खणखणीत चलनी नाणें म्हणून तयार झाले; आणि पुढे त्यांची आजन्म सेवाहि तसल्या कारखान्यांतच झाली. जन्मभर तेच संस्कार. ठशाचा दाब वज्रलेप झाला. मूळचे अीश्वरी नैसर्गिक अंकुर वर यावयाला मार्गच नाही. त्यामुळे ठशाचा करडा करारीपणाच तेवढा दर्शनीं अढळ राहिला; आणि चित्तशुद्धि या मूळच्या हेतूची जाणीवहि न राहतां कर्मठ ज्याप्रमाणे आपलीं स्नानसंध्यादि नित्यकर्मे करीत असतो, त्याप्रमाणेच हे वृद्ध आपल्या बागेसंबंधी नित्यकर्मे यथापूर्व आताहि करीत असतात अितकेंच. सेवेंत असतां आपणासारखीं खणखणीत नाणीं तयार करण्यांत यांचा हातखंडा असे. कांही काळ अेका कारखान्याचे मुख्याध्यापक,

नंतर शिक्षणाधिकारी, अशी त्यांची बढती होत गेली. सेवेची मुदत संपल्यावर ते सेवानिवृत्त झाले.

पूर्ववयांत केवळ बाळपणच्या वातावरणासाठी म्हणून स्वकष्टाने सुंदर बाग निर्माण करणारे हे गृहस्थ, पुढे या नैसर्गिक भावनेला कसे आणि किती पारखे झाले, याची साक्ष देणारी, हे सेवेंत असतांनाच घडलेली अेक नमुनेदार गोष्ट रवींद्रबाबूंनी 'माझी शाळा', (My School) या आपल्या लेखांत दिली आहे. ती यांचीच गोष्ट कशावरून असा कोणी प्रश्न काढतील. त्यांना मी अेवढेंच म्हणेन की कारखान्यांतून बाहेर पडलेल्या अेकच अेक ठशाच्या नाण्यांपैकी अमुक तें हें नव्हेच असें कोणी सांगू शकाल काय? गोष्ट नमुनेदार आहे येवढेंच येथे लक्षांत घेतलें म्हणजे झालें.

मुख्याध्यापक असतांना हे कांही निमित्ताने शांतिनिकेतनांतील रवींद्रबाबूंची शाळा पाहावयास म्हणून गेले होते. तों तेथील अेक विद्यार्थी आपला झाडावरच चढत असलेला यांनी पाहिला! अगदी बेफिकिरपणानें झाडावर चढून दोन खांद्यांच्या बेचकांत त्याने आपलें आसन ठोकलें! आणि तेथेच तो पुस्तक काढून आपला अभ्यास करूं लागला! हे चकितच झाले! हा प्रकार त्यांना अगदी कमालीचा गैरशिस्त वाटला. अखेर बाबूजींना त्यांना सांगावें लागलें, "या सुधारलेल्या काळांत माणसाला खोलींतील खुर्ची सोडून झाडाच्या खांदीवर बाळपणींच काय तें तेवढें बसतां येतें! माझ्यासारख्या प्रौढाला याचा प्रतिबंध आहे. म्हणून तेवढ्यासाठी मीं तो प्रतिबंध या बालकावरहि लादावा असें का तुमचें म्हणणें?" पुढे या गृहस्थांना त्या विद्यार्थ्याच्या हातांत वनस्पतीशास्त्राचें पुस्तक असून त्याचा तो अभ्यास करीत आहे असें जेव्हा समजलें तेव्हा जरा बरें वाटलें! विद्यार्थ्यांचा वनस्पतींशीं साक्षात् परिचय हा कांही त्यांना अभ्यास म्हणून पटला नाही; पुस्तकी ज्ञान म्हणजे शास्त्रीयज्ञान म्हणून तें मात्र पटलें!

पूर्ववयांत यांना दोन मुलगे झाले होते. अर्थातच त्या मुलांना त्यांनी अगदी बालपणापासून आपल्या कारखान्यांतील यांत्रिक योजनेनुसार शिक्षण देअून आपणाप्रमाणेच अगदी खणखणीत चलनी नाणीं म्हणून तयार केलें होतें. व्यवहारांत तीं नाणीं चांगलीं खणखणतहि होतीं. वृद्धांना कृतार्थता वाटत होती. पण त्यांची स्वतःची पायाभूत अशी अत्यंत महत्त्वाची प्राथमिक वाढ स्वावलंबनाने नैसर्गिक, तर त्या मुलांची ती वाढ जन्मतःच प्राप्त अशा परावलंबी जीवनांत कृत्रिमपणाने केली गेलेली. साहजिक शरीराने आणि मनाने तीं मुलें मूळांतच कमकुवत राहिलीं. सुखांत वाढलेलीं तेव्हा दिसावयाला चांगलीं गुबगुबीत दिसत. व्यवहारांत त्यांची कार्यक्षमताहि वाखाणण्यासारखी होती. पण मानवी जीवनांत शारीरिक, मानसिक, नैतिक रोगांच्या अनेक सांथी वावरत असतात. ते वृद्ध स्वतः तसल्या अनेक प्रकारच्या सांथींशीं टक्कर देअून हा कालपर्यंत तग धरून राहूं शकले. पण तीं मुलें मात्र तसल्या कोटल्या तरी वेगवेगळ्या सांथींना, तिशी अुलटते न अुलटते तोंच, अेकामागून अेक बळी पडलीं. आता त्यांपैकी वडील मुलाचा अेक लहान सात आठ वर्षांचा मुलगा येवढाच काय तो घराण्याचें नांव चालवावयाला अुरला होता.

अेकामागून अेक या आपत्ति येअून कोसळल्या. वृद्धांची कंबरच खचल्यासारखी झाली. पण मूळचें त्यांचें कर्तबगार मन करारी आणि चिकाटीचें. दुःख पोटांत घालून त्यांनी पुन्हा आता आपल्या अेकुलत्या अेक नातवाला आपल्या कल्पनेबरहुकूम खणखणीत चलनी नाणें



बनविण्याचा चंग बांधला. स्वतःचें वय झालेलें आणि नातू तर लहान. यामुळे त्यांचें मन अधीर होऊन ते त्याच्या शिक्षणाच्या बाबतींत अगदी हात धुवूनच पाठीस लागल्यासारखे झाले. बाहेर शाळा, घरीं स्वतःची तशीच 'मास्तर'ची शिकवणी, शिवाय अभ्यास! शाळेंत मुलांना खेळ असत. पण याला जरासुद्धा कुठे फिरकायला सवडच कुठे? जात्या बुद्धीने कुशाग्र म्हणून त्याला असला नीरस अभ्यास कसाबसा पार पाडतां येअी. पण त्याच्या हळुवार मनाला ही जखडून टाकणारी शिस्त असह्य होअी. त्याचें आतुर बालमन सभोवारच्या अुडत्या बागडत्या सृष्टीकडे किती धाव घेअूं पाही. पण आंतल्या आंत आंतल्या आंत त्याने नुसतें झुरत असावें.

संपन्न घराण्याचा अेकुलता अेक वारस! लोकांना ही मोठी भाग्याची गोष्ट वाटते. पण ज्या समाजांत कारखान्याच्या शिस्तीचें स्तोम माजलेलें असतें तेथे असल्या वारसाला 'नको तें भाग्य' असें होअून जातें. दहा पांच मुलें घरांत असलीं तर विभागणीने ती शिस्त आपोआप थोडी तरी ढिलावते. मुलांना आपापसांतच खेळतां येतें. जरी मांडली तरी त्यांच्या मनाला ती कसरतच होते. अेकुलत्या अेक कुब्या मनांत अपायकारक घाणी सांचल्या जातात, तसें तरी निदान होत नाही. तें निकोप राहतें. आणि मग कारखान्याची जरी असली तरी ती शिस्त सुद्धा कांहीशी सुसह्य होअूं शकते. पण अेकुलता अेक वारस म्हणजे केवळ केंद्रित अशा आखूयाच्या आखूया शिस्तीचा, नाही तर लाडाचा, अेकटाच वारस होतो तो.

मनाची अशी आंतल्या आंत झुरणी. साहजिकच त्या मुलाची वाढ व्हावी तशी होअीना. वृद्धांनी शास्त्रोक्त व्यायाम त्याच्याकडून करून घेण्यास सुरवात केली. रोज पहाटे आपणाबरोबरच त्याला उठवावें. शास्त्रोक्त सूर्यनमस्कार त्याच्याकडून घालवावे. गायीचें धारोष्ण दूध प्यावयास द्यावें. सगळें कांही करावें. शरीर तुकतुकीत दिसूं लागलें. शाळेंतहि नंबर पहिला राहूं लागला. पण— हा सर्व संपन्नतेचा अेकुलता अेक वारस केव्हाहि तोंड अुघडून बोलूं लागला की दारीं हात पसरून 'अन्न घाला होऽऽऽ माअी!' अशी भीक मागणाऱ्या अेखाद्या भुकेकंगालाच्या मुलाचाहि सूर याच्यापेक्षा बरा असें वाटावें! तो अैकून वृद्ध अगदी मनांतल्या मनांत चिडत. "सदा रड्या! झालंय काय याला? कांहीं कमी का आहे?" असें आपल्याशींच चडफडत. "कसली कमतरता नाही. आपणहि सर्व यथास्थित करतों, पण—" काय असेल तें असो, अिथे मात्र त्यांचें मन थबकेच! अंतर्मनांतून प्रश्न निघत. कांही चुकल्याचुकल्यासारखें— विसरल्यासारखें— हरपल्यासारखें— असें कांही तरी अशा वेळीं त्यांना होअी. आज घाटावर अर्घ्य देत असतांना अशीच अंतर्यामीं त्यांची कालवाकालव चाललेली होती. आणि मन अशा अवस्थेंत असतांनाच ते बाल आवाजाचे किनरीच्या सुराचे उद्गार अचानक त्यांच्या कानीं येअून पडले......

......ते अैकतांच आज केक वर्षांत न दिसलेली निर्मळ प्रसन्नतेची छटा त्यांच्या चर्येवर झळकू लागली. जांबुवंतीच्या गायनाने शिळा विरघळल्या त्याप्रमाणेच त्या बाल आवाजाच्या किनरीच्या सुराने ठशाचा वज्रलेप विरघळला काय? डोळे उघडून आवाजाच्या रोखाने त्यांनी नजर टाकली, तों जवळच्याच अेका भोवऱ्यांत अेक दहा बारा वर्षांचा मुलगा सांपडला असून तो त्यांतून बाहेर पडण्याचा मोठ्या नेटाने प्रयत्न करीत असल्याचें त्यांच्या नजरेस पडलें. मुलगा मोठा पाणीदार दिसत होता. नदी निवळली असली तरी अजूनहि आपल्या पाण्याच्या तोऱ्यांतच होती. तिला जणूं तें येवढ्याशा मुलाचें पाणी सहन होत नव्हतें. आपल्या भोवऱ्यांत खेचून तें जणूं हिरावून घेण्याचाच ती आटोकाट

प्रयत्न करीत होती. पण तेथेच पोहत असलेल्या माध्याह्न सूर्यबिंबाचें तेज जसें तिला हिरावून घेतां येत नव्हतें, तसेंच या मुलाचेंहि पाणी हिरावून घेण्याचे तिचे सारे प्रयत्न व्यर्थ होत होते. बाकी भोवरा जरा त्रासदायकच होता. वारंवार बुड्या मारून आणि सफाअीच्या हात-फेकांनी पाणी तोडून मुलगा नानातऱ्हांनी त्याला फोडण्याचा यत्न करीत होता. पुनः पुन्हा तळाशीं बुडी मारून त्याने भोवऱ्याच्या गिरकींतून निसटण्याचा यत्न करावा, तोंच भोंवऱ्याने त्याला वर खेचून पुन्हा आपल्या गिरकींत पकडावें असें सारखें चाललें होतें. अेखादा मोठा मनुष्यसुद्धा अशा वेळीं घाबरून गेला असता. पण त्या मुलाच्या चेहऱ्यावर भीतीचा लवलेशहि दिसत नव्हता. अुलट त्याच्या चेहऱ्यावरील मूळचें पाणी रंगाला चढल्यासारखें दिसत होतें. तरी पण काय असेल तें असो, तो भोवरा कांहीं त्याच्याने फुटत नव्हता. निमिषमात्रांत हा सर्व प्रकार वृद्धांच्या नजरेत आला. अितक्यांत पुन्हा त्या मुलाचे अुद्गार कानीं आले—

"कोण आहे तें ? जरा– जरा मला हात द्या पाहूं !"

सत्तरीच्या जवळ आलेले ते वृद्ध, पण हे अुद्गार अैकतांच अैन पंचविशीच्या हिरिरीने ताडकन् अुठले, कोट खोअून त्यांनी पाण्यांत अेकदम सरळी मारली. आणि शेल पोहणीने सपासप पाणी कापीत ते भोवऱ्याकडे निघाले.

पण अितक्यांत पुन्हा. "हात् तुझी ! जिरवली कीं नाहीं !" असे त्या मुलाचे विजयोद्गारच कानीं आले. पाहतात, तों खरोखरच मुलगा भोवऱ्यांतून निसटला असून विजयाच्या डौलाने चोहोकडे पाहत व मधून मधून भोवऱ्याकडे विजयी तिरस्काराची मिस्किल नजर फेंकीत आपल्याकडे येत आहे. मौज अशी झाली की कोणी तरी आपल्या मदतीला येत आहे हें त्या मुलाने पाहिलें मात्र, त्याला असा त्वेष चढला की त्यासरशी त्याने निदानीचा अेकेचा प्रयत्न करण्याकरता तेखाने भोवऱ्याचा तळ गांठला आणि त्याच तेखा-सरसा तो भोवऱ्यांतून बाहेर आला.

"थांब हां मुला, हा आलोंच मी ! तूं फार दमला असशील." असें त्वरेने अंतर तोडीत वृद्ध गृहस्थ त्या मुलाला म्हणाले.

आपल्याकडे येत आहेत ते वृद्ध आहेत असें पाहतांच मुलगा अेकदम अुद्गारला, "कोण आजोबा ?" आणि लागलीच पुढे म्हणाला, "छेः ! मी दमलों बिलकूल नाहीं. चला तुम्ही परत." आणि आपलें म्हणणें जणूं खरें करून दाखविण्याकरिता तो आता परत फिरलेल्या त्या वृद्धांच्या पुढे जाण्याचा प्रयत्न करूं लागला.

जवळून जात असतां वृद्धाने त्याच्याकडे पाहिलें. तो मुलगा चांगलाच दमदार असून पोहणाराहि पटाअीत असल्याबद्दल त्यांची खात्री झाली. ते म्हणाले, "काय रे, तूं पोहणारा तर पटाअीत दिसतोस. मग त्या भोवऱ्यांत अितका कुचमलास कसा ?"

"माझा हा अेक हात अडून राहिला आहे हो आजोबा. नाही तर त्या भोवऱ्याची काय बिशाद !"

"अरे हो ! खरंच ! अन् तो रे कशानं ?"

"ती सारी 'जम्मत' तुम्हाला घाटावर गेल्यावर सांगेन आजोबा, चला ! पण आजोबा, मीं तुम्हाला किनअी, अुगाच हाक मारली— बाकी अशा वेळीं नदींत पोहायची तरी मजा असते नाही !"

अेकदम आजोबांच्या हातफेका सपासप होअूं लागल्या आणि ते जरा मागे राहिलेले पुढे येअूं लागले. त्यांचा चेहरा हातफेकांच्या अुसळींबरोबर अेकदम तेजाला चढल्यासारखा दिसूं लागला. कसली बरें अुसळी ही ? गतकाळाच्या महोदधींत दोन पिढ्यांच्या मागे क्षणार्धांत ही 'मागुती अुडी' घेतल्यामुळे निघालेली तर ही अुसळी नव्हे ? होय. त्या बालकाच्या तोंडचे 'बाकी अशा वेळीं नदींत पोहायची तरी मजा असते नाही ?' असे सहज अुल्हासाचे शब्द कानीं पडतांच त्या वृद्धांना अेकदम आपलें बाळपण आठवलें. 'आठवलें' अितकेंच नव्हे, गलितगात्रें जोमदार होअून ते रोमरोमीं संचरलें. वस्तुस्थिति क्षणमात्र ते विसरले. आपण त्या बालकाप्रमाणेच आहोंत, आणि आपल्या संवगड्याबरोबर औघेंने पोहत आहोंत, असेंच त्यांना वाटलें. आणि चर्येवर अदृष्टपूर्व तेज चढून त्यांच्या हातफेका सपासप जोराने होअूं लागल्या.

याप्रमाणे आता, वयाने जरी नव्हे, तरी वृत्तीने बनलेली ती दोघां बालकांची जोडी पोहत पोहत घाटावर येअून पोहोंचली. पाण्यांतून बाहेर पडतांच वृद्ध बालकाने आपल्या बाल-सोबत्याकडे पाहिलें. तों खरोखरच त्याच्या डाव्या काखेंत अेक लहानसें गाठोडें होतें. तें पाहतांच ते म्हणाले, "अरेच्या ! या गाठोड्यामुळे तुझा हात अडला होता होय ? काय, काय आहे रे अेवढें त्या गाठोड्यांत ? पाहूं पाहूं तर खरं !"

पण मुलाने त्यांत काय आहे हें दाखविण्याअैवजीं तें नुसतें खालीं ठेवलें आणि अेका अुडींतच त्या वृद्धांचे घाटावर ठेवलेले कोरडे कपडे त्याने गांठले. त्यांतून त्यांचें उपरणें घेअून तो दुसऱ्या अुडीसरसा त्यांच्याजवळ आला, आणि म्हणाला, "आजोबा, तुम्ही थंडावाल. हें नेसा पाहूं अगोदर !"

पण आजोबांना मुलाच्या या कृतींचें कौतुक वाटण्याअैवजी ते अुलट किंचित् चिडल्या-सारखेच झाले. "अरे जा. मी तेवढा थंडावणार होय ? मला आजोबा आजोबा करून हिणवूं नकोस. चल पाहिजे तर पुन्हा अुड्या टाकूं !"

मुलाने पुन्हा अभावितपणेंच 'आजोबा !!!' करून त्यांच्याकडे नवलाअीने पाहिलें. त्याचा चेहरा प्रफुल्लित झाला आणि 'चला तर !' असें म्हणून तो घाटावरून पुन्हा नदींत अुडी घेण्यास सज्ज झाला. पण कांही सट्कन आठवल्यासारखें होअून तो थांबला; आणि डाव्या हाताने डोकें खाजवीत खाजवीत म्हणाला, "अंऽऽऽ, पण आताच नको आजोबा. काय करूं हो, तो रखवालदार माझ्या पाठीस लागला आहे. मघाशीं नदींत बुडी मारून अेकदा मीं त्याला हुलकावणी दिली. पण आता तो अितक्यांत अिकडे येअील. आणि पुन्हा—आअी जेवायला बसली होती तिचा डोळा चुकवून अिकडे आलों आहें मी."

"अरे गुलामा !" बालवृत्तीच्या गुंगलेल्या अवस्थेंतच वृद्धाच्या तोंडून हे अुद्गार वस्तुतः निघालेले होते. पण त्यांतील शब्दांनीच तो मुलगा बिचकल्यासारखा झाला. साशंक मुद्रेने तो वृद्धांकडे पाहूं लागला. वृद्धांना हें कांहीच अुमगेना. ते नुसते किंचित् तोंड अुघडलेल्या प्रश्ना-र्थक हसऱ्या मुद्रेने त्याच्याकडे क्षणभर पाहातच राहिले; आणि म्हणाले, "का रे, काय झालं ?"

मुलगा साशंक मुद्रेने वृद्धांना न्याहाळीतच होता. क्षणभरच याप्रमाणे त्याने न्याहाळलें असेल. लागलीच मान नकारार्थी हलवून तो म्हणाला, "छेः ! तुम्ही 'ते' नव्हेत."

यांतील 'ते'ला किंचित् खोच होती. वृद्धांनी विचारलें, "ते रे कोण ?"

"आजोबा, खरं सांगूं? या बागेचे मालक ते तुम्हीच अशी किनअी मला जरा शंका आली." वृद्धांना अिथे आंवढा आल्यासारखें झालें. मुलगा लागलीच पुढे म्हणाला, "पण छेः! आमचे नाना त्या म्हातारबुवांच्या खूप खूप गोष्टी सांगतात. आजीहि केव्हा केव्हा रंगांत आली म्हणजे त्यांची सगळी कुळकथा सांगते. छेः! तुम्ही ते नव्हेत. खास ते नव्हेत."

वृद्धांनी आलेला आंवढा कसाबसा गिळला. मुलाच्या शेवटच्या वाक्यांनी त्यांना जरा हायसें वाटलें. आणि आतां हें नसतें लचांड कसें तरी अुडवून लावावें म्हणून हसण्याचा आव आणूनच ते म्हणाले, "कोण, तो म्हातारा होय? हः हः हः हः हः! तो तसलाच आहे! जाअूं दे त्याला. मला अगोदर सांग, तें गाठोडें कसलं? आणि आअीचा डोळा चुकवून भर अुन्हाचा अिकडे आलास तो कशासाठी? हंऽऽऽ! कांही तरी खोड्या दिसतात!" अिथे पुन्हा तो मुलगा बिचकल्याचा भास झाला, म्हणून लगेच ते पुढे म्हणाले, "अरे, बिचकूं नकोस. आम्ही देखील लहानपणीं अशाच—"

मधेच वृद्धांना अडवून किंचित् आश्चर्यानें पण आतुर होअून मुलानें विचारलें, "काय आजोबा, तुम्ही लहान होतां?"

"म्हणजे? होतोंच."

"अगदी माझ्याअेवढे? आमची आजी केव्हा केव्हा सांगते की नाना तुझ्याअेवढे होते तेव्हा असंच करीत होते. पण आजोबा, तुम्हीहि माझ्याअेवढे होतां?"

"हो हो. अरे तुझ्यायेवढेच काय, तुझ्याहूनसुद्धा लहान."

"काय म्हणतां, माझ्याहूनसुद्धा लहान? म्हणजे आमच्या आअीचं बाळ आहे तेवढे?"

"अरे हो! तेवढे सुद्धा!"

"काय मजा आहे बुवा! आजोबा तुम्ही?— अन् आमच्या आअीच्या बाळायेवढे होतां? आमच्या आअीचं बाळ कसं अगदी गोकुळांतल्या बाळकृष्णासारखं टाळ्या पिटीत नाचतं! 'टाळिया नंदा। बाळ गोविंदा॥ टाळिया नंदा। बाळ गोविंदा॥' अन् आजोबा तुम्ही? तसेच आमच्या बाळायेवढे होतां? काय मजा आहे!"

आणि याच मजेने आजोबांकडे पाहत 'टाळिया नंदा' या पालुपदावर टाळ्या पिटीत गदगदां हसत तो मुलगा अगदी रंगून नाचूं लागला.

मर दुपारची वेळ. वारा वस्तुतः सुस्तावलेला होता. पण त्या बालकाचा तो नाच आणि त्याचें तें आसमंतात् लहरींवर लहरींनी फैलावत जाणारें अुत्कट हास्य याने जणुं तोहि अुल्हसित झाला आणि नदीच्या पाण्यावर झुळुकझुळकीचा नाच करूं लागला. थोड्या वेळापूर्वी त्या बालकाचें तेज हिरावून घेअूं पाहणारें तें नदीचें पाणी आता भक्तिरसानें डोलावयास लागून त्या नाचाला लप्लप् चिपळीचा ताल धरूं लागलें. बागेंतील वृक्षराजी हर्षभरित होअून त्या नृत्यांतील नानाविध भाव पर्णपल्लवांच्या अभिनयांनी व्यक्त करूं लागल्या. माध्यान्हसूर्याचे चण्डकिरण सुद्धा पर्णपल्लवांतून त्या नाचांतील भावदर्शक नेत्रसंकेत नदीच्या पाण्यावर चमकबिंबांनी प्रकट करूं लागले.

आजोबांना तर आपल्या वयाचा पूर्ण विसर पडला. तेहि तल्लीन झाले. आणि त्या मुलाबरोबरच टाळ्या पिटीत डोलूं लागले. मधेच मुलगा थांबला आणि त्यांच्याकडे कौतुकाने पाहत पुन्हा अेकदम अुद्गारला, "काय मजा आहे!— पण आजोबा, खरंच तुम्ही लहान होतां?"

"हो रे. खोटं का सांगतों मी तुला?"

मुलानें एकवार आपादमस्तक त्यांच्याकडे निरखून पाहिलें. आजोबा ल्हान होते हें कळल्यानें त्याला पोटांतून खूपखूप आनंद झाला होता. पण हें कसें याचें त्याला कोडें पडल्यासारखें झालें होतें. आणि तशाच प्रश्नमुद्रेनें त्यांना निरखून पाहत, शब्दाशब्दावर थांबत त्यानें विचारलें, "पण– मग– तुम्ही– असे हो कसे झालांत?"

अंजनाचा झटका बसावा तसें होऊन वृद्ध एकदम भानावर आले. पूर्ण विसर पडलेल्या वयाची दुःखपूर्ण जागृति त्यांना आली. तोंड एकीकडे करून त्यांनी एक सुस्कारा, दोन अश्रू आणि चार अक्षरें बाहेर टाकलीं. " कर्मामुळें!"

वृद्धांच्या या सुस्काऱ्यानें मुलगा चरकला. कशाशाच मुद्रेनें त्यांच्याकडे पाहत तो मागल्यापायीं सरकत सरकत दूर झाला.

वृद्धांनी हें पाहिलें मात्र. एकदम पुढे सरून त्यांनी त्याचे हात धरले; आणि काकुळतीनें गहिवरूनच ते म्हणाले, "नको रे बाळ असा माझ्यापासून दूर जाऊं. मी किनई, खरोखरच तुझ्यायेवढा होतों. अशीच तुझ्यासारखी चड्डी घालून मी या नदींत कैक वेळां पोहलों आहें. काय सांगूं, किती गोष्टी सांगूं म्हणजे तुला खरं वाटेल?"

त्यांना हुंदका आला आणि ते थांबले. मुलानें लगबगीनें आपले हात सोडवून घेतले. पुन्हा तें उपरणें आणलें. त्यानें त्यांचे डोळे पुसले, अंग पुसलें, आणि तेंच पुढे करून नेसा असें नुसत्या माननेंच त्यांना खुणावलें. वृद्धांनी या वेळीं तें मुकाट्यानें घेतलें आणि ते नेसूं लागले. रविकिरणांच्या मूक करणींनें ढग वितळतात त्याप्रमाणें मघाच्या त्यांच्या जागृतींतील दुःखहि मुलाच्या या करणीनें वितळून पार नाहींसें झालें. आणि उपरणें नेसतांनेसतांच ते आता शांतपणें मुलाशीं बुद्धिवाद करूं लागले.

"माणसं किनई, हलके हलके वाढत वाढत लहानाचीं मोठीं होतात. तूं देखील तसाच वाढत माझ्यायेवढा होशील. माझ्याहूनहि मोठा होशील. शतायुषी होशील!"

मुलाला इथे सट्कन् स्वतःचा अनुभव आठवला.

"हंऽऽऽऽ! पावसाळ्यांत आमच्या परसावांत इवलीं इवलीं झाडं उगवतात अन् तीं मग वाढत वाढत मोठीं होत जातात! तसंच ना? रोज सकाळीं उठल्याबरोबर परसावांत फेरी! कोणतं किती वाढलं? पण आजोबा, उन्हाळा आला कीं तीं सुकून जातात."

पुन्हा तोच भयंकर जागृतीचा झटका येतो कीं काय असें वृद्धांना झालें; आणि मग हें गोड गोड स्वप्न नाहींसें होईल असें त्यांना भय वाटलें. आंतल्या आंत त्यांनी तो झटका दाबून टाकला. आपल्या अंगांत संचरत असलेला बालवृत्तीचा प्रवाह बंद पडूं नये म्हणूनच कीं काय त्यांनी मुलाचे हात पुन्हा आपल्या हातांत घेतले आणि त्या ऋणधन विद्युत्‌रूप तारा घट्ट आवळून धरल्या. अशा प्रकारें निदान बाह्यतः स्थिर वृत्ति करून ते पुन्हा बुद्धि-वादावर आले.

"होय बरं बाळ. पावसाळ्यांत परसांतलीं झाडं जशीं वाढत जातात, तशींच— तशींच आपण माणसंहि लहानाचीं मोठीं होतों. पण आता सांगतोस ना, आज तूं काय जम्मत केली आहेस ती?"

म. सा प. (१५-१-७)

"आजोबा, ती नुसती जम्मत नव्हे. आमच्या बाळकृष्णाची जम्मत आहे ती! पण आजोबा, मला सांगा, तुम्ही माझ्यायेवढे होतां तेव्हा तुम्हांला माझ्यासारखीच आजी होती?"

"हो हो. होती तर!"

"ती तुम्हांला पुढ्यांत घेऊन पुष्कळ जमतीच्या गोष्टी सांगत असे?"

"हो. आमची आजी पोथ्यापुराणांतल्या देवादिकांच्या गोष्टी किती तरी सांगायची."

"मग तिनं तुम्हांला गोकुळांतल्या बाळकृष्णाच्या गोष्टी सांगितल्या असतील?"

"हो. कृष्णाच्या लीला तर ती अगदी रंगांत येऊन सांगायची."

"अंहं. कृष्णाच्या नव्हेत. बाळकृष्णाच्या! तो?— दहीदूध चोरून खायचा, आणि हंडीं मडकीं फोडून पळून जायचा! आणि गायांचीं वासरं सोडून त्यांना पळायला लावायचा! जम्मत तर खरीच, पण अुगाच नव्हे. सौंगड्यांचा कैवार घेअून. अेखाद्याची आअी जर का मुलाला त्रास देअूं लागली, तर तिच्या घरचं दहीदूध गेलंच!"

"अरे या गोष्टी म्हणजे कृष्णाच्याच बाळक्रीडेच्या गोष्टी."

"तें कांही आपल्याला माहीत नाही. आम्हाला आपला आमच्या आजीचा बाळकृष्ण ठाअूक. लंगडा लुच्च्या गुलाम! कसा हातांत लाडू घट्ट धरून तिच्या देव्हाऱ्यांत बसलाय! आजोबा, त्यानं गणपतीचे लाडू आपणच सगळेच्या सगळे गट्ट केले, ती गोष्ट तुम्हाला ठाअूक आहे का हो? आपल्याला तर त्या गोष्टीची आठवण झाली की पोट धरधरून हसायला येतं बुवा. आपल्याला बुवा दुसऱ्या कोणत्याच गोष्टी आवडत नाहीत. बाळकृष्णाच्या तेवढ्या आवडतात. रोज सांजचीं जेवणं झालीं की आजीचं अंथरूण गाठलंच! तिच्या पुढ्यांत घुसून त्याच त्याच गोष्टी पुनःपुन्हा तिच्या तोंडून अैकायच्या आणि मग झोपेंत त्या सगळ्या पाहायच्या. आजोबा, झोपेंतच हें कसं दिसतं हो? अन् मग आता कां नाही दिसत? आजोबा, झोपेंतल्या सारखा बाळकृष्ण आम्हाला कधीं दिसेल का? आमच्याशीं खेळेल का?"

"आता कुठला रे बाळ, तो दिसणार? तो देवाचा अवतार, अेकदा होअून गेला."

"हूंऽऽऽऽ! आमची आजी असंच कायसंसं म्हणत असते. बाकी आजोबा, खरोखरच जर तसा बाळकृष्ण पुन्हा आला, तर काय मौज होअील! आमच्या आअीला मग कसं अगदी गप्प बसावं लागेल! हेंच करूं नको, तेंच करूं नको; अुन्हांतच जाअूं नको. तिला वाटतं म्हातारीं माणसं पोथ्यापुराणं करीत असतात, तसं लहान मुलांनीहि सदा पुस्तक घेअून बसावं— अगदी साळसूद असावं."

वृद्धाच्या मनांत प्रश्नचिन्हें डोकावूं लागलीं. साशंक होअून ते विचारांत पडल्यासारखे झाले. अुजव्या पंजाचीं बोटें हनुवटीवर ठेवून आंगठ्याने खालचा ओठ गोंजारूं लागले. मुलाचें बोलणें चालूच होतें,—

"— आजोबा, गोकुळांत सगळ्या मुलांची कशी लाट होती हो! आमच्या बाळकृष्णापुढं त्यांच्या आया अगदी गप्प! जर का अेखादी कांही बोलली की, हूं! आजोबा, कां नाही हो पुन्हा तसा बाळकृष्ण यायचा म्हणतां!"

"छे रे, आता कसचा येणार तो! गोकुळांतलीं मुलं भाग्याचीं म्हणून—"

"हं, गोकुळांतलीं तेवढीं मुलं, आणि आम्ही कांही मुलंच नव्हेत वाटतं?"

"नव्हेत कशीं? आहांत, आहांत. पण छेः! आहांत कसलीं? अेकटा तूंच काय तो तेवढा दिसतो आहेस! बाकीचीं— हंःऽऽऽऽ!"

असा नुसता सुस्कारा सोडूनच ते अिथे थांबले. हृदयांत कांहीतरी कालवाकालव होअूं लागली. स्वतःवरच जणू चिडल्यासारखी त्यांची मुद्रा दिसूं लागली. कपाळावर त्यांनी हात मारून घेतला. मान खाली घातली. अितक्यांत मुलगा विचकेल याची त्यांना आठवण झाली. त्या कालवाकालवीच्या चिर्डीतून त्यांनी कसाबसा आवेश आणला; आणि त्या आवेशांतच ते बोलूं लागले, "बाकीचीं ?— आहेत, रग्गड आहेत ! पण त्यांना 'मुलं' का म्हणायचं ? आम्ही म्हातारे बरे ! प्रदक्षिणांनी सतावून सोडणाऱ्या बायकांना नवीं नवीं पिंपळपानं पुरवतां पुरवतां पुरेवाट होअूनच कीं काय, पिंपळानं आता पाचोळाच द्यायला सुरवात केली आहेशी दिसते ! अुन्हांत करपून जायचा, वाऱ्यानं उडून जायचा, पावसानं कुजून जायचा ! असला हा पाचोळा तुझ्या त्या बाळकृष्णावरोबर काय खेळणार ? आणि बाळकृष्ण तरी असल्या पाचोळ्याकरता धांव घेत काय येणार ? आता तुझ्यासारखं अेखादं ताजं टवटवीत पिंपळपान मस्तकीं धारण करण्याच्या लोभानं देवानं पुन्हा बालरूप घेतलं तर नकळे ! घेअील— घेअील— घेअीलहि कदाचित् ! "

"खरंच ? खरंच घेअील ? आहा ! तसं घेतलं तर किती किती मौज होअील ! आमची आअी तर येअीलच, पण तो या बागेचा म्हातारा— तोहि चांगला वठणीवर येअील ! आजोबा आताची ही जम्मत त्या म्हाताऱ्याचीच आहे हो ! "

पुन्हा आंवढा गिळीतच वृद्धांना आपल्या चर्येवर खोटें हास्य आणावें लागलें. आणि— काय करतात विचारे !— बळेंच उत्सुकता दाखवून विचारावेंहि लागलें, "त्या म्हाताऱ्याची होय ? हं ! काय, काय सांग पाहूं ?"

मुलाने तें गाठोडें सोडलें, आणि अेका अुडींतच वृद्धासमोर येअून 'ही पाहा आजोबा ती जम्मत !' असें म्हणत त्यानें तें त्यांच्यासमोर ठेवलें.

"हे तर नीव दिसतात !" चकित होअूनच वृद्ध अुद्गारले आणि किंचित् बागेकडे दृष्टिक्षेप करून ते मुलाकडे रोखून पाहूं लागले.

"हो ! त्या म्हाताऱ्याच्या या बागेंतले बरं हे ! दुपारच्या वेळीं रखवालदार झोपला आहेसं पाहून अितक्यांतच हे झाडावरून काढले !"

'गैरशिस्त ! किती गैरशिस्त !' असे अस्फुट ध्वनि कोठून बरें अुमटल्याचा वृद्धांना भास झाला. ते अिकडे तिकडे पाहूं लागले. मुलगा आपल्या जम्मतीच्या रंगांत बोलतच होता.

"—पण कुत्र्याला ही चाहूल लागलीन् तो भुंकला ! त्यानं रखवालदार जागा झाला ! मग काय, सद्यांत नीवांचं गाठोडं करून अेकदम नदींत अुडीच घेतली ! रखवालदाराला त्या बाजूची हुलकावणी दिली न् बुडून अिकडे वळलों. मला जायचं होतं पलिकडे. पण हा हात अडलेला, तेव्हा अिकडे वळावंच लागलं. वळतां वळतां अेकदोन भोवरे चुकवले. पण या अखेरच्या भोवऱ्यांत सांपडून जरा घुटमळलों. पण काय, आमच्या यमुनेंतल्या बाळकृष्णाची आठवण झाली— अन् जिरवली या कालियाची !"

अितकें रंगदार बोलणें, पण वृद्धांचें त्याकडे लक्ष अर्धवटच असेल नसेल. कारण 'मुख्याध्यापक' या वेळीं त्यांच्या डोक्यांत संचरूं लागला होता. 'शिक्षा ! शिक्षाच पाहिजे असल्या गैरशिस्तपणाला !' अशी अुसळी आंतून येत होती. डोळ्यांवर तिची धुंदीहि आल्यासारखें होत होतें.

पण– डोळे त्या मुलाकडे वळले मात्र– खरकन् धुंदी अुतरली. आणि त्या डोळ्यांना मुलाअैवजी कालियाच्या मस्तकावर विराजमान अशी बाळकृष्णाची हसरी मूर्ति समोर दिसूं लागली !

'मुख्याध्यापका'चें पिशाच आंतल्या आंतच गाडलें गेलें. हृदय भक्तिपूर्ण वात्सल्याने भरून आलें. अेकदम पुढे होअून वृद्धांनी त्या मुलाला पोटाशीं कवटाळून घेतलें आणि सद्गदित होअून ते आपल्याशींच अस्फुट स्वरांत बोलूं लागले, 'देवानं हें बालरूप खरोखरच घेतलं का? खरंच– खरंच घेतलं का? आणि या बालरूपालाच मी– मी शिक्षा करणार होतों !' पुढे त्यांच्याने बोलवेच ना.

आजोबा आपल्या जम्मतीच्या बहादुरीचें हें कौतुक करीत आहेत असें साहजिकच या वेळीं मुलाला वाटलें. बाकी त्यांचें तें अस्फुट बोलणें त्याला कांहींच समजलें नाही. वृद्धांचें हृदय त्या मुलासंबंधानें आता वात्सल्याने ओथंबून गेलें होतें. तो कोण, कुठला हें समजण्या-विषयी ते आतुर झाले. त्यांनी त्याला विचारलें, "मुला, कुणाचा रे तूं? तुझं नांव काय? धन्य धन्य तुझीं माता-पितरं ! किती भाग्याचीं !" शेवटचे अुद्गार किती लालसेने बाहेर पडले ! मुलाला आजोबांच्या या कौतुकाने साहजिकच धन्यता वाटली. पण या वेळीं तो आपल्या जम्मतीच्या रंगांतच अधिक होता. तो म्हणाला, "आजोबा, ती सारी कुळकथा मी मागाहून सांगेन. खरी जम्मत ती काय, ती कुठं अजून तुम्हीं अैकलीत?"

"हो हो. खरं खरंच. सांग, सांग पाहूं."

"त्या म्हाताऱ्याला किनअी, अगदी अेकुलता अेकच नातू आहे. माझा धाकटा भाअू सुरेश, त्याच्याअेवढा तो सात आठ वर्षांचा असेल. अेकुलता अेक पण किती केविलवाणा दिसतो. आजोबा, म्हातारा त्याला अभ्यासापायीं सारखा घरीं डांबून ठेवतो हो ! अिकडे तिकडे होअूंच देत नाही. आमच्यासारखंच त्याला खेळाबागडावंसं वाटत का नसेल?"

वृद्धांच्या 'जरठ' मनाला जरी हा चिमटासा वाटला, तरी तो बालवृत्तीची जागृति करून देणारा देवाच्या बालरूपाने घेतलेला चिमटा ! वृत्तीने बाल होत चाललेल्या वृद्धांना त्या चिमट्याने आता अुलट गुदगुल्याच झाल्या. मुलाच्या प्रश्नावर कांहीतरी बोललं पाहिजे म्हणूनच ते म्हणाले, "वयामुळं तो म्हातारा जरा अवधीरा झाला आहे. झट्पट् बी. अे. करून त्याला विलायतेला पाठवायचा त्याचा विचार आहे असं अैकतों आम्ही."

"आम्ही नानांच्या तोंडून या सगळ्या गोष्टी अैकल्या आहेत. त्या अैकून आम्हांला कांही राहवेना. वाटे की, गोकुळांतला बाळकृष्ण या वेळीं हवा होता. तो कसा गोकुळांतल्या झाडून साऱ्या मुलांना घराबाहेर काढून वाळवंटीं डाव मांडायला घेअून जाअी ! आम्ही ठरवलं ! मी न् सुरेश– अेक दिवशीं आम्ही त्या विजयला त्याच्या शाळेंत जाअून गांठला !"

'शाळा !' हा शब्द कानीं पडतांच गाडलेला 'मुख्याध्यापक' डोकाअून पाहूं लागला. नव्हे, त्याने मधेंच तोंडहि घातलें, "काय रे तुम्हांला शाळा नाही का?"

"तसली होय? आमचे नाना म्हणतात, तसली शाळा म्हणजे मुलांचा कोंडवाडाच !"–

अभावितपणें आलेली ही अचूक थप्पड बसतांच 'मुख्याध्यापक' सुन्नच झाला ! मुलगा बोलतच होता— "आमच्या आअीची मात्र सारखी भुणभूण, आम्हाला त्या कोंडवाड्यांत घालावं म्हणून. पण नाना तिकडे लक्षच देत नाहीत. ते किनअी, आजोबा, अेक बालसंवर्धना-

लय काढणार आहेत. पण कोंडवाड्यांत नव्हे हो! मोकळ्यांत!— त्याऽऽऽऽपलीकडच्या टेकडीवर!" मुलाने बोटाने पलीकडची अेक टेकडी दाखविली.

सुन्न झालेल्या 'मुख्याध्यापका'ची मुद्रा कोडें पडल्यासारखी हतबुद्ध झालेली दिसली. पण वृत्तीने बाल होत चाललेल्या वृद्धांना 'बालसंवर्धनालय' हा 'देवाच्या बालरूपा'च्या तोंडून निघालेला शब्द मंत्रवत् मोहिनी घालणारा झाला. त्या तंद्रींत ते आपल्याशींच अस्फुटपणें बोलूं लागले. 'बालसंवर्धनालय! या बालसंवर्धनालयांत आपल्या विजयला घातला, तर तो या बाल-रूपाचा सौंगडी होअील! अन्– मग– तो याच्यासारखाच टवटवीत– होअील? तसा झाला तर! मीं– मींच– या अभाग्यानं तर त्याचा पाचोळा– पाचोळा करून टाकला आहे' पुढे अेकदमच आतुरतेने त्यांनी मुलाला विचारलें, "काय रे, हें बालसंवर्धनालय तुझे नाना केव्हा काढणार आहेत?"

"तें सगळं सगळं मी तुम्हाला मग सांगेन. आधी जम्मत अैका. पहिल्या पहिल्यानं किनअी आजोबा, तो विजय आम्हाला विचकतच असे. आम्हाला वाटे हा अगदी कुढाच आहे. पण रोज आम्हीं त्याला गांठावं, बाळकृष्णाच्या खूपखूप जम्मती सांगाव्या. अशी सारखी त्याच्याशीं सलगी वाढवली. तेव्हा मग तो आमच्याशीं जरा बोलूं लागला. पण किती भेदरट आणि शिष्टासारखा झाला आहे तो. नाना सांगतात, तो म्हातारा त्याला डांबून ठेवतो म्हणून, पण तसं चुकूनसुद्धा कधी त्याच्या तोंडून आलं नाही. तो म्हणायचा, 'मला किनअी शाळेचा अभ्यास सारखा करावा लागतो. अेरवी होतच नाही रोजचा अभ्यास पुरा. अन् त्यामुळं तुमच्यासारखं बाहेर फारसं येतांच येत नाही.' असं तो म्हणे, पण मनाची आंतली ओढ दिसल्यावांचून राहत नसे. केव्हा केव्हा तो आम्हाला म्हणायचा, 'तुम्ही बाळकृष्णाचे सौंगडी! किती भाग्याचे!' अेखादे वेळी असंहि म्हणायचा, 'आज किती किती दिवसांत मी आमच्या बागेकडे गेलोंच नाहीं.' असंच अेक दिवशीं म्हणत असतां त्याच्या मनांतली अेक हुरहुर सहज बाहेर पडली. 'आमच्या बागेंत किनअी, अेक अमृतफळाचं झाड आहे. त्याला नीब म्हणतात. मागे अेकदा बागेंत गेलों होतों, तेव्हा माळ्यानं अेकदोन फळं मला खायला दिलीं होतीं. मला अेरवी अलिकडे कसली चवच लागत नाही. पण तीं फळं किती मधुर लागलीं. पण पुन्हा कांही तीं मिळालींच नाहीत. मला किनअी खोकला होतो. त्याला तीं बरीं नाहीत म्हणतात. पण मागं खाल्लीं तेव्हा किती बरं वाटलं होतं मला! तुम्हाला ठाअूक आहे का त्याला अमृतफळ कां म्हणतात तें? कांही असो, पण मला मात्र तें अमृता-सारखं वाटलं खरं.' ही त्याची हुरहुर अैकली आणि सुरेश न् मीं ठरवलं! काय वाटेल तें होवो, कसंहि करून तीं फळं या विजयला आणून द्यायचींच! दुसरीकडे कांही कुठं तीं मिळेनात. मग बागेवरच पाळत ठेवली. अन् अखेर आजोबा आज हीं अशीं पैदा केलीं! अेवढा सोन्यासारखा अेकुलता अेक नातू, त्याला आपल्या बागेंतलं अेखादं फळ खावंसं वाटलं तर तें त्याला अुघड अुघड बागेंत येअून खायला मिळूं नये? पहिल्यानं आमच्या मनांत असंच आलं, त्या विजयला शाळेंतून अिकडं बागेंतच घेअून यावं. आणि अुघड अुघड माळ्याकडूनच फळं काढून घ्यावीं. पण हा आमचा नुसता विचार अैकूनच तो भेदरला. मग अखेर आम्हीं हा बाळकृष्णाचा अुपाय योजला. आता आजोबा, त्या म्हाताऱ्याच्या नाकावर टिच्चून हीं फळं त्या विजयला आम्ही नेअून देणार! आज शाळा सुटली, की रोजच्याप्रमाणं त्याला गाठून ही जम्मत पार पाडणार आम्ही!"

'नाकावर टिच्चून' हे शब्द अुच्चारीत असतां, आवेशांत मुलाची हाताची मूठ

अभावितपणें अगदी वृद्धांच्या नाकापर्येत गेली होती. पण ते या वेळीं बालवृत्तींत रंगत चालले होते. आपल्या विजयच्या अवस्थेचें चित्र त्यांच्या समोर येअी. पण तें माणसाने बनवलेलें बालरूप ! आणि तेंहि या वेळीं केवळ कल्पनाचित्र. पण हें देवाचें बालरूप प्रत्यक्ष डोळ्यां-समोर. त्याची ती वृत्ति, तो आवेश हीं पाहून त्यांचें हृदय भरून आलें. त्यांच्याने राहवेना. त्यांनी त्या बालरूपाला कवटाळून अुचलूनच घेतलें. त्याचा पापा घ्यावा असें त्यांच्या मनांत आलें होतें कीं काय, कुणास कळे !

पण अितक्यांत दुरून कुत्र्याचें भुंकणेंच अैकूं आलें. तें अैकतांच मुलाने गडबडीने आपल्याला वृद्धाच्या मिठींतून सोडवून घेतलें, आणि तो म्हणाला, "हं ! आजोबा, तो रख-वालदार ! तो अिकडे आलाच ! मला आता निसटलंच पाहिजे."

बालवृत्तींत रंगलेले आजोबा साहजिक या वेळीं त्याचे साथीदारच बनले ! दोन्ही हातांनी त्याला ढकलीतच ते म्हणाले, "जा जा ! पळ, पळ, पळ ! निसट अिथून ! तो रखवालदार आलाच तर पाहून घेअीन मी त्याला. त्याला बोलण्यांतच गुंतवीन. तोंपर्यंत तूं निसट म्हणजे झालं."

मुलाने लगबगीने पुन्हा त्या नीवांचें गांठोडें केलें आणि तें कांखेंत मारून आपल्या त्या वृद्ध साथीदाराकडे कौतुकाने पाहत सलगीनेंच तो त्यांना म्हणाला, "आजोबा, जातों आता मी. तुम्ही त्या रखवालदाराला पाहा. माझी सगळी हकिकत सांगेन केव्हा तरी तुम्हाला." असें बोलून धूम ठोकीतच त्याने तेथून सूंबाल्या केला.

मुलाने आपली पाठ फिरवून धूम ठोकली मात्र, वृद्धाचा तो बालवृत्तीचा आवेग ओसरल्यासारखाच झाला. त्याला 'जा पळ, निसट अिथून' असें म्हणण्याचें वस्तुतः त्यांना आता कांही कारण होतेंच असें नाही. बालवृत्तींत रंगल्यामुळे स्वाभाविकपणें जमतीखातर त्यांच्या हातून तें तसें होअून गेलें. पण आता मात्र त्यांना त्याबद्दल पश्चात्तापच वाटूं लागला. ते त्या पळत जाणाऱ्या मुलाकडे ओढ घेअून सारखे पाहत राहिले. आपलें आपल्याला फिरून गवसलेलें बाळपण-- तेंच या मुलाच्या रूपाने आपणापासून निसटून जात आहे, असेंच त्यांना वाटूं लागलें. ओढ अितकी तीव्र झाली की आपणहि मागोमाग पळत जाअूनच त्याला गाठावें आणि परत घेअून यावें अशी अुकळी त्याना येत होती. पण अितक्यांत मागाहून तो कुत्रा भुंकत आलाच; आणि अगदी तीरासारखा तो नेमका त्या मुलाच्या रोखाने त्यांच्या अंगावरून गेलेला त्यांनी पाहिला.

"टिप्या फीर मागं !" अशी दर्डावून त्यांनी त्याला हाक मारली. तोंच, घामाघूम झालेला रखवालदारहि मागोमाग आला आणि म्हणाला, "मालक, टिप्याला हाक कशाला मारतां ? अहो तो– तो पोरटा आपल्या बागेंतलीं फळं चोरून घेअून पळून चालला आहे ना ?" असें बोलून तोहि टिप्याच्या मागोमाग जाअूं लागला. पण वृद्धांनी त्यालाहि मजाव केला, "काय रे तूं कधी पोरटा नव्हतासच का रे ? का अरसाच्या अरसा अेकदम रखवालदार म्हणूनच आभाळां-तून पडलास ! फिर मागं ! टिप्यालाहि हाक मार ! आपलं पोरटेपण अगदी विसरलासच ऑं ?"

रखवालदार बिचारा 'आ' वासूनच आपल्या मालकाकडे पाहूं लागला. "अरे असं 'आ' वासून पाहायला काय झालं ?" असें वृद्ध त्याला म्हणाल्याचें त्याने अैकलें. पण त्यावर अुलट तो अधिकच बुचकळ्यांत पडल्यासारखा झाला. 'मालकांच्या आवाजांतला तो करडे-पणा ?– तो आज काय झाला ?' कांही न बोलतां चुकल्यासारखें होअून तो तसाच नवल करीत नुसता पाहत राहिला.

वृद्ध हें सर्व मिस्किलीच्या चोरट्या नजरेने पाहत होते, आणि आंतल्याआंत त्यांना गुदगुल्या होत होत्या. अितक्या की त्या बाहेर पडतात कीं काय असें त्यांना भय पडलें. म्हणून थोडा गंभीरपणाचा आव आणूनच ते त्याला म्हणाले, "असा नुसता अुभा काय राहिलाहेस? त्या कुत्र्याला आवर ना! आणि हें पाहा, हें माझं धोतर धुअून अुन्हांत वाळत घाल. आणि माळ्याला म्हणावं, त्या नीवावरचे चांगले टोपलीभर नीव काढून ठेव. अन् लागलीच तूं घराकडे जा. गाडीवाल्याला ताकीद दे की विजयची शाळा सुटायच्या अगोदर अेक तास गाडी अिथं तयार पाहिजे म्हणून."

रखवालदार कुत्र्याला घेअून मुकाट्यानेच तेथून गेला. पण जातां जातां किती वेळां तरी त्याने मागे वळून पाहिलें असेल! 'मालक आपले त्या पळून गेलेल्या चोरट्याच्याच रोखाने सारखे टक लावून पहात अुभे!!!'

---

# स्त्रियांच्या म्हणी

(६० व्या अंकावरून पुढे)

(५६१) घुसळतीपेक्षा उकळतीच्या घरीं अधिक. (घुसळती– स्वतःच्या घरीं ताक करणारी; उकळती– दुसऱ्याच्या घरून मागून आणणारी).
(५६२) शेजी देईल काय, अन् मन धायेल काय? (शेजी– शेजारीण; धाय– समाधान)
(५६३) मी नाहीं खात, माझें मन त्यांत.
(५६४) मुसळ अुखळाकडे जातें, पण अुखळ मुसळाकडे जात नाही.
(५६५) शेजीचा पाहून संसार, सवतीचा पाहून शृंगार.
(५६६) लोकाची नथ, नाकाला दुखापत.
(५६७) माझा जीव तुझ्यापाशीं, तुझा जीव कुत्र्यापाशीं.
(५६८) अधीर अुपाशी, जीव टोपल्यापाशीं.
(५६९) दुबळ्याने घेतलें म्हसरूं, तंगडीला बांधलें वासरूं.
(५७०) नकट्या देवाला पदवी आली, तेथे यात्रा भरूं लागली.
(५७१) सख्ख्या सासूला लावला पाय, मावससासू अुठून जाय.
(५७२) भावाच्या बळावर लग्न, सोयऱ्याच्या बळावर अुडणं.
(५७३) चांग केला भांग केला नेटा, मोहतुराच्या बायकोचा धिंगाणा मोठा.
(५७४) कडेवर पोर, गांवभर गजर.
(५७५) बेत धुंदुर्मासाचा, जेवणें प्रदोषाचीं.
(५७६) श्रीमंताची बेटी, गरिबाची लंगोटी.
(५७७) भाकरी झाल्यावर चूल पेटती, नवरा मेल्यावर बायको संसार करती.
(५७८) हात पडले सांदी, तर तोंड पडलें बंदी. (हाताने काम केलें नाही तर तोंड काय खाणार?)
(५७९) अुथळ तीर्थाला दुरून नमन.
(५८०) आअीबाप दुबळीं, आवसेपुनवेला ओंबळी (ओंबाळणें– आंघोळ घालणें)

**नीळकंठ शंकर नवरे**

# रद्दींतील रत्नें

## अेक अज्ञात साहित्यिक

**कै. वामन बाळकृष्ण रानडे.** (जन्म शनिवार ता. १२-११-१८५४. मृत्यु मंगळवार ता. २२-८-१८९९) [ज्ञानप्रकाश (संपा० हरि नारायण आपटे) मधील मृत्युलेख]

"रा. रा. रानडे हे म्हणजे कोणासही माहीत नाहीत असें नाही. त्याच्या विनोदी आणि अत्यंत मनमिळाअू स्वभावामुळे हे गृहस्थ येथील सर्व मंडळीस माहीत होते अितकेंच नव्हे तर ज्यास ज्यास म्हणून हे माहीत होते त्या सर्वांचें त्यांजवर प्रेम होतें. त्यांचा जन्म पंचवटी येथे शके १८७६ च्या कार्तिक महिन्यांत झाला. त्यांचे वडील बाळकृष्णशास्त्री हे पंचवटींतील अेक मोठे विद्वान शास्त्री होते. घरची अत्यंत गरीबी असल्यामुळे वामनरावांचा विद्याभ्यासक्रम पुरा झाला नव्हता. तथापि संस्कृत विद्या घरचीच असल्यामुळे त्या भाषेचें ज्ञान त्यांना चांगलें झालें होतें. याशिवाय अभ्यास करून त्यांनी अिंग्रजी भाषेचेंही बेतापुरतें ज्ञान मिळविलें होतें. ते वयाच्या १४ व्या वर्षीच वर्तमानपत्रांत लेख लिहूं लागले होते. प्रथमतः त्यांचीं बातमीपत्रें अिंदुप्रकाशमध्ये प्रसिद्ध होअूं लागलीं. कै. वा. विष्णुशास्त्री पंडित, त्या वेळचे अिंदुप्रकाशाचे अेडीटर, यांनी त्यांची अल्पवयांतील लेखनोत्सुकता पाहून त्यांस लिहिण्यास अनेक प्रकारें अुत्तेजन दिलें, व त्यामुळे लेख लिहिण्याचा त्यांचा अभ्यास वाढतच चालला. पुढे विद्यार्थिदशेंतच त्यांनी नाशिकवृत्ताचें अेडिटरचें काम पतकरलें. यानंतर १८७९ सालीं रा. ब. गोपाळराव देशमूख यांचेकडे नोकरी धरली. लोकहितवादी या नांवाने प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाचीं कच्चीं टिपणें वामनरावांचे हातूनच ते तयार करवीत. याच अवकाशांत ठाणें येथील हिंदुपंचाचें चालकत्व त्यांचेकडे आलें. तें काम त्यांच्या मृत्यूपर्यंत त्यांजकडून चाललें होतें. हिंदुपंचाला जें अेक-प्रकारचें मोहकत्व प्राप्त झालें होतें तें त्यांच्या लेखनचातुर्यानेच होय. हिंदुपंचाप्रमाणेच सूर्योदयही त्यांनी कित्येक दिवस चालविला आहे. गोपाळराव देशमूख यांचेकडील काम संपल्यावर त्यांनी ता. १ मे १८८४ पासून ज्ञानचक्षूचें अेडीटरचें काम पतकरिलें आणि तें ते अखेरपर्यंत पहात होते. याशिवाय सोलापूरच्या कल्पतरूचेंही अेडीटरचें काम ते करीत असत. अशा तऱ्हेने त्यांचें अेकंदर आयुष्य लेखनांतच गेलें. त्यांचीं हिंदुपंचांतील कांहीं प्रकरणें मनोरम आहेत. चक्षूमध्ये त्यांनी विद्यमान पुरुषांची चरित्रमाला सुरू केली होती, ती फार चांगली होती. त्यांचा स्वभाव प्रेमळ, मनमिळाअू, विनोदी, आनंदी व निस्पृह असा होता. गरीबींतही ठाकठिकीनेच नव्हे तर श्रीमंताच्या बरोबरीनें संसार कसा करावा ही कला त्यांच्या अत्यंत सुशील व प्रेमळ गृहिणीचे सहाय्याने त्यांस फारच अुत्कृष्ट साधली होती. राष्ट्रीय सभेचे हे पहिल्या नंबरचे केवळ पदाभिषिक्त भक्त होते. तिच्या हरअेक अुत्सवाचा हा प्रेमळ वारकरी तिच्या आर्चनाविषयीं तत्पर असे. वामनराव हे सुधारक पक्षांतील होते; त्यामुळे त्यांस आप्तसंबंधी यांकडून वगैरे पुष्कळ त्रास सोसावा लागला. परंतु तो त्यांनी मोठ्या गंभीरपणाने आणि धैर्यानें सोसला. ते प्लेगने आजारी पडल्याची बातमी गावांत पसरल्यापासून त्यांचेकडे समाचारास मित्रमंडळींची सारखी रहदारी लागली होती यावरून त्यांचेविषयी त्यांचे मित्रांस किती प्रेम होतें हें दिसून येतें. त्यांचे मित्र-मंडळीचा समुदाय फार मोठा व सर्वत्र पसरलेला होता. ते विलक्षण मार्मिक व संग्रही असत. त्यांचेजवळील लेखांचा, टिपणांचा, चित्रांचा, कवितांचा वगैरे संग्रह आणि त्यांतील व्यव-स्थितपणा हे पाहून कोणालाही कौतुक वाटल्यावाचून रहात नसे. मरणसमयीं त्यांचें वय पंचेचाळीस वर्षांचें होतें."

अनुक्रमणिका

# मराठींत शंभर अंकांना समुदायवाचक नांवें आहेत काय?



(लेखक— श्री. विठ्ठल गणेश ताम्हणकर)

माझा आवडीचा विषय म्हणून मराठींतील 'अंक व पाढे' या विषयाचा मी अि. स. १९१२–१४ सालीं अभ्यास करीत असतां त्याच्या अनुषंगानें मराठी भाषेंत 'शंभर' अंकांचा त्यांच्या संख्यावाचननांवांप्रमाणे समुदायवाचक नांवें आहेत काय असा प्रश्न माझ्या मनांत अुत्पन्न झाला व त्या प्रश्नाचें आस्तिपक्षीं अुत्तर देणारा अेक लेख "विविधज्ञानविस्तारा"च्या अंकांतील **महाराष्ट्र साहित्य पत्रिके**च्या भागांत अि. स. १९२५ सालीं मीं प्रसिद्ध केला. त्या वेळीं पाढ्यांची पाठभाषा हा माझा अभ्यासाचा मुख्य विषय असून पाढ्यांच्या परिभाषेंत अेकवाक्यता करणें अेवढाच त्या वेळच्या माझ्या प्रयत्नांचा अुद्देश होता.

शंभर अंकांचीं नांवें हीं वस्तुतः नामें नसून संख्यावाचक विशेषणें आहेत ही गोष्ट अुघड अुघड आहे. त्याच नांवांना समुदायवाचक पोषाख घालून कांही निराळीं नांवें देतां येतात का—तशीं तीं देण्याची योजना मराठींत आहे का—हा प्रस्तुत मुख्य विषय आहे. जोडा-जोडी, चौकडा-चौकडी, दसकडी, विसा, पांचे, पाचुंदे, हाते असे कित्येक अंकविषयक समुदायवाचक शब्द मराठींत रूढ आहेत. यावरून भाषेंत अशा शब्दांची आवश्यकता व त्यामुळे योजना असते. पण सर्वच शंभर अंकांना अेखाद्या विशिष्ट नियमाने समुदायवाचक नांवें आहेत का, अथवा नसल्यास तीं देतां येण्यासारखीं आहेत का, या प्रश्नाचें अुत्तर शोधावयाचें आहे.

सामान्यतः कोणत्याहि प्रगल्भ व सुधारलेल्या भाषेंत निरनिराळ्या कल्पना व्यक्त करण्यासाठीं निरनिराळे शब्द असणें अवश्य मानलें जातें. अंकाच्या संख्यावाचक नांवाचाच अुपयोग समुदायाची कल्पना व्यक्त करण्यासहि गेला जावा हें भाषेच्या प्रौढपणाचें लक्षण खास नव्हे.

मराठींतील शंभर अंकांना समुदायवाचक नांवें आहेत काय या प्रश्नाचा अुगम नवीन पद्धतीने पाढ्यांचें शिक्षण देण्यास त्या शब्दांची जरूरी भासली या गोष्टींत आहे.

अंकांच्या समुदायवाचक नांवांची सोय मराठींत नाही अशी सामान्य समजूत असल्याने पाढे मिळवणीच्या स्वरूपाने शिकविण्यासाठी अनुरूप भाषा—समुदायवाचक शब्द—नाही ही मोठीच अडचण आहे. विचार करतां करतां खेळण्याच्या पत्त्यांच्या नांवांकडे सहज लक्ष गेलें व त्या नांवांत व पाढ्यांतील पारिभाषिक शब्दांत बरेंच साम्य असल्याचें दिसून आलें व या विषयावर अेकदम प्रकाश पडल्याचा भास झाला. पाढ्यांतील पारिभाषिक शब्दांचा सामान्यतः 'वेळावाचक' अर्थ जसा मागच्या पिढींत शिकविला जात होता तसाच तो आजहि शिकविला जात आहे. पत्त्यांचीं नांवें हीं त्यांवरील ठिपक्यांच्या समुदायांचीं नांवें आहेत हें कोणीहि कबूल करील. त्यांचीं अनेकवचनी रूपें पाढ्यांच्या परिभाषेशीं बव्हंशीं जुळतात. पत्त्यांचीं नांवें अथवा पाढ्यांची परिभाषा कधीं लिहिली जात नाही. तीं तोंडातोंडीच प्रचारांत आहेत व अर्थातच अलिखित भाषेप्रमाणे त्यांत नियमबद्धता न राहतां त्या नांवांच्या रूपांत स्वाभाविकपणेंच अराजकता अुत्पन्न झाली आहे. भाषेच्या दृष्टीने पाढ्यांची परिभाषा शब्दांत लिहिण्याची प्रथा

पाडतांना त्या परिभाषेची छाननी होणें आवश्यक आहे व तसा प्रयत्न मी करीत असतांना त्या शब्दांच्या व्युत्पत्तीकडे लक्ष देणें प्राप्तच झालें. कै. श्री. चिंतामणराव विनायक वैद्य अेम. अे., अेल्‌अेल्. बी., या विद्वान गृहस्थांशीं त्यांच्या हयातींत या बाबतींत विचारविनिमय करण्याची मला संधि मिळाली होती व त्यांनीच प्रसिद्ध वैयाकरणी वररुचि यांच्या 'प्राकृत-प्रकाश'ग्रंथाकडे माझें मन वेधलें.

पाढ्यांची परिभाषा व पत्त्यांचीं नांवें यांबद्दल तारतम्याने विचार करतां अेका-अेके, त्रीक-चोक, पंचा-पंचे, सक, सत्ता-सत्ते, अठ्ठा-अठ्ठे, नव्वा-नव्वे, दहा-दाहे अशीं अेक व अनेकवचनी रूपें विचारांत घेतलीं पाहिजेत. दुणा-दुणे, त्रीक, चोक या पाढ्यांतील पारिभाषिक नांवांत व पत्त्यांतील दुव्वा-दुरी, तिव्वा-तिरी, चव्वा या नांवांत फरक आहे, पण बाकी पाढ्यांतील साती पारिभाषिक शब्द व पत्त्यांचीं नांवें यांत मोठेंच साम्य आहे. हे साती शब्द व त्रीक, चोक मिळून नअू शब्द संस्कृतांतील अेकक, त्रिक, चतुष्क, पंचक, पट्क, सप्तक, अष्टक, नवक व दशक या समुदायवाचक शब्दांपासूनच झालेले आहेत. त्रिक, चोक, व षट्क या तीन शब्दांतील अन्त्य 'क' हा मूळच्या संस्कृत शब्दांप्रमाणेच मराठींत कायम राहिला आहे व बाकीच्या सहा शब्दांत तो गळला आहे. या बाबतींत वररुचि यांचा प्राकृतप्रकाशामधील द्वितीय परिच्छेद सूत्रें १-२ हीं मार्गदर्शक होतात. "अयुक्तस्यानादौ ॥ १ ॥ कगचजतदपयवां प्रायोलोपः ॥ २ ॥" हीं तीं सूत्रें होत. मूळच्या संस्कृत शब्दांतील कित्येक अनादि व अयुक्त वर्णांचा प्राकृतांत विकल्पाने लोप होतो. अशा वर्णांचें यादींत "क" आरंभींच आहे.

चतुष्क व पट्क या शब्दांतील 'क' अनादि असला तरी अयुक्त नाही. यामुळे त्या 'क' चा लोप होत नाही. चतुष्क यांतील 'तु'चा 'ओ' होतो व रु. प्र. प. सू. ९ व 'प'चा लोप होअून 'क'चें द्वित्व होतें (व. रु. त्रि. प. सू. ५०।५१) या नियमान्वयें चतुष्क-चोक्क-चोक या परंपरेने 'चोक' शब्द झाला आहे. षट्क शब्दांतील 'ष'चा 'स' होतो. (व. रु. द्वि. प. सू. ४३) व 'ट' चा लोप होअून 'क' चें द्वित्व होतें (व. रु. त्रि. प. सू. ५०।५१). या प्रमाणे पट्क-सक्क-सक अशी 'सक'ची व्युत्पत्ति आहे.

वरील वररुचीच्या सूत्रांप्रमाणे 'त्रिक' त्यांतील 'क'चा लोप व्हावा. पण तो लोप वैकल्पिक असल्यामुळे 'त्रिक'मधील 'क' कायम राहिला. गुजराती भाषेंत 'त्रिक'अैवजी 'तरी' शब्द वापरतात व तेथे मूळच्या 'क'चा लोप झाला आहे. पत्त्यांच्या नांवांतहि 'तिरी' असा शब्द आहे. तो 'त्रिक'पासूनच झाला आहे.

बाकीच्या सात शब्दांपैकी अेक 'दुणा' शब्द वगळून साहि शब्दांतील 'क'चा लोप झाला आहे. जसें:—

| संस्कृत | प्राकृत | मराठी |
|---|---|---|
| अेकक | अेकअ | अेका |
| पंचक | पचअ | पंचा |
| सप्तक | सत्तअ | सत्ता |
| अष्टक | अठ्ठअ | अठ्ठा |
| नवक | नवअ | नव्वा |
| दशक | दसक-दहअ | दहा |

वरील मूळच्या साही संस्कृत शब्दांतील शेवटच्या 'क'चा प्राकृतांत व मराठींत लोप होतो (व. रु. द्वि. प. सू. १–२).

सप्तक व अष्टक यांतील प्त व ष्ट यांच्याबद्दल त्त व ट्ठ होतात (व. रु. त्रि. प. सू. ५०।५१). अथवा त व ठ असे अेकटे वर्ण राहून त्यांच्या मागील अक्षर दीर्घ होतें. याला वररुचीचा आधार जरी नाही तरी त्याच्या मागून झालेले हेमचंद्रादि टीकाकार व व्याकरणकार यांचा आधार आहे. दशक यांतील 'श'चा 'स' व 'स'चा 'ह' याप्रमाणे फेरफार होअून दहा असा समुदायवाचक शब्द मराठींत आला आहे (व. रु. द्वि. प. सू. ४३–४४). संख्यावाचक अर्थानेहि तोच वापरतात. अेकक, पंचक व नवक या शब्दांतील कचा लोप होअून अेका, पंचा व नव्वा असे शब्द झाले आहेत. 'दुणा' हा शब्द मात्र 'द्विक' या संस्कृत शब्दापासून निघालेला दिसत नाही. गुजराती भाषेंत 'क'चा लोप होअून 'टु' असा शब्द दुणे अैवजी येतो. टुव्वा-दुरी असे शब्द मराठींत पत्त्यांच्या नांवांत येतात ते द्विकपासून निघालेले दिसतात. दोन या शब्दापासून दोना (अे. क.) व दोने (अ. व.) होअून त्यांचींच रूपें दुणा व दुणें हीं झालीं असण्याचा संभव दिसतो. दुणा हा अेकटाच शब्द आपल्या नअू जोडीदारांपासून फटकून वागणार नाही.

सारांश, पाढ्यांत येणारे पारिभाषिक शब्द अेका-अेके, दुणा-दुणे, त्रीक, चोक, पंचा-पंचे, सक, सत्ता-सत्ते, अट्ठा-अट्ठे, नव्वा-नव्वे व दहा-दाहे हे समुदायवाचक– गटवाचक– नामें आहेत व भाषेच्या नियमानुसार त्यांचीं अेक-अनेकवचनी रूपें होतात. अंकांबद्दलच्या संख्या-वाचक व समुदायवाचक अशा दोन निरनिराळ्या कल्पना निरनिराळ्या शब्दांनी करण्याची सोय भाषेंत मूलतः आहेच ही गोष्ट लक्षांत येअील.

आतां १० पुढील अंकांबद्दल विचार करणें आहे. तो विचार करतांना 'अकरकीं' या सदराखाली जी पूर्वी अुजळणी शिकवली जात असे तिचा विचार करावा लागेल. अकरा-अकरे, बारा–बारे, तेरा–तेरे, चवदा–चवदे याप्रमाणे विसा–विसे येथपर्यंत दहा शब्द जे या अुजळणींत येतात तेहि समुदाय वाचकच आहेत व त्यांचीं अनेकवचनी रूपें येथे वापरलीं जातात. १ अकरा, १ बारा याप्रमाणे १ विसापर्यंतच्या पाढ्यांचा लोप झाल्यासारखा दिसतो येथे या शब्दांची संस्कृतापासून व्युत्पत्ति शोधण्याची जरूरी दिसत नाही. पहिल्या दहा अंकां-संबंधी जो नियम सिद्ध झाला त्याबरहुकूम पुढील अंकांचीं समुदायवाचक रूपें प्रचारांत आलीं. अकारान्त संख्यावाचक नांवांचीं समुदायवाचक रूपें आकारान्त होतात हा तो नियम होय. जेथे मूळचीं संख्यावाचक नांवें आकारान्तच आहेत तेथे तीं समुदायवाचक अेकवचनांत जशींच्या तशींच राहतात व मग त्यांचीं नियमानुसार अेकारान्त अनेकवचनें होतात. समुदायवाचक नांवाच्या दृष्टीने १ ते १०० अंकांचे चार भाग पडतात. पहिला १ ते ९ अंक, दुसरा १० ते १८, तिसरा १९ ते ९९ व चवथा १००. पहिल्या व तिसऱ्या भागांतील सर्व अंकांचीं नांवें (सहा व नअू यांखेरीज) अकारान्त आहेत, व दुसऱ्या भागांतील आकारान्त आहेत. १०० या अंकाचें संख्यावाचक नांव 'शंभर' व समुदायवाचक 'शे' आहे. 'शे' हा शब्द समुदायवाचकच वापरला जातो.

१ ते १०० अंकांचीं समुदायवाचक अेकवचनी रूपें जीं मीं आतापर्यंत सुचविलीं आहेत त्यांना पाढ्यांच्याच जुन्या वाचणींत आधार आहे. संस्कृत रिवाजाप्रमाणे 'अंकानां वामतो

गतिः' हें तत्त्वच पाढ्यांच्या जुन्या वाचर्णीत आढळतें. परंतु ती पद्धत अुचलतांना मराठी भाषेने त्या पद्धतींत आपली म्हणून कांही विशिष्टता ठेवली आहे. अंकांच्या १९९ पर्यंतच्या वाचर्णीत पहिल्याने ९९ पर्यंतचे समुदाय व मग शंभराचा समुदाय 'शे' याप्रमाणे वाचणी आहे. १ ते १८ अंकांच्या समुदायवाचक नांवांनंतर संस्कृत 'अुत्तर' या अधिक अर्थी शब्दाचा अपभ्रंश 'अुदर' या शब्दाचा अुपयोग केला जातो. जसें– पंचोदरशे, अठ्ठोदरशे, बारोदर-शे, सोळोदर-शे, विसा-शे, चोविसा-शे, छत्तिसा-शे, अैसा-शे, शाण्णवा-शे अित्यादि. या वाचर्णीत शे हा जसा समुदायवाचक शब्द वापरला आहे तसाच पंचा, अठ्ठा, बारा, सोळा, विसा, चोविसा, छत्तिसा, अैसा, शाण्णवा हेहि समुदायवाचक शब्द वापरले आहेत.

अितरत्र व्यवहारांत पंचे व विसे हे शब्द येतात. फळें मोजण्याचें पंचा हें माप असून विसा-विसे हें गवत वगैरे मोजण्याचें माप खेडोपाडीं चालू आहे. विशी, तिशी, चाळीशी असे समुदायवाचक स्त्रीलिंगी शब्दहि अेखाद्याचें वय सांगतांना आपण योजतों. वेताळपंचविशी, विक्रमबत्तिशी असे जुन्या काळांतील पुस्तकांच्या नांवांत या स्त्रीलिंगी समुदायवाचक शब्दांचा अुपयोग केलेला आहे. सोंगट्यांचीं दानें मोजतांना अकरे, बारे हे शब्द अुपयोगांत आहेत. कापसाच्या वातींचीं अकरा-अकराचीं जुडकीं स्त्रिया करतात, तेथेहि 'अकरीं' असें नपुंसकलिंगी अनेकवचनी समुदायवाचक रूप वापरतात.

तुलनात्मक दृष्टीने गुजराती भाषेंतील पाढ्यांच्या परिभाषेचा विचार करितां तेथेहि पाढ्यांच्या पारिभाषिक शब्दांचा समुदायवाचकच अर्थ मानला जातो ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. अेकुं, दु, तरी, चोकुं, पंचुं, छक, सत्तुं, अट्टुं, नवुं व दान अशीं समुदायवाचक अेकवचनी व अेकां, दु, तरी, चोकां, पत्रां, छक, सत्तां, अट्ठां, नवां, दान अशीं अनेकवचनी रूपें गुजरातींत आहेत.

व्युत्पत्ति, अितर व्यवहार, गुजराती भाषेंतील दुजोरा या रीतीने मराठींत अंकांच्या संख्यावाचक नांवाप्रमाणे समुदायवाचक नांवेंहि स्वतंत्र आहेत. तीं अेका विशिष्ट नियमाने बद्ध आहेत असें दिसून येअील.

या विषयाचा शिक्षणविषयक अुपयुक्ततेच्या दृष्टीनेहि विचार करण्यासारखा आहे. ती बाजू अेका स्वतंत्र लेखांत अन्यत्र छापविण्याची व्यवस्था होअीलच.

पाढ्यांची परिभाषा या विषयावर या पिढींत तरी अुद्बोधक चर्चा व्हावी व विचारांना चालना मिळून भाषेच्या दृष्टीने अिष्ट तोच निकाल लागेल या आशेने हा लेख लिहिला आहे.

———

# [प्रवेशपरीक्षेचें मराठी] पद्य-वेच्यांची निवड व संपादन

(लेखक— श्री. गो. कृ. मोडक)

सरकारी विद्याखातें मराठीच्या अध्यापनाचा प्रयत्न करितें. या प्रयत्नांत कांही प्रमाद घडल्यास, त्या संबंधांत योग्य ती खटपट करणें साहित्य-परिषदेचें कर्तव्य आहे. या बाबतींत साहित्य-परिषद् ही जनतेचे दृष्टीने न्यायसभाच आहे. या विचाराने या सभेच्या विद्वान घटकां-पुढे पुढील ओळी आपल्या पत्रिकाद्वारें ठेवूं अिच्छितों. पुढील लेखांतील 'जटायु-स्तुति' हा वेचा **यापुढेहि दोन वर्षे अभ्यासक्रमांत** राहावयाचा आहे. करितां त्याचा विचार विशेष महत्त्वाचा आहे हेंहि विद्वानांनी लक्षांत घ्यावें.

**१ निवड**— प्रवेश-परीक्षेसाठी नेमलेल्या वेच्यांत जटायु-स्तुति आहे. हा वेचा अत्यंत गचाळ आहे. या अेकावरून पाहतां, हे वेचे निवडण्यांत मुळीच काळजी घेतलेली दिसत नाही. परीक्षार्थ योग्य असे वेचे आपल्या संत-वाङ्मयांत शेकडो सांपडतील. पण कोणास ? जो पाहण्याची पर्वा करील त्यास. जुन्या वाङ्मयाशीं परिचय बाळगणाऱ्या प्राध्यापक चापेकरादि विद्वानांच्या जिव्हाग्रीं असे अनेक वेचे खेळतांना आढळतात. अशा विद्वानांचाहि वेच्यांची निवड करण्यांत अुपयोग करून घेतां येअील. सारांश— अभ्यसनीय वेचे निर्दोष अुत्तम असे काढणें हें काम कठीण नाही. प्रस्तुत वेचा काव्य या दृष्टीने त्याज्य आहेच; पण तो अतीव क्लिष्टहि झाला आहे. त्यांतील मायेचें वर्णन कवीने आपलें ब्रह्मज्ञान दर्शविण्यासाठीच केवळ केलेलें दिसतें. मुळांत म्हणजे अध्यात्म-रामायणांत मायेचें वर्णन असल्यास अत्यल्पच आढळेल. अर्थात् अनुवादांत त्यावर भर देण्याचें कारण नव्हतें. शिवाय हें केलेलें वर्णनहि फार दुर्बोध झालें आहे (पद्यें ६,७). येथे असाहि प्रश्न मनांत येतो की माया, ब्रह्म, अुपाधि, गुण अित्यादिकांचें अुथळ (खोल वर्णन परिस्थितीमुळे प्रायः अशक्यच असणार) वर्णन वाचून विद्यार्थ्यांस काय लाभ होणार ? असे मायावादासारखे विषय कळण्यास श्रोता वयाने व ज्ञानाने पोक्त असला पाहिजे. अर्थात् हा माया-वाद जसा या वेच्यांत अप्रस्तुत आहे, तसाच त्या वादामुळे हा वेचाहि या पुस्तकांत शिरण्यास अयोग्य आहे. तात्पर्य— या वेच्यांची निवड करण्यांत अभ्यास-मंडळ आपल्या कर्तव्यास जागलें नाही असें म्हणणें प्राप्त होतें.

**२ संपादन**— कळण्यास सामान्यतः कठीण असा वेचा जितका व्यवस्थित छापला जाअील तितकें हितकर. पण प्रस्तुत वेचा छापण्यांत पाठाच्या शुद्धतेचा विचार, अर्थ लागतो कीं नाही याची क्षिति, योग्य पदच्छेदाची पर्वा, शुद्धलेखनाची काळजी हीं प्रायः आढळून येत नाहीत.

**३ सामान्य दोष**— या वेच्यांतील पुढील पद्यांत अर्थाची **पुनरुक्ति** आढळते.

तनु जसि यमुनासुनील पाणी। (१०)
तनु यमुनेंतिल जेंवि नील पाणी। (१५)

या दोन चरणांत अेकच अर्थ आला आहे.

अनुक्रमणिका

केवळ पद्य पुरें करण्यासाठी आलेली **अर्थशून्य शब्दांची भरती** पद्य १५—मध्ये आढळते. प्रस्तुत पद्यांतील अुत्तरार्धानें नवीन अशी माहिती कांहींच मिळत नाही. ही गोष्ट पुढील संपूर्ण पद्यावरून नीट लक्षांत येअील—

वधि असुर असंख्य चापपाणी, तनु यमुनेंतील जेवि नील पाणी।
जसिच ब्रहिण सांवळी यमाची, दनुजवधीं तनु ते रघूत्तमाची ॥ (१५)

यांतील दनुजवधीं हें **पद निरर्थक** आहे. रामाचा वर्ण नील होता तो दनुजवधाच्या वेळींच काय? अन्यदा तो गौर होता काय? नव्हता. सुरतरुतळिं राम बैसला हे (११) हें वर्णन प्रस्तुत स्तुतींत असंभाव्य दिसतें.

**अशुद्ध लेखन**— नारी हा शब्द वृत्तार्थ **नारि** (२१) असा केला आहे. **मी** या सर्वनामाला ऱ्हस्वत्व आलेलें पदोपदीं आढळतें.

**दोषांची वांटणी**— अेवढें मान्य केलें पाहिजे की वामन-पंडिताच्या वेळीं मराठी भाषा पूर्णतः व्यवस्थित बनली नव्हती. यामुळे वरीलसारख्या चुकांमुळे तो विशेष दोषी ठरत नाही. अशा स्थितींत असे वेचे विद्यार्थ्यांपुढे ठेवण्यांत अभ्यासमंडळच भूयसा दोषी ठरतें. वेच्यांतील विविध दोषांचें निरूपण पुढे परिच्छेद ७ मध्ये केलें आहे.

**४ मूळ व अनुवाद**— मूळ संस्कृतांत जटायूने रामाचें वर्णन केलें आहे तें त्याच्या मूर्त दृश्य रूपाचें आहे. त्यांत वेदान्त नाही. आणि मुमूर्षु प्राण्याच्या तोंडून निघाल्यास असेंच वर्णन निघणें साहजिक आहे. डोळे पांढरे होण्याच्या वेळीं गहन मायावाद कसा सुचणार? पण हा विचार वामनाने केला नाही. आपणास आवडत्या वेदान्ताचें वर्णन त्याने जटायूच्या तोंडीं दडपून दिलें आहे. असें असूनहिं

तशिच रचित **टीका** वामनाख्य द्विजाती (१)

या चरणांत 'मी **टीका** करीत आहें, म्हणजे **मूळच्याच अर्थाची फोड** करीत आहें' असें विधान वामन करीत आहेच; हें सर्वस्वीं वस्तु-विरुद्ध आहे हें सांगणें नकोच.

**५ मुळाचा अतिक्रम**— (क) मूळ पद्यें १३ आहेत. त्यांतील अभिप्राय ४४ पद्यांत अनुवादिला आहे. हा अनुवाद फारच शिथिल आहे. मुळांतील वर्णन रामाच्या देहादिकाचें आहे; तर ब्रह्म, माया, निर्गुण अित्यादिविषयक ज्ञान या अनुवादांत ओतलें आहे. पद्यास पद्य असा प्रकार फारच क्वचित् आढळतो. कोठे कोठे अेकाच पद्यासाठी चार-पांच पद्यें खर्चीं घातलीं आहेत. अनेक पद्यांतील अभिप्राय मुळीच अनुवादित झाला नाही, असाहि प्रकार आहे. वेदान्त-चर्चेसाठी पदरची भर पुष्कळच घातली आहे. यामुळे हा अुतारा मुळाशीं ताडून पाहण्याने अर्थावर विशेष प्रकाश पडत नाही.

(ख) मुळांतील मूर्त वर्णनावरील भर पुढील पद्यांत पाहा—

स्मितरुचिरविकासिताननाब्जमतिसुलभं सुरराजनीलनीलम्।
स्मितजलदचारुनेत्रशोभं रघुपतिमीशगुरोर्गुरुं प्रपद्ये ॥८॥

अनुवादांतील १२-१५ हीं तीन पद्यें पुढील अेकाच पद्यासाठी आलीं आहेत—

भवविपिनदवाग्निनामधेयं भवमुखदैवतदैवतं दयालुम्।
दनुजपतिसहस्रकोटिनाशं रवितनयासदृशं हरिं प्रपद्ये ॥४॥

(ग) वामनाने ३०-३६ हीं सात पद्यें संन्यासी व संसारी भक्त यांच्या तुलनेसाठी घातलीं आहेत. यांस मुळांतील 'यतिपतिहृदये सदा विभान्तम्' (१०) अेवढाच आधार आहे.

**६ फल काय ?** अशा प्रकारच्या वेच्यांतील पद्यें दोपसंकुल असल्यामुळे त्यांचा यथार्थ बोध होणें शक्यच नाही. यामुळे अशा पद्यांच्या अभ्यासाने विद्यार्थ्यांमध्ये अेक अनिष्ट वृत्ति बळावणार— 'साधारण अर्थ कळला ना ? पुरें झालें' या विचाराने, प्रत्येक पदाचा कीस काढणें, त्याचा अितरांशीं संबंध तपासणें, अर्थाची पूर्वपरसंगति पाहणें, अित्यादि गोष्टी विद्यार्थ्यांच्या बुद्धीला दुरावत जाणार; आणि 'केवळ अर्थरितात्पर्य' हीच हमाली वृत्ति त्यांच्या बुद्धीवर ताबा चालविणार. अशा बुद्धीचा विद्यार्थी पुढे काय संशोधन करणार, हें दिसतेंच आहे.

अेवढ्याने अनर्थ संपत नाही. प्रस्तुत वेच्यांसारखे टाकाश्रू वेचे पुढे आल्याने विद्यार्थ्यांच्या अपक्व मनांत अेकंदर सर्वच संत वाङ्मयाविषयी, जुन्या मराठी कवितेविषयी, नावड अुत्पन्न होणार व त्यामुळे वाङ्मयांतहि असलेल्या **असंख्य सुवासिक काव्य-पुष्पांस** तो मुकणार, हें अुघड आहे. शेवटीं अभ्यासमंडळास प्रार्थना की वेचे निष्काळजीपणाने काढिल्याने होणारे वर सांगितलेले दोष लक्षांत आणून, वेचे अत्यंत अवधान-पूर्वक काढावे; किंवा हें न संभवल्यास, जुन्या वाङ्मयांतील वेचे मुळीच काढूं नयेत; म्हणजे विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं रुजणारी अल्पसंतुष्टता व आपल्या पूर्वमराठी वाङ्मयाविषयींची नावड या दोपांस तरी अभ्यास-मंडळ धनी होणार नाही.

**७ विविध दोषांचा विचार**— विशेष दुर्बोध अशीं स्थानें पद्यक्रमाने घेअूं— **पद्य २**– "अगणित सद्‌गुण...असें अवतरण पाहिजे. **पद्य ३**– अुत्तरार्धाचा अर्थ– अमूर्त असा तूं नेहमीच विद्यमान आहेस दृश्य जगाचा आरंभ मात्र मायेच्या अुत्पत्तीपासून झाला आहे. यामुळेच जगाच्या अपेक्षेने ती अनादि म्हटली जाते. तरी पण ही दृष्टि अितरांची असणार, तुझी नव्हे. आपणांस आद्य समजतोस, तें सर्वस्त्रीं यथार्थच आहे. वरील मायाविषयक जनांच्या भ्रान्त मनास तूं आपल्या मनांत थारा देत नाहीस. **पद्य ४**– पहिला शब्द **नग** वाचावा. **पद्य ५**– जीव, मूर्ते, हर, गर हे चारहि शब्द तोडून लिहावे. **पद्य ६**– अुत्तरार्ध– अर्थ– अमूर्त अशा तुला मूर्त, दृश्य करण्यास बलिष्ठ साधन तुझी मायाच आहे. **अर्थात्** देहधारी अशा तुजबरोबर ती नित्यच आहे. यामुळे देवा, 'स्वतांचे डोळे सुखविण्यासाठी तूं तिला अुत्पादिलें असें म्हणतां यावयाचें नाही. विभु दृष्टि रमाया तिला कशी करि ?' असा अन्वय. पद्यान्तीं प्रश्नचिन्ह द्यावें. **पद्य ७**– पूर्वार्ध–अर्थ– ही माया प्रभूच्या कृपादृष्टीने लोकांच्या हृदयांत विविध रूपांनी राहते; म्हणजे त्यांना देह, त्याचे अवयव, अित्यादि अनंत वस्तूंचा भास अुत्पन्न करिते. हें सर्व जग मायेचाच पसारा आहे. मात्र हें वडविण्यास मायेला प्रभूच्या कृपेचें बळ अवश्य लागतें. शेवटच्या चरणांत कोणतें (आगम =) वेदवचन सूचित आहे, कळत नाही. **पद्य १०**– विवक्षित अर्थ साधण्यास असा अन्वय करावा— जसि सुनीलपाणी (बहुव्रीहि समास) यमुना तसि तनु. **पद्य १२**– मव वन वणवाच नाम साचें–अशीं हीं पांच पदें व्यस्त घ्यावीं. **पद्य १६**– रघुपतिनाम असा समास घ्यावा. **पद्य १७**– जडमतिभवभावना असें पद समस्त करावें. हो–च्या पुढे स्वल्पविराम करावा. **पद्य १८**– पूर्वार्धान्तीं **रामपाय** असें वाचावें. **पद्य २०**– सुचरित्र चरित = चांगलें वर्तन दाखविलें. येथे चरित्र म्हणजे लीला, पराक्रम; चरित म्हणजे आचरिलें. **पद्य २२**– ममत्व-च्यापुढे स्वल्पविराम करावा. **पद्य २३** - पूर्वार्धात भक्तांचेंच वर्णन आहे. दास्य-च्या पूर्वी व मन्द -च्या नंतर स्वल्पविराम द्यावा. **पद्य २५**– पूर्वार्धाचा शेवटला भाग 'भेद त्यां न मान' असा मूळचा असेल काय ? **पद्य २६**–

त्रिगुण हें पद स्वतंत्र लिहावें. ब्रहुघटजलिं असा समास करावा. म्हणुनि = अशा प्रकारें, या दृष्टान्ताने. **पद्य २७–** सकलसुरवरेश असा समास घ्यावा. **पद्य २८–** समान वस्तु = निर्विकार व्यक्ति, अीश्वर. चरण २।३–अर्थ–अीश्वरास टाकून अितर देवास किंवा मनुष्यास लोक स्तवितात. पण हें स्तवन त्या देवाच्या किंवा मनुष्याच्या पात्रतेच्या अभावीं त्यास लागू पडत नाही, त्याच्या ठिकाणीं स्थिर होत नाही. तें खोट्या गुणाचें ठरतें, कच्च्या मडक्यांतील पाण्याप्रमाणे तें फुकट जातें. करी-च्या अन्तीं अनुस्वार नको. पूर्वार्धाच्या अन्तीं **तें** वेगळें करावें. **गुण**-च्या स्थानीं **गण** असा मूळचा पाट असल्यास 'तें अनृत, म्हणून अपक्वकुंभपाणी गण (= समज)' असा चांगला पदक्रम साधेल. अपक्वकुंभपाणी अितका समास करावा. असलेल्या स्थितींत **अनृतगुण** असा समास करणें प्राप्त आहे. **पद्य २९–** अन्त शब्द **खोटीं** असा घ्यावा. **पद्य ३०–** अुत्तरार्धांत **बोधरीती** असें दीर्घान्त वाचावें. म्हणजे तें सामान्यरूप घेतां येअील. रीती–पासून दूर, रीतीस दूर– असा अर्थ येथे विवक्षित आहे. **अतिबोधकता** असें पद असावें. **पद्य ३१– पूर्वार्धाचा अर्थ–** अशा रीतीने वेदांतील विवरण फुकट होय. मनांत राममक्ति असेल तरच वेदांपासून अीश्वराचें यथार्थ ज्ञान होअील. स्वल्पविराम **विफल-चे** पूर्वी न देतां पुढे द्यावा. पूर्वार्धान्तीं पूर्णविराम करावा; कारण अुत्तरार्धांत दुसऱ्या विषयाचा आरंभ होत आहे. **पद्य ३२–** अन्तीं प्रश्नचिन्ह द्यावें. **भावार्थ–** रामाची अनन्यभक्ति करणें हाच खरा संन्यास. लौकिक संन्यास मनांत सुद्धा आणूं नये. त्याने पुरुष केवळ निष्क्रिय होतो. म्हणून तो घेअून काय लाभ? **रिति**-च्या पुढे अर्धविराम करावा **पद्य ३३– रघुराजभक्त** अेवढा समास करावा. **अुत्तरार्ध–भावार्थ–** भक्ताने नुसत्या आचरणाने, व न बोलतां, केलेला अुपदेश जनांस रुचत नाही. संन्याशाने अेकांतांत केलेला अुपदेश हितकारक वाटतो. पण लोक हें जाणत नाहीत की मोठमोठे संन्यासी सुद्धा रामभक्तांच्याच मार्गाने चालतात. **पद्य ३४– देति**-चा अध्याहृत कर्ता (सामान्य, लौकिक) **यति**. अुत्तरार्ध– आरंभ **यतिपतिस दिसे** असा घ्यावा. **यतिनाथहृन्निवास** असें समस्त पद करावें. **पद्य ३५–** तयास **कांचनाचे–** अशीं शेवटचीं पदें घ्यावीं. **भावार्थ–** खरे (रामभक्तरूपी) संन्यासी, निर्धनांचे राजे अर्थात्, अत्यंत दरिद्री असूनहि राजांप्रमाणे धनाढ्य असतात; कारण दरिद्र्याचें धन रघुपतिभक्ति ही मोठी संपत्ति त्यांजवळ असते. अशा निर्धनाला सर्व जग सोन्याच्या दागिन्यांनी भरलेलें वाटतें. **पद्य ३६–** अुत्तरार्धांतील **स्व** तोडावें; व तें **पदवि**-चें विशेषण करावें. **पद्यें ३९-४०– प्रस्तावक** अवतरणचिन्ह **३९–** मध्ये न देतां, तें **पद्य ४०–**च्या आरंभीं द्यावें, व **समापक** अवतरणचिन्ह **पद्य ४१–** च्या अन्तीं द्यावें. **पद्य ४४–**या पद्यांतील **शेष** या शब्दाने वामनाने आपलें अुपनांव **शेषे** हें सुचविलेलें दिसतें.

८ **अुपसंहार—** (१) या स्तोत्रांत राम या देवतेस कोठे द्वितीयपुरुषांत संबोधिलें आहे; तर कोठे लगेच तृतीयपुरुषांत अुल्लेखिलें आहे. ही धरसोड दोषार्हच होय. विषयदृष्ट्या या स्तवांतील पद्यांचे पुढीलप्रमाणे गट पडतात— (१) प्रस्तावना पद्य १; (२) माया व अीश्वर यांचा संबंध २–७; (३) रामावताराचें वर्णन ८–११; (४) रामनामाचा महिमा १२–१६; (५) अीश्वराचें सामान्य वर्णन १७–२९; (६) संन्यासी व रामभक्त गृहस्थ ३०–३६; (७) जटायूस वरदान ३७–४१; (८) समाप्ति ४२–४४.

हा लेख लिहितांना रा. फफे व नांदेडकर यांच्या लेखांचा अुपयोग झाला आहे याबद्दल मी या दोघांचा आभारी आहें.

---

# नागरी लिपिसुधारणा



(लेखक– श्री. **यशवंत रामकृष्ण दाते**)

नागरी लिपि सुधारणेचा प्रयत्न महाराष्ट्राप्रमाणे हिन्दी साहित्य संमेलनानेहि चालविला आहे, व या दोन प्रयत्नांत ब्रेंचसें साद्दश्य व सहकार्यहि आहे ही गोष्ट नमूद करण्यास फार आनंद होतो. हिन्दी साहित्य संमेलनाने १९३५ मध्ये भरलेल्या आपल्या अधिवेशनांत अेक लिपि सुधार समिति नेमिली होती, व तींत रा. य. रा. दाते व शं. रा. दाते यांचा अंतर्भाव केला होता.

या समितीने आपली अेक योजना तयार केली होती. ती योजना व महाराष्ट्र साहित्य परिषदेने नेमलेल्या लिपि सुधारसमितीची योजना या दोहोंमध्ये पुष्कळच साम्य आहे. गेल्या मे महिन्यांत पुणें येथे भरलेल्या हिन्दी साहित्य संमेलनांत हिंदुस्थानांतील विद्यापीठें व साहित्य परिषदा यांच्या प्रतिनिधींची समिति नेमून लिपिसुधारणेची योजना निश्चित करण्यांत यावी असा अेक ठराव मान्य करण्यांत आला होता. त्या ठरावान्वयें बनलेल्या समितीची बैठक प्रयाग येथे ता. ५ आक्टोबर रोजीं भरून तींत पुढील निर्णय अेकमतानें मान्य करण्यांत आले. त्यावरून लिपिसुधारणेचें कार्य हिन्दी व मराठी भाषांमध्ये अेकाच पद्धतीने कसें होत आहे हें लक्षांत येअील. व त्यामुळे भरतखंडांत अेक स्वरूपाची नागरी लिपि प्रचलित करण्याचा मार्ग अधिक सुकर होअील असें वाटतें.

## लिपिसुधारसमितीचे निर्णय

१. लिपिसुधारणेच्या बाबतींत पुढील सिद्धान्त सामान्य रूपाने मान्य करण्यांत येत आहेत–

(अ) ही समिति ज्या लिपीचें समर्थन करील तिचें टाअीपरायटर (टंकलेखन), मुद्रण व लेखन यांमध्ये अेकच स्वरूप असलें पाहिजे.

(आ) प्रचलित लिपीमध्ये व या सुधारलेल्या लिपींत फार अंतर असूं नये.

(अि) लिपीचें वैज्ञानिक स्वरूप बदलतां कामा नये.

(अी) लिपीमध्ये अेका स्वराकरिता अेकच चिन्ह असावें.

(अु) अेका ध्वनिकरिता दोन चिन्हें असूं नयेत.

२. मुद्रण व लेखन यांमध्ये भेद असूं नये याकरिता सामान्यतः शिरोरेखा असावी असा नियम असावा; परंतु विशेष ठिकाणीं अक्षरांची भिन्नता दाखविण्याकरिता शिरोरेखा-विहीन अक्षरें घातल्यास चालतील. या समितीची अशी शिफारस आहे की, विशेषतः लहान अक्षरांच्या बाबतींत, जेथे शिरोरेखेमुळे अक्षरांची स्पष्टता कमी होण्याचा संभव असतो तेथे, शिरोरेखाविहीन अक्षरांचा प्रयोग करणें चांगलें होअील.

३. या समितीचा असा निर्णय आहे की, प्रत्येक वर्णाचें लेखन अुचारक्रमानुसार व्हावें.

(अ) जोपर्यंत दुसरें कोणतेंहि संतोषजनक स्वरूप पुढे आलें नाही तोपर्यंत ऱ्हस्व 'इ'चें चिन्ह अपवादरूपाने वर्तमानपद्धतीनुसार ि लिहिलें जावें. अुदाहरणार्थ, शिर. कांही सदस्यांच्या मताने 'इ'चें चिन्ह ा असें व 'ई'चें चिन्ह ा असें असावें. अुदाहरणार्थ, शिर आणि श्रीमान्.

(आ) ए ऐचीं चिन्हें वर्णाच्या बरोबर वर न लावतां थोडीं अुजवीकडे वर्तमान-पद्धतीप्रमाणेच वरच्या बाजूस लावावीं. अुदाहरणार्थ, देवता, दैवत. ओ आणि औचीं चिन्हें याप्रमाणेच लिहावीं. जसें, आ `ला, आ `रत.

(अि) उ, ऊ, ऋचीं चिन्हें अक्षराच्या पुढे व ओळीमध्ये लिहावीं. जसें, क ुटिल, प ूजा, स ृष्टि.

(अी) अनुस्वाराचें चिन्हहि अक्षराच्या पुढे वरच्या बाजूस लिहावें. जसें, अ ंश.

(अु) रेफने व्यक्त होणारा अर्धा र अुच्चारक्रमाप्रमाणे योग्य ठिकाणीं लिहावा. जसें, ध र्म.

(अू) जोडाक्षरांत पुढे येणारा र सामान्यस्वरूपांतच लिहावा. जसें, प्र, त्र.

४. स्वर व त्यांचीं चिन्हें यांच्यामध्ये समानता व सामंजस्य स्थापित करण्याकरिता इई, उऊ, एऐ, ऋ यांचीं प्रचलित रूपें सोडून देअून केवळ अमध्ये या स्वरांचीं चिन्हें लावून या स्वरांच्या मूळ स्वरूपाचा बोध करावा. अशी बाराखडी करावी. जसें, अ आ अि अी अु अू अृ अे अै ओ औ अं अः. याखेरीज ा ाा ि ी ु ू े ै ो ौ ं ः अशीं चिन्हें असावीं अशी श्री. ललिताप्रसाद शुक्ल यांची व अ ा ि ी ु ू े ै ो ौ ं ः. अशीं चिन्हें असावीं अशी डॉ. लक्ष्मणस्वरूप यांची सूचना होती.

५. अनुस्वार व अनुनासिक यांकरिता केवळ अनुस्वारच ठेवावा. व्यंजनाच्या पूर्वी येणाऱ्या हलन्त ङ् ञ् ण् न् म् यांच्या जागीं जेथे प्रतिकूलता नसेल (वाङ्मय, तन्मय) तेथे अनुस्वारच लिहावा. जसें, चंचल, पंथ अित्यादि.

६. मुद्रणांत अक्षराच्या खाली डाव्या बाजूस योग्य ठिकाणीं जर टिंब दिलें असेल तर त्याचा अर्थ असा की, त्या अक्षराचा अुच्चार मूळ अक्षराहून भिन्न होतो. या अुच्चाराचा निर्णय प्रचलित पद्धतीप्रमाणे होअील. अुदाहरणार्थ, फ़ारसी क़ ख़ ज़ झ़, मराठी च़, सिंधी ज़ अित्यादि.

७. विरामचिन्हें आजकाल सर्व भाषांमध्ये जशीं प्रचलित आहेत तशींच कायम ठेवावीं. पूर्णविरामाचें चिन्ह चरणरेषा (।) असावें.

८. अंकांचें स्वरूप पुढे दिल्याप्रमाणे असावें:— १ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ ०.

९. जर कोणतेंहि चांगलें स्वरूप मिळालें तर सध्याच्या खच्या स्वरूपांत बदल करणें अवश्य आहे. डॉ. लक्ष्मणस्वरूप यांचें मत असें आहे की, प्रत्येक वर्गातील दुसऱ्या व चौथ्या अक्षराकरिता पहिल्या व तिसऱ्या अक्षरास ह जोडून लिहावें. जसें, खबद्दल क्ह, घबद्दल ग्ह.

१०. अ झ ण यांच्या जागीं मुंबअीचे अ झ ण टाअीपांचीं रूपें प्रचलित करावीं. ल, श यांच्या जागीं हिन्दी ल, श हीं रूपें ठेवावीं. क्षचें रूप आहे तसेंच ठेवावें.

११. मराठी, गुजराती, कानडी, तेलगू अित्यादि भाषांत विशिष्ट स्थानीं ळ अक्षराची योजना करण्यांत येते. तें अक्षर तसेंच ठेवावें. त्याचा आशय ड किंवा ल लिहून व्यक्त करूं नये.

१२. ज्ञचा अुच्चार निरनिराळ्या प्रांतांत भिन्न होत असल्यामुळे त्याचें रूप आहे तसेंच ठेवावें. ॐकरिता ओ३म् अगर ॐ हीं दोन्ही रूपें ठेवावीं. श्रीचें प्राचीन रूप श्री असेंच ठेवावें.

१३. संयुक्त अक्षरें बनविण्याकरिता ज्या वर्णांचा अंतिम भाग काना आहे जसें— ख, ग, घ, च, ज, झ, ञ, ण, त, थ, ध, न, प, ब, भ, म, य, ल, व, श, ष, स यांचें संयोज्य रूप काना नसलेलें समजण्यांत यावें. जसें, ख्, ग्, घ्, च्, ज्, झ्, ञ्, ण् अित्यादि. क

आणि फ यांचीं संयोज्य रूपें क आणि प अशीं असावीं. ज्या अक्षरांस अन्तिम काना नाही त्यांचीं संयोज्य रूपें संयोजक चिन्ह (-) लावून करावीं. संयोजक चिन्ह मागील अक्षरास जोडून असावें. जसें, विठ–ठल, उड–डाण.

१४. जेथे शिरोरेखाविहीन लिहावयाचें असेल तेथे भ व ध करिता भ व ध असा लिहावा. म आणि भ यांचा घोटाळा होऊं नये म्हणून.

परिशिष्ट

१. रेफ चिन्हाच्या ठिकाणीं मराठी किंवा अन्यप्रांतीय भाषांतील कांही शब्दांकरिता ˘ चा प्रयोग करावा. जसें, सुऱ्यास.

२. दक्षिणेंतील लिपीमध्ये ऱ्हस्व ए व ऱ्हस्व ओ यांचीं रूपें येतात. त्यांकरिता पुढे दिल्याप्रमाणे चिन्हें वापरावीं. जसें, ॲ, ऑ.

---

# रद्दींतील रत्नें

## अेकशे पांच वर्षांपूर्वीची अर्पणपत्रिका— राजमंत्रीस्थानापन्न

### जेमस फेरीशसाहेब वास्तव्य मुंबअी यांप्रति

[नागपूरचे चिकित्सक साहित्यिक श्री. शरच्चंद्र वामन रानडे हे वामनरावांचे चिरंजीव असून त्यांच्याजवळ वडिलांच्या जुन्या रोजनिशा व अितर लिखाण जें आहे तें महत्त्वाचें आहे. वामनरावांनी लिहिलेलीं लहान लहान चरित्रें जुन्या थोर लोकांचा परिचय करून देणारीं आहेत. —संग्राहक]

सदर अदालत संबंधी भाषांतरकारक हरी केशवजी वास्तव्य मुंबअी गिर्गांव विज्ञाप्ति अैशीजे सन्मार्ग व अेतद्देशीय जनांची शिक्षा यांचे प्रवर्तनार्थ आपले विख्यात अुद्योग चालिले आहेत, आणि आपले अिष्ट कारुणिक केनीसाहेब यांही मला आपल्या आश्रयास निरवून १० वर्षे झालीं त्या दिवसापासून तर आजपर्यंत आपण मजवर कृपाच करीत आलां आहां परंतु सिद्धपदार्थविज्ञान म्हणून जो पूर्वी माझे हातून ग्रंथ झाला तो व हा ग्रंथ आपण अितक्या थोर अधिकारारूढ असता मला दयेनें अुत्साहानें, व आस्थेनें सांगितला व त्याचें व याचें जें अवघें मोठें भाषांतर झालें तें पंक्तिशः शोधिलें तेणेंकरून तर मजवर आपली सर्व प्रसिद्ध कृपा झाली आहे. हे आपले परमोपकार मी मनोभावें आठवीत आहें आणि या देशावर सुवर्तनाचा व सुखाचा सूर्य पूर्ण तेजानें प्रकाशावयास आपल्यासारिख्या प्रकाशित कीर्ति पुरुषांचे यथार्थ स्तुत्य प्रयत्न चालिले आहेत त्यांस ज्ञान कल्याणदायक असें मानून त्यांचें आनंदजनक स्मरण वर्तमान व भावी लोकांसही नित्य राहील असा भाव धरून ज्ञानकल्याणप्रवृत्ति करण्याविषयीं अतिकुशल जें शास्त्र त्याचा शुद्धांश अस्मद्देशीय जनास प्राप्त व्हावा या हेतूनें आरंभिलेला व आपल्या साहाय्यानें सिद्धीस गेलेला जो रसायनसंवाद भाषांतररूप ग्रंथ आपल्यास कृतज्ञतोद्देशें परम विनयें करून अर्पिला असे हे विज्ञाप्ति. शके १७५७ मन्मथनामसंवत्सर भाद्रपद शुद्ध अेकादशी गुरुवार.

[अि. स. १८३७ मध्ये हरि केशवजी यांनी ‘रसायनशास्त्रविषयक संवाद’ हा भाषांतरित मोठा ग्रंथ मुंबअीचे शिक्षामंडळीसाठी प्रसिद्ध केला. त्यांत वरील अर्पणपत्रिका आहे. फेरिश हा मुंबअी कौन्सिलचा अेक सभासद होता. ‘सिद्धपदार्थविज्ञान’ हा ग्रंथ १८३३ सालचा आहे. —संग्राहक]

# हिंदी भाषांचे परिभाषाविषयक प्रयत्न*

डिसेंबर १९४० मध्ये मद्रास येथे भरलेल्या भारतीय तत्त्वज्ञान परिषदेच्या वार्षिक अधिवेशनाच्या निमित्ताने अेकत्रित आलेल्या कांही प्राध्यापकांच्या अेका बैठकींत तत्त्वज्ञानपरिभाषेचा प्रश्न चर्चेसाठी निघाला. चर्चेअन्तीं असें ठरलें की पाश्चात्य तत्त्वज्ञानाचें आणि तात्त्विक शास्त्रांचें शिक्षण निरनिराळ्या देशी भाषांच्या द्वारा देतांना सर्व भारतीय सांकृतिक अैक्य राखण्याच्या दृष्टीने अुपयोगी पडेल अशी अेतद्विषयक अेकच अेक परिभाषा तयार करावी. या कार्याचा आरंभ पद्धतशीरपणें व्हावा म्हणून प्रांताप्रांतांतून या बाबतींतील जें कार्य हल्ली खाजगी व्यक्तींच्या वा संस्थांच्या द्वारा चालू असेल त्या विषयींची माहिती संकलित करण्यासाठी प्रा. दे. द. वाडेकर, सांगली, यांच्या कार्यनिवाहकत्वाखाली पांच जणांची अेक समिति नेमून तिजकडे हें प्रारंभिक कार्य सोपविलें गेलें. या समितीचें कार्यवृत्त अलिगड येथे भरलेल्या १९४१ च्या तत्त्वपरिषदेच्या प्रसंगीं मांडलें जाअून त्याला संमति मिळाल्यानंतर अुपरिनिर्दिष्टध्येयाची परिभाषा बनवून ती प्रसिद्ध करण्यासाठी अेका 'तत्त्वज्ञान परिभाषा मंडळा'ची स्थापना करण्यांत आली. या मंडळाचे कार्यनिवाहक प्रा. दे. द. वाडेकर, सांगली, हेच असून तींत निरनिराळ्या प्रांतांचे आणि भाषांचे अितर १० प्रतिनिधि आहेत.

हें जें प्रारंभिक समितीचें कार्यवृत्त म्हणून सांगितलें तें मुख्यत्वें तत्त्वज्ञानादि विषयांच्या दृष्टीनेच तयार झालें असलें तरी त्यांतील कांही भाग मराठी वाचकांच्या दृष्टीने अुपयुक्त असल्यामुळे तो सारांशरूपाने येथे देत आहें.

'समिती'च्या वतीने सुमारे १७५ नियतकालिकें, विद्यापीठें, शैक्षणिक आणि वाङ्मयीन संस्था, कार्यकर्त्या व्यक्ति अित्यादिकांना परिपत्रकें पाठवून माहिती देण्याची विनंती केली गेली. ही माहिती मागवितांना ज्या दहा प्रमुख भाषा दृष्टीसमोर ठेवून माहिती मागविली त्यांपैकी गुजरातीची माहिती, प्रयत्न करूनहि मिळाली नाही. अुडीया भाषेविषयी असें समजलें की बंगाली भाषेव्यतिरिक्त अिजविषयी निराळी माहिति मिळविण्याची आवश्यकता नाही.

अितर भाषांतील कार्याविषयी माहिती मिळाली ती अशीः—

**(१) मलयाळीः**— त्रावणकोर विद्यापीठाच्या प्रसिद्धिखात्याने वास्तव, रसायन आणि गणितविषयक मलयाळी संज्ञा प्रसिद्ध केल्या आहेत; तत्त्वज्ञानविषयक नाहीत. खाजगी प्रयत्नहि नाहीत.

**(२) तामिळः**— अण्णामलै विद्यापीठाने तर्कविषयक अेक आणि शैक्षणिक मानस्यविषयक अेक अशीं दोन तामिळ पुस्तकें प्रसिद्ध केलीं असून त्यांत शेवटीं पारिभाषिक तामीळ संज्ञावलि दिलेली आहे. होतां होअील तों शुद्ध तामिळ शब्दच वापरावयाचे, संस्कृतनिष्ठ टाळावयाचे, या आधुनिक तामिळ प्रवृत्तीला अनुसरून 'कलै चोर्कल' या नांवाचा अेक पारिभाषिक संज्ञासंग्रह प्रसिद्ध झालेला आहे. त्याला राजमान्यता आणि लोकमान्यताहि असावीसें दिसतें. यांत तत्त्वज्ञानविषयक संज्ञा नाहीत.

**(३) तेलुगुः**— तिरुपति येथील श्रीवेंकटेश्वर प्राच्यसंस्थेंतील डॉ. वरदाचारी यांचें पाश्चात्य तत्त्वज्ञानाविषयक अेक पुस्तक लवकरच प्रसिद्ध होत असून त्यांत अिंग्लिश तेलुगु

* 'भारतीय तत्त्वज्ञान परिभाषा मंडळा'चे कार्यनिवाहक प्रा. दे. द. वाडेकर यांच्या अनुमतीने.

संज्ञावलि यावयाची आहे. तेलुगुभाषकांना संस्कृताविषयी तिटकारा नाही. अितर कार्य फारसें झालेलें दिसत नाही.

(४) कानडीः— म्हैसूरचे प्रा. राघवेंद्राचार, श्रीनिवास अैयंगार, हनुमंतराव आणि यमुनाचार्य यांनी पाश्चात्य तत्त्वज्ञानविषयक कांही ग्रंथप्रकाशन केलें आहे, अितर चालू आहे. नवीन संज्ञा संस्कृतनिष्ठच बनविल्या जातात. प्रयत्न खाजगी स्वरूपाचे आहेत.

(५) मराठीः— स्पेन्सर, मिल वगैरेंच्या ग्रंथांचें भाषांतर आणि त्यांच्याच आधारें कांही लेखन गेल्या पिढींत झालें, पण बोजड संस्कृतनिष्ठ परिभाषेमुळे हे प्रयत्न नीटसे यशस्वी झाले नाहीत. अलीकडे विद्यापीठाच्या पदवीपूर्व अभ्यासक्रमांत मराठी भाषेचा प्रवेश झाल्यापासून पाश्चात्यांचे विचार निबंधांच्या आणि लेखांच्या द्वारा सुबोध मराठींतून मांडण्याचे प्रयत्न झाले आहेत. तथापि मानस्य ( Psychology ) आणि नीति (Ethics) वरील कांही थोड्या ग्रंथांखेरीज फारसें ग्रंथलेखन नाही. परिभाषासंग्रहाच्या दृष्टीने शुद्ध भौतिक विभागांतील (यांत जैवाचाहि समावेश होतो) निरनिराळ्या शास्त्रांतील परिभाषाकोश साहित्यपरिषदेच्या समितीने आणि अितरहि अभ्यासकांनी प्रसिद्ध केले आहेत. तत्त्वज्ञानादिकांविषयी अद्याप पद्धतशीर प्रयत्न झाला नाही, तथापि महाराष्ट्र शब्दकोश मंडळाच्या वतीने तत्त्वज्ञानासह सर्व शास्त्रांचा पारिभाषिक कोश प्रसिद्ध व्हावयाचा आहे. खुद्द प्रा. वाडेकर यांनी हिंदी तर्कशास्त्रविषयक परिभाषा पूर्वीच प्रसिद्ध केली आहे. मानस-परिभाषेचाहि पहिला हप्ता तयार झाला आहे.

(६) हिंदीः— अुपलब्ध माहितीवरून हिंदींत भरपूर कार्य झालें असावेंसें वाटतें. कांगडी आणि वृंदावन येथील गुरुकुलांचें आणि कांही अंशीं बनारस विद्यापीठाचेंहि शिक्षणाचें माध्यम हिंदी हेंच आहे. तत्त्वज्ञानविषयक कित्येक सुबोध पुस्तकें हिंदींत प्रसिद्ध झालेलीं आहेत. काशीची नागरी प्रचारिणी सभा, प्रयागाचें साहित्य-संमेलन आणि तेथीलच विज्ञान-परिषद् यांनी तत्त्वज्ञानाची व अितर विविध शास्त्रांची परिभाषा प्रसिद्ध केली आहे. ना. प्र. सभेच्या हिंदी परिभाषा कोशाच्या १९०६ च्या आवृत्तींत बरीच भर आणि सुधारणा होअून नवीन आवृत्ति निघाली असली तरी तत्त्वज्ञानविषयक संज्ञांत फारशी भर पडली नाही. साहित्य-संमेलनाने बऱ्याच विस्तृत प्रमाणावर परिभाषानिर्मितीची आंखणी केलेली आहे, तथापि अद्याप प्रत्यक्ष प्रकाशन झालेलें नाही. विज्ञानपरिषदेच्या कार्याविषयी फारशी माहिती मिळाली नाही. बिहार सरकारच्या हिंदुस्तानी समितीने शालेय शास्त्रविषयांपुरतेंच मर्यादित कार्य हातीं घेतलें असून तज्ज्ञांच्या विचारासाठी कांही याद्या प्रसिद्ध केल्या आहेत. 'हिंदुस्तानी' समिती-खेरीज अितरांची संज्ञानिर्मिति संस्कृतनिष्ठ आहे.

(७) बंगालीः— या भाषेंतहि बरेंच कार्य झालेलें असावेंसें दिसतें. शास्त्रीय आणि तात्त्विक विषयांवरील अनेक लेख आणि कांही ग्रंथहि प्रसिद्ध झालेले आहेत. वंगीय साहित्य-परिषदेच्या कालिकांतून अनेक लेख प्रसिद्ध झालेले आहेत. तथापि निराळे कोश वा शब्दसंग्रह प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाही. कलकत्ता विद्यापीठाने या कामासाठी अेक समिति नेमली असून तिने भौतिक परिभाषाविषयक कांही लघुकोश प्रसिद्ध केले आहेत. या समितीसाठी डॉ. जी. बोस यांनी तत्त्वज्ञान आणि मानसविषयक संज्ञाकोश तयार केले असून ते लवकरच प्रसिद्ध व्हावयाचे आहेत. याहि भाषेंत नवीन तयार होणाऱ्या संज्ञांचें अधिष्ठान संस्कृत हेंच आहे.

(८) अुर्दूः— निजाम सरकारचा अुदार आश्रय हें अुर्दू भाषेचें अेक महद्भाग्य आहे. १८५७ पूर्वीपासून या भाषेंत परिभाषेचें कार्य सुरू आहे. तथापि अगदी अलीकडे, वीस वर्षां-पूर्वी अुस्मानिया विद्यापीठाच्या स्थापनेचें अेक पूर्वांग म्हणून निराळ्या भाषांतरखात्याची

स्थापना झाल्यापासून या कार्याला विशेष चालना मिळालेली आहे. या विद्यापीठांतील शिक्षण अुर्दूतूनच होत असल्यामुळे त्यासाठी आवश्यक असणाऱ्या अनेक विषयांवरील ग्रंथ, मुख्यत्वें भाषांतररूपाने, अुपर्युक्त भाषांतरखात्याने तयार करविले आहेत. पारिभाषिक संज्ञावलीहि तयार झालेली आहे, पण ती प्रसिद्ध व्हावयाची आहे. दिल्लीच्या अंजुमान-अी-तरक्की-अे-हिंद या संस्थेच्या वतीनेहि कांहीं कार्य झालेलें आहे. अुर्दू परिभाषा ही मुख्यत्वें फार्सी-अरबीनिष्ठ आहे.

याखेरीज अखिल भारतीय परिभाषेच्या निर्मितीचा विचार करण्यासाठी हिंदुस्तान सरकारच्या सल्लागारमंडळाने अेक समिति नेमिली होती तिजविषयीची माहिती 'पत्रिके'च्या पूर्वीच्या अंकांत आलेलीच आहे. त्या समितीच्या शिफारशी स्वीकारल्या गेल्यास त्यांचा परिणाम फार दूरगामी ठरणार आहे. तत्त्वज्ञानविषयक परिभाषेलाहि त्यामुळे सर्वस्वीं घातुक वळण मिळणार आहे.

---

# रद्दींतील रत्नें

## "नव्याचे नअू दिवस व जुन्याचे तीन दिवस"

**महाराज**— आपल्या पत्राचें प्रथम वर्ष मास्तर लोकांनीं व त्यांच्या विद्वान शिष्यांनीं वादविवादें करून व्यापून टाकलेलें आढळतें; परंतु चालू वर्षांत त्यांणीं आपल्या स्तुत्त्य क्रमास क्षीणता आणिली असें म्हणण्यास बाध नाहीं तेव्हां हें आचरण वरील म्हणीप्रमाणें झालें. अमुक गृहस्थ आमचे शाळेंत आले त्यांनीं परीक्षा घेअून अिनाम दिलें वगैरे मजकूर पत्रकर्त्याकडे लिहून पाठविण्यांत मेहेरबान डैरेक्टरसाहेबांच्या म्हणण्याप्रमाणें मास्तर लोकांनीं पाठशाळा पत्रकास मदत केली असें होत नाहीं. बरें ज्या अधिकारी लोकांचीं अथवा सभ्य गृहस्थांचीं स्तुत्य चरित्रें ह्या पत्रांत छापलीं जातात तीं— त्या लोकांच्या सर्वकाळ नजरेस पडतात असेंही नाहीं जेव्हां लेखक पाठशाळा पत्र त्यांजकडे पाठवितील तेव्हांच काय ते रावसाहेब भाअूसाहेब पाहणार यास्तव असा मजकूर वर्तमानपत्रांत छापावा हें बरें.

ह्या माझ्या म्हणण्याचा सर्वांनीं विचार करावा कीं "मास्तर लोकांनीं अेकत्र मिळून परस्परांनीं आपल्या मताची वाटाघाट करावी, परंतु तशी सोय ह्या देशीं नाहीं म्हणून पत्रद्वारें तरी करावी. हा पत्राचा अुद्देश असून आपण काय करितों." असो. ह्यापासून असें होतें की जणु आपलें कर्तव्यकर्म आपणास माहीत नाहीं. जसें अिकडे नूतन आलेले साहेब लोक शिपायास विचारीत असतात की "वेल सीपॉय अब हमकी घर जायँगा ?"

आतां गुरुजनांनीं ह्या माझ्या लिहिण्याकडे लक्ष देअून अुपयुक्त वादविवादाच्या पायाचें साहित्य कमी पडत आहे त्याची सपाटून भरती करावी. माझेही दोन सवाल आज आपणांस आहेत.

**प्रश्न**

रामा म्हणून अेक मुलगा होता तो "म्हणून" असें म्हणून पळून गेला म्हणून मला राग आला, कारण मीं त्यास सांगितलें होतें की, "म्हणून" म्हणूं नको. यांत सर्व म्हणून शब्दाचें व्याकरण काय ?

कृष्णपक्षीं चंद्रगमनावरून अमके ठिकाणींच सूर्योदय होअील असें हटकून सांगतां येअील किंवा नाहीं येअील तर कसे ?

**मित्र धरणगांवकर.**

[—पुणें पाठशालापत्रक पु. २ अंक १२. ता. १ अप्रेल सन १८६३ अिसवी.]

# परीक्षणें



## धर्म–तत्त्वज्ञान—

**१ शुक्ल यजुर्वेद—** (वाजसनेयि माध्यंदिन संहिता) सान्वय मराठी भाषांतरासह, पूर्वार्ध (अध्याय १ ते २०), पृष्ठें २६+५७५; उत्तरार्ध (अध्याय २१ ते ४०), पृष्ठें ३५०+३०; संपा०–श्रौताचार्य धुंडिराज गणेश दीक्षित बापट; मूल्य रु. १०.

**२ थिऑसफीवरील सुबोध व्याख्यानें—** अनुवादक–श्री. दे. मा. लेले; प्रका० श्री. वा. ल. चिपळोणकर, अकोला; मूल्य आ. १२.

**३ सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय—** ले० श्री. वा. ल. चिपळोणकर व श्री. रा. स. भागवत; प्रका० श्री. ग. स. मराठे पुणें ४; मूल्य रु. १।।।.

**४ हिंदुधर्म आणि बुद्धिवाद—** ले० व प्रका० गणेश रामचंद्र परांजपे, १२८ बुधवार, पुणें शहर, मूल्य आ. २.

वेद हे हिंदुधर्माचे प्रमाणग्रंथ मानले जातात. परंतु त्या वेदांचें खरें स्वरूप काय आहे याची यथार्थ कल्पना हिंदु सुशिक्षितांपैकीहि फारच थोड्या लोकांना असते. याचें अेक कारण असें असूं शकेल की वेदांतील कांही ठराविक मंत्र श्रद्धापूर्वकतेने तोंडपाठ करावयाचे व त्यांतील अर्थाची चिकित्सा न करतां त्यांचा धर्मकार्यप्रसंगीं विनियोग करावयाचा अेवढीच सामान्य वेदानुयायांची दृष्टि असते. शिवाय वेदोत्तर वाङ्मयांत वेदांतील सर्व विषयांचें अधिक सुबोधतेने व सविस्तर विवरण केलेलें असल्यामुळे मूळ वेद-वाङ्मयाकडे जिज्ञासु लोकांचेंहि साहजिकच दुर्लक्ष होतें. वेदवाङ्मयाकडे हिंदुधर्माचे प्रमाणग्रंथ अेवढ्याच नात्याने पाहण्याची आतापर्यंतची प्रवृत्ति आधुनिक वेदाभ्यासकांत मागे पडत चाललेली आहे ही अेका प्रकारें अभिनंदनीय गोष्ट समजली पाहिजे. प्राचीन भारताच्या सांस्कृतिक अितिहासाचीं अत्यंत महत्त्वाचीं साधनें या दृष्टीने वेदांचा अभ्यास करण्याची नवीन प्रथा हल्ली पडत चाललेली आहे. प्राचीन आर्यांनी भारतांत येअून आपली संस्कृति येथे कशी प्रस्थापित केली; त्यांच्या धार्मिक, सामाजिक व राजकीय संस्थांचा विकास कसा झाला; पुढे घडून आलेल्या वैचारिक अुत्क्रांतीस कोणत्या घटना कारणीभूत झाल्या; अित्यादि गोष्टींचा वाङ्मयात्मक चित्रपट वेदवाङ्मयांत आपणांस पाहावयास सापडतो. अशा धर्मनिरपेक्ष दृष्टीने वेदांकडे पाहिल्यामुळेच तौलनिक भाषाशास्त्र व तौलनिक देवताशास्त्र या मानवी संस्कृतीच्या अभ्यासास अत्यंत अुपयुक्त असणाऱ्या दोन शास्त्रांचा अुदय झाला. अर्थात् या अभ्यासपद्धतीचें श्रेय प्रामुख्याने पाश्चात्य पंडितांना आहे ही गोष्ट निःसंकोचपणें मान्य केली पाहिजे. प्रथम प्रथम हिंदी पंडितांमध्ये वैदिक संशोधनासंबंधी फार मोठें औदासीन्य दिसून येत असे. सुदैवाने ही परिस्थिति आता बदलली आहे व हिंदी संशोधक या प्रांतांतहि भरीव प्रकारची कामगिरी करीत आहेत.

वैदिक संशोधनकार्याच्या मुख्यतः तीन दिशा आहेत. पहिली म्हणजे वेदमूलविषयक व वेदार्थविषयक होय. वेदवाङ्मयाचें स्वरूप मूलचिकित्साशास्त्रानुसार निश्चित करावयाचें, पूर्वपरंपरा व तौलनिक भाषाशास्त्र अित्यादिकांच्या साहाय्याने त्याचा बरोबर अर्थ लावावयाचा,

निरनिराळ्या प्रकारच्या वैदिक सूच्या व कोश निर्माण करावयाचे वगैरे कार्यांचा या संदर्भात अुल्लेख करावयास पाहिजे. दुसरी दिशा वैदिक संस्कृतीच्या अभ्यासासंबंधी. वैदिक देवता, यज्ञसंस्था, तत्त्वज्ञान, सामाजिक जीवन अित्यादि प्रश्नांच्या चर्चेचा यांत अंतर्भाव होतो. तिसरी दिशा वेदांच्या आनुषंगिक गोष्टींचा अभ्यास करण्याची. या तिन्ही दिशांनी वेदांचा अभ्यास आधुनिक पंडितांकरवीं हल्ली होत आहे; व त्यांतहि कौतुकाची गोष्ट अशी कीं जुन्या परंपरेने शिकलेले शास्त्रीसुद्धा या कामीं पुढे येत आहेत. याच दृष्टीने श्रौताचार्य बापटशास्त्री यांच्या शुक्ल-यजुर्वेदसंहितेच्या मराठी भाषान्तराचें मनःपूर्वक स्वागत केलें पाहिजे.

सांस्कृतिक अभ्यासाच्या दृष्टीने ऋग्वेद व अथर्ववेद यांच्या मानाने यजुर्वेद (व सामवेद) यांस कमी महत्त्व देण्याची प्रवृत्ति वेदसंशोधकांत सामान्यपणें दिसून येते. याचें कारणहि सहज आकलनीय आहे. सौत्रामणी, अश्वमेध, दर्शपूर्णमास, गवामयन अित्यादि यज्ञप्रकारांचा, तसेंच अग्निचयन, अग्न्याधान, प्रवर्ग्य अित्यादि यज्ञविषयक तपशीलांचा विचार हाच प्राधान्याने यजुर्वेदांत विषयीभूत झाल्याने साहजिकच त्या वेदाची व्याप्ति संकुचित झाली आहे. शिवाय 'यज्ञ' या संस्थेपासून अगदी दुरावलेल्या हल्लीच्या समाजास या विषयासंबंधी फारशी जिज्ञासा नसावी यांत आश्चर्य नाही. परंतु भारतीय सांस्कृतिक अितिहासाच्या अेका कालखंडांत यज्ञसंस्था ही अेक मोठी 'सामाजिक शक्ति' (Social Force) म्हणून मानली जात असे ही गोष्ट लक्षांत घेतली असतां त्या यज्ञसंस्थेविषयी सर्व प्रकारची चर्चा करणाऱ्या यजुर्वेदसंहितेचें महत्त्व तत्काळ कळून येअील. तसेंच 'यज्ञ' या मुख्य विषयाच्या अनुषंगाने आलेले अनेक अुपविषय तत्कालीन संस्कृतीवर निरनिराळ्या रीतींनी चांगलाच प्रकाश पाडतात असेंहि दिसून येअील. शिवाय प्राचीन भारतांतील विद्वन्मालिकेंतील तेजस्वी हिरा पंडितश्रेष्ठ आचार्य याज्ञवल्क्य यांचा शुक्ल-यजुर्वेदसंहितेशीं विशेष निकटचा संबंध आहे ही गोष्टहि त्या संहितेच्या महत्त्वांत भर घालणारीच आहे! म्हणून यजुर्वेदाचें चिकित्सापूर्व अध्ययन अुपेक्षणीय समजून चालणार नाही. या वेदाच्या तैत्तिरीय-संहितेचें व ब्राह्मणांचें अुत्कृष्ट विवेचनात्मक अिंग्रजी भाषान्तर प्रख्यात पंडित प्रोफेसर कीथ याने हार्वर्ड प्राच्यग्रंथमालेच्या द्वारा अगोदरच अुपलब्ध करून देअून आपणा भारतीयांस अुपकृत केलें आहे. शुक्ल-यजुर्वेदसंहितेची पंडितप्रकांड वेबर याने संपादलेली आवृत्तिहि विद्वानांना मान्य झालेली आहे. श्रौताचार्य बापटशास्त्री यांनी वाजसनेयि माध्यंदिन संहितेचें समूल, सान्वय मराठी भाषान्तर प्रसिद्ध करून तद्द्वारा त्या संहितेचा मराठी वाचकांस परिचय करून दिलेला आहे.

या संहितेचें मराठी भाषान्तर अुपलब्ध करून देण्याचा हा पहिलाच प्रयत्न आहे असें म्हणतां येणार नाही. कैलासवासी वे. शा. सं. लक्ष्मणशास्त्री चंदात्रेय सटाणेकर यांनी वाजसनेयि संहितेच्या सर्व चाळीस अध्यायांचें मराठी भाषान्तर मागेच तयार करून ठेविलेलें आहे, व त्यांपैकी पहिल्या पांच अध्यायांचें भाषान्तर त्यांच्या मुलांनी (चंद्रात्रेय बन्धु यांनी) 'वेदपुष्प (१)' या नांवाने सन १९२१ या वर्षी प्रसिद्धहि केलेलें आहे. पुढील भागाचें भाषान्तर तयार असूनहि अजून प्रसिद्ध होअूं शकलें नाही. श्री. चंद्रात्रेयशास्त्री यांनी आपल्या भाषान्तरास जोडण्यासाठी यज्ञशास्त्रोपयोगी व टीकात्मक अशी प्रस्तावना व यजुर्वेदाचा तुलनात्मक अभ्यास-ग्रंथ तयार करण्याचें ठरविलें होतें असें समजतें; पण तेंहि काम असंपूर्णच राहिलें. त्याचप्रमाणे शुक्ल यजुर्वेद संहितेवर संस्कृत टीका व त्या संहितेचें मराठी भाषान्तर तयार करण्याचें काम प्रख्यात संस्कृतपंडित महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक (आता श्रीशंकरानंदभारती) यांनीहि हातीं घेतलें आहे, हें अनेकांस विदित असेलच. तो ग्रंथहि अजून प्रसिद्ध झालेला नाही. या

दृष्टीनें पाहतां शुक्ल-यजुर्वेदसंहितेचें संपूर्ण मराठी भाषान्तर वाचकांस प्रथम अुपलब्ध करून देण्याचें श्रेय श्री. बापटशास्त्री यांनाच आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

या प्रचंड ग्रंथाचे (अेकंदर पृष्ठसंख्या सुमारे १०००) दोन विभाग आहेत. पूर्वार्धाच्या आरंभीं जोडलेल्या आपल्या विस्तृत प्रस्तावनेंत शास्त्रीबोवांनी या संहितेसंबंधी बरीचशी अुपयुक्त माहिती दिलेली आहे. त्यांत समाविष्ट केलेल्या शुक्ल यजुर्वेदाच्या अवतारपीठिकेविषयीच्या तसेंच कालनिर्णयाविषयीच्या बऱ्याचशा गोष्टी केवळ पूर्वपरंपरेवरच आधारलेल्या आहेत. या बाबतींत लेखकानें आवश्यक अशी सूक्ष्म अैतिहासिक दृष्टि वापरलेली दिसून येत नाही. प्रस्तावनेंतील 'शुक्लयजुर्वेदाचें स्वरूपाविष्करण', 'ब्राह्मस्वरूप', 'अंतःस्वरूप', 'शुक्ल व कृष्ण यजुर्मंत्रांची तुलना' अित्यादि विभागांत मात्र बरीच महत्त्वाची व अभ्यासोपयोगी माहिती आलेली आहे; व त्यावरून शुक्लयजुर्वेदसंहितेचें सामान्य स्वरूप चांगल्या प्रकारें प्रतीत होतें. पहिल्या भागांत पहिल्या वीस अध्यायांचें भाषान्तर आलें असून दुसऱ्या भागांत राहिलेल्या वीस अध्यायांचें भाषान्तर समाविष्ट केलेलें आहे. प्रथमतः प्रत्येक कंडिकेचें सस्वर मूळ देअून त्याच्याखाली अन्वय व नंतर मराठी भाषान्तर दिलेलें आहे. अन्वय करतांना मूळ कंडिकेंत नसलेले कांही शब्द कंसांत घालून कंडिकेच्या बहुशीं संदिग्ध अर्थाचा सुबोध विस्तार करण्याचा प्रयत्न केलेला आहे; व तशीच पद्धति मराठी भाषान्तरांतहि अुपयोजिली आहे. मूळ संहितेंतील अध्यायकंडिकादि विभाग विषयानुसार केलेले नसले तरी या भाषान्तरांत विषयानुक्रमणिकेखाली सर्व चर्चित विषयांची नामावली व्यवस्थित रीतीनें दिलेली आहे; त्यामुळे सहज संदर्भ शोधण्याची चांगली सोय झालेली आहे. ग्रंथान्तीं घातलेली मंत्रप्रतीकांची सूचीसुद्धा अभ्यासकास चांगलीच सहायभूत होअील. अेकंदरींत ही सर्व व्यवस्था ग्रंथाच्या सुबोधतेंत भर घालणारी आहे यांत शंका नाही. तरीहि या बाबतींत कांही सूचना करणें अप्रासंगिक होणार नाही. प्रथम सांगावयाचें म्हणजे प्रस्तावनेंत 'वैदिक यज्ञसंस्था' या विषयावर अेक विवेचनात्मक स्वतंत्र प्रकरण लिहिणें अवश्य होतें. कारण यज्ञसंस्थेचें सर्वांगीण आकलन झाल्याशिवाय तद्विषयक वाङ्मयानें योग्य महत्त्व व मर्म वाचकास प्रतीत होणार नाही. तसेंच अन्वय-भाषान्तरादि देण्यापूर्वी प्रत्येक यज्ञप्रकाराचें स्वतंत्रपणें समग्र वर्णन देणें अिष्ट होतें. अुदाहरणार्थ, प्रथम दर्शपूर्णमास या यज्ञाचें स्वरूपवर्णन करून मगच तत्संबद्ध अशा यजूंचें भाषान्तर द्यावयास पाहिजे होतें. असें केलें असतें तर मूळ ग्रंथाचें वैशिष्ट्य अधिक स्पष्ट झालें असतें. तिसरी सूचना अशी की, प्रत्येक कंडिकेचें मूळ, अन्वय, भाषान्तर याव्यतिरिक्त कांही विवरणात्मक— व्याकरणविषयक, यज्ञविषयक वगैरे— टीपा दिल्या असत्या तर ग्रंथाच्या अुपयुक्ततेंत भरच पडली असती.

हें सर्वच भाषान्तर मूळाशीं ताडून पाहून त्याची योग्यायोग्यता ठरविणें शक्य नाही. शिवाय मूळ ग्रंथाचें स्वरूपच असें आहे की त्याचें भाषान्तर करतांना कर्त्यास बरीचशी स्वतंत्रता घ्यावी लागते. तसेंच शुक्लयजुर्वेदसंहितेचें केवळ शाब्दिक भाषान्तर करून मूळ विषयांतील मर्म विशद करणें अशक्यच आहे. त्या मंत्रांच्या पाठीमागे असलेली यज्ञसंस्थाविषयक भूमिका हीच अधिक महत्त्वाची आहे. श्रौताचार्य बापटशास्त्री यांच्या हातून प्रत्यक्षच 'अग्निष्टोम' नांवाचा सोमयाग घडला असल्यामुळे त्यांना या विषयाची केवळ पुस्तकी किंवा तात्त्विक बाजूच तेवढी माहित आहे असें नसून तांत्रिक किंवा प्रयोगात्मक बाजूशींहि त्यांचा निकट परिचय आहे. या गोष्टीचा फायदा या भाषान्तराच्या कामीं त्यांना निःसंशय झालेला दिसतो. शुक्लयजुर्मंत्रांच्या केवळ गूढात्म अशा अर्थाची चिकित्सा करीत न बसतां शास्त्रीबोवांनी

अेकूण ग्रंथ सुबोध कसा होअील या गोष्टीकडेच अधिक लक्ष पुरविलेलें आहे असें वाटतें. अेकंदरींत हें भाषान्तर बव्हंशीं समाधानकारक आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. अर्थातच ज्यांचा वैदिक वाङ्मयाशीं व यज्ञसंस्थास्वरूपाशीं अगोदरच थोडा तरी परिचय आहे अशांनाच या ग्रंथाचें मर्म व महत्त्व कळेल, अितरांना तें चांगलेंसें कळणार नाही, अेवढी गोष्ट मात्र निश्चित ! या दृष्टीने या ग्रंथाची व्याप्ति दुर्दैवाने थोड्याच लोकांपुरती आहे असें म्हणावें लागतें.

संस्कृतविद्यांतर्गत संस्कृतीचें देशी भाषांत संक्रमण करणें हें आधुनिक संस्कृतज्ञांचें अेक प्रमुख कर्तव्य समजलें पाहिजे. या भाषान्तराच्या द्वारा अशा प्रकारचा प्रयत्न केल्याबद्दल श्रौताचार्य बापट व विशेषतः त्यांना अुत्तेजन देणारे औंधचे श्रीमंत अधिपति हे दोघेहि अभिनंदनास पात्र आहेत. शास्त्रीबोवांनी संकल्पिलेलें वेदवाङ्मयविषयक बाकीचें कार्यहि निर्विघ्नपणें लवकरच तडीस जाअील अेवढीच आशा शेवटीं करावयाची !

रा. ना. दां.

मद्रासशेजारीं आडॅर गांवीं थिऑसफिकल मंडळाचें अेक स्थान आहे. तेथे १९१० सालीं डॉ. अनि बेझंटबाअींनी सहा व्याख्यानांची अेक माला गुंफली. त्यांचें मराठी रूपांतर करून तें थिऑसफिकल फेडरेशनच्या सेक्रेटरीद्वयानें प्रसिद्ध केलें आहे. या व्याख्यानांना जो मराठी पेहराव चढविला आहे तो फार चांगला साधला आहे. भाषा शुद्ध व सोपी असल्याने मूळ म्हणणें काय आहे हें कळण्यास कोणत्याहि प्रकारचा त्रास पडत नाही किंवा घोटाळा होत नाही. नाही म्हटल्यास अेक गोष्ट विशेष रीतीने लक्षांत येते, ती ही की "कां कीं" ही जोडी 'कारण' या शब्दाअैवजी फार वेळां वापरली आहे व त्यामुळे "कां कीं"चें वाक्य वाचतांना अेखाद्या ख्रिस्ती मिशनऱ्याने हें वाक्य लिहिलें आहे किंवा काय असा भास होतो. हा दोष समजल्यास तो सोडून भाषा विषयास योग्य अशीच आहे.

सहा व्याख्यानांपैकी पहिल्या व्याख्यानांत थिऑसफी म्हणजे काय हें समजावून सांगितलें आहे. पुढलीं तीन व्याख्यानें पुनर्जन्मावर आहेत. पांचवें व्याख्यान कर्म या विषयावरचें असून सहावें थिऑसफीवाल्यांच्या "तीन लोकां"ची माहिती देणारें आहे.

पहिल्या व्याख्यानांत बेझंटबाअींनी थिऑसफी म्हणजे काय हें सांगितलें आहे. सर्व धर्मांनी अीश्वरज्ञानाचे मार्ग आपआपल्या सोअीने सांगितले आहेत. थिऑसफी नानाधर्मांमध्ये शांति, सख्य करण्यास आली आहे, तेजस्वी जिव्हाळ्याच्या अशा पुष्कळ गोष्टी थिऑसफींत आहेत आणि विज्ञानक्षेत्रांत ती नवीन शोधांचीं द्वारें खुलीं करते व सृष्टीच्या अगाध भांडारांतून नवें नवें ज्ञान काढण्याची किल्ली देते. थिऑसफी हा पंथ स्थापन करणारांनी त्याची अितकी स्तुति गावी हें साहजिक आहे. नेहमीच्या थिऑसफीच्या पद्धतीला अनुसरून शास्त्रीय ज्ञानवाले अेका वेळेला ब्रह्मज्ञानाची थट्टा करीत परंतु तेच आता योगसाधनाची महति ओळखूं लागले आहेत, देवाविषयीं त्यांना जास्त श्रद्धा वाटूं लागली आहे वगैरे ठराविक ठशाची भाषा या व्याख्यानांत सर्वत्र विखुरलेली आहे हें सांगणें नकोच. पुनर्जन्मासंबंधी जीं व्याख्यानें आहेत त्यांत फारच गोष्टी गृहित धरल्या आहेत. सर्व कांही अेकच आहे, म्हणजे ब्रह्मच आहे, बाकी कांही नाही. जीवात्मे परमात्म्यापासून निघाले आहेत व शेवटीं परमात्म्यांत जाअून मिळणार आहेत. आत्मे निरनिराळ्या योनींतून अुत्क्रांतिनियमाने वर सरकत चालले आहेत. खालच्या प्राण्यांतील आत्मे कांही काळपर्यंत मनुष्ययोनींत येत असत, परंतु आता तो मार्ग बंद झाला आहे. माणसांतच कर्माप्रमाणे खालच्या वरच्या स्थितींत जन्म येतात, परंतु मनुष्यकोटींतला आत्मा मनुष्यकोटींत अितर प्राण्यांचे आत्मे अितर कोटींतच जन्म घेतात. कर्माप्रमाणे

खालची वरची स्थिति येत असली तरी शेवटीं सर्व पापें नष्ट होअून सर्व आत्मे परमात्म्याप्रत जाणार आहेत खास हा तिन्ही व्याख्यानांचा सारांश आहे. आत्मे जर परमात्म्याचे अंश आहेत तर ते दूर जाअून निरनिराळ्या योनींतून अुत्क्रांति पाळत वर चढण्याचें कारण काय? अितर प्राण्यांतून मनुष्यकोटींत येण्याचा मार्ग केव्हा व कां बंद केला, या सर्व गोष्टी स्पष्ट झाल्याखेरीज व आत्म्यांचें व्यक्तित्व सिद्ध केल्याशिवाय पुनर्जन्माच्या पूर्वीच्या कल्पना केवळ कल्पनांच ठरल्या आहेत. शास्त्रीय ज्ञानाची वाढ आता अितकी झालेली आहे की कर्म, कर्माचे परिणाम, पुनर्जन्म यांची योग्य ती माहिती मिळालेली आहे. बेझंटबाअींच्या चुकीच्या कल्पनांना आता प्रसिद्धि देण्यांत अैतिहासिक माहितीपेक्षा जास्त महत्त्व अुरलेलें नाही.

शेवटच्या व्याख्यानांत बाअींनी तीन लोक आहेत त्यांची माहिती दिलेली आहे. स्वतः साधन करून पुनर्जन्म, परलोकांत आत्म्यांच्या गांठी याविषयी खात्री करून घेतली असें त्या सांगतात. या बाअींची मरणापूर्वी काय स्थिति झाली होती ती लक्षांत घेतल्यास आत्मा स्वतंत्र आहे, तो कुडी सोडून बाहेर फेरफटका करूं शकतो, या कल्पना किती चुकीच्या आहेत हें बेझंटबाअी बऱ्या झाल्या असत्या तर त्यांनीहि कबूल केलें असतें. बेझंटबाअींचे विचार लोकांना पटतील अशी अेक वेळ होती परंतु आता त्या विचारांना महत्त्व अुरलेलें नाही. तरी ज्यांना थिऑसफीची माहिती हवी असेल त्यांना ही सहा व्याख्यानांची माला वाचून माहिती मिळेल. पुस्तक त्या दृष्टीने अुत्तम झालें आहे.

'सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय' या पुस्तकाच्या अुपोद्घातांत असें म्हटलें आहे की, हिंदुधर्मांत व अितर धर्मांत अनेक गुप्त संप्रदाय होते व आहेत. त्यांतल्या कांही अधिकारी पुरुषांच्या संमतीने त्यांची माहिती जगांत परिस्फुट करण्यांत आली आहे. या पुस्तकांतील बरीचशी माहिती मि. लेडबीटरकृत The Masters and the Path या ग्रंथावरून घेतली आहे. पुढे असें म्हटलें आहे की, पुस्तकांतील माहिती काल्पनिक नसून अनुभवसिद्ध आहे. विधानांचें समर्थन करण्याचा प्रयत्न केलेला नाही; कारण पुरावा देणें व बुद्धिवादाच्या दृष्टीने भवति न भवति करणें अवश्य नाही असें आमचें म्हणणें नाही; परंतु दुसऱ्या पुस्तकांतून ती चर्चा सांपडूं शकेल. या विधानानंतर पुस्तकांतील माहितीच्या सत्यतेचा वादविवाद करणें बरोबर होणार नाही.

पुस्तक वाचीत असतांना अरबी भाषेंतील गोष्टींच्या धर्तीवर गोष्टी लिहिण्याचा प्रयत्न केला आहे असें भासतें. तसा प्रयत्न असल्यास थोडाबहुत साधला आहे असें म्हणतां येअील. या पुस्तकांत सांगितलेल्या गोष्टींवर विश्वास ठेवणें रास्त आहे असें कोणी समजल्यास अरबी भाषेंतल्या सुरस गोष्टी खऱ्या नाहीत असें म्हणणें म्हणजे कांही जुन्या मोठ्या लोकांचा अपमान करणेंच आहे. पुस्तकांत सांगितलेल्या गोष्टींविषयी शहानिशा पुस्तकांत नसल्याने त्या संबंधाने वादविवाद करणें रास्त ठरणार.

या पुस्तकांत कांही सुरस गोष्टींचा संग्रह केलेला आहे. त्या कांहींना मनोरंजक वाटतील. ज्यांचें अशा गोष्टींवर विश्वास ठेवण्याअितकें मन झालें असेल त्यांनाही त्या वाचून मनोरंजन होअील हें खरें; परंतु अितर वाचकांना या काळांत अशा सुरस गोष्टींवर विसंबून चालणारे लोक जगांत आहेत हें पाहून आश्चर्य वाटल्याखेरीज राहणार नाही.

**द. ल. स.**

'हिंदुधर्म आणि बुद्धिवाद' या चिमुकल्या पुस्तिकेचें ''थोडक्यांत व साधार तसेंच कोणासहि सहज समजतील व पटतील अशा पद्धतीने **हिंदुधर्माचीं तत्त्वें** प्रतिपादणारें पुस्तक'' असें

अनुक्रमणिका

वैशिष्ट्य लेखकाकडून अुद्घोपित करण्यांत आलें आहे. अवघ्या पन्नास पानांत अेवढें प्रचंड कार्य साध्य करण्याची अपेक्षा करणें निःसंशय धाडसाचें काम होय. लेखकानें आपलें अेतद्विषयक विचारांचें पहिल्या सत्तावीस पानांत वेगवेगळ्या शीर्षकांखाली वर्गीकरण केलें असून अुरलेल्या तेवीस पानांत आपल्या त्या विचारांना आधारभूत असलेलीं श्रुतिस्मृति, अुपनिषदें, महाभारत, भागवत, रामायण, भविष्यपुराण, योगवासिष्ठ, अष्टांग-हृदय सूत्रस्थान अित्यादि ग्रंथांतील वचनें प्रमाण-रूपानें संग्रहित केलेलीं आहेत. या संग्रहामुळे या अल्पमोली पुस्तकाला अुपयुक्त व संग्राह्य स्वरूप प्राप्त झालें असून या बाबतींतील ग्रंथकाराचे परिश्रम निःसंशय अभिनंदनीय व अुत्तेजनार्ह आहेत.

के. ना. का.

## समाजशास्त्र —

**१ संस्कृति-संगम**— ले० प्रा. द. के. केळकर; प्रका० श्री. म. म. केळकर, मनोहर ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. ४.

**२ व्यवहार आणि शिष्टाचार**— ले० व प्रका० श्री. श्री. शा. हणमंते, स्टेशन-मास्तर, मोहोळ (जि. सोलापूर); मूल्य आ. १२

अेका जिल्हा न्यायाधिशापुढे अेक अत्यंत महत्त्वाचा, भानगडीचा व गुंतागुंतीचा कज्जा होता. त्या दाव्यांत हजारो कागदपत्र दाखल झाले होते. न्यायाधिशानें तीन महिने रजा घेअून त्या दाव्यांतील ठराव लिहिला. पुढे त्या निकालावर हायकोर्टाकडे अपील झालें. तेव्हा तेथील अेका धूर्त न्यायाधिशानें आपल्या ठरावांत खालील न्यायाधिशाच्या ठरावासंबंधी असें म्हटलें की, तो ठराव विद्वत्ताप्रचुर आहे; अभ्यासकांना अभ्यसनीय आहे; परंतु कोर्टापुढे निकालाकरिता असलेल्या प्रश्नासंबंधानें तो अप्रस्तुत (irrelevant) होय. 'संस्कृति-संगम' ह्या पुस्तका-संबंधानें असेंच कांहीतरी म्हणावें लागेल. पुस्तकांत माहितीची रेलचेल आहे: भाषेंत अनुरंजकता आहे; हिंदुत्वाचा अभिमान आहे; विचारसौष्ठव आहे; आणि विशेष हें की, अंधश्रद्धेच्या शृंखलांनी हात निगडित झालेला नाही. ह्या सर्व गोष्टी मान्य केल्या तरी संस्कृतिसंगम ह्या विषयाचें विवेचन मात्र प्राध्यापक केळकर ह्यांच्या ह्या बहुमोल ग्रंथांत केलेलें आढळत नाही. पुस्तकाला 'संस्कृति-संगम' हें नांव देण्यांत चूक झाली असावी असा आम्हांस संशय येतो.

संस्कृतिसंगमावर लिहिल्या जाणाऱ्या पुस्तकांत संस्कृतीची व्याख्या आगंतुकपणें प्रस्ता-वनेंत यावी ह्यावरून अुपयुक्त संशय दृढ होतो. संस्कृतिरक्षकमंडळ म्हणून कित्येक वर्षें पाटी लावल्यानंतर संस्कृति म्हणजे काय हें ठरविण्याकरिता समिति नेमावी त्याप्रमाणे केळकर ह्यांची स्थिति झाली आहे.

केळकरांची अलंकृत भाषा क्षणभर बाजूस ठेवून अगदी साध्या भाषेंत बोलावयाचें तर जें जें म्हणून मनुष्याच्या बुद्धीचें कार्य त्या सर्वांचा अन्तर्भाव संस्कृतींत त्यांनी केला आहे. संस्कृतीच्या अुलट निसर्ग. निसर्गजन्य आणि मानवजन्य असे सृष्टपदार्थांचे भेद पडूं शकतात. परमेश्वरानें निर्माण केलेल्या पदार्थांचा व त्या पदार्थांच्या अंगीं निसर्गतः वसत असलेल्या गुणांचा अुपयोग करून मनुष्य आपल्या बुद्धीच्या प्रभावानें नवीन सृष्टि निर्माण करतो. ही सृष्टि संस्कृति शब्दानें व्यक्त केली जाते. ह्याला आधिभौतिक संस्कृति म्हणतां येअील. अशा ह्या संस्कृतीचें जें फल त्याच्यावर अखिल मानवजातीचा हक्क असतो. ह्या फलांची देवाण-घेवाण होणें अपरिहार्य आहे व तशी ती आजपर्यंत होत आली आहे. वासुदेवशास्त्री अभ्यंकर किंवा राजेश्वरशास्त्री द्रविड आगगाडींत बसतात व मोटारीचा अुपयोग करतात. रणगाड्याची कल्पना अेकाच माण-

साची परंतु आज सर्व युयुत्सु राष्ट्रें रणगाडे बनवीत आहेत व वापरीत आहेत. अिंग्रज सरकारची तारायंत्रें अैवढ्याचसाठी कोणीहि कर्मठ सनातनी अथवा जहाल देशभक्त आलेली तार घेण्याचें नाकारीत नाही. सारांश,अशा प्रकारच्या देवघेवीविषयी कधी कोणाची ना होती असें म्हणण्यास जागा नाही.

आधिभौतिक संस्कृति हें बुद्धीचें अेक कार्य आहे. तिचें दुसरें कार्य वैचारिक होय. पहिल्या प्रकारांत मनुष्य आपल्या कल्पकतेने निसर्गनिर्मित पदार्थांवर संस्करण करीत असतो. दुसऱ्या प्रकारांत कोणत्याच पदार्थाचें साहाय्य घ्यावें लागत नाही; केवळ विवेकशक्तीचा अुपयोग करून तो कांही निष्कर्ष काढीत असतो. हा विचार प्रायः सृष्टिविषयक गूढ अुकलण्याचा असतो. ह्यांतून तत्त्वज्ञान-अध्यात्मविद्या व तदनुषंगिक शास्त्रें निर्माण होतात. आधिभौतिक सृष्टीप्रमाणे ही वैचारिक सृष्टि देहधारी अथवा साकार नसते. ह्या कारणास्तव तिचा संस्कृतींत अंतर्भाव करण्यासंबंधाने मतभेद होणें संभवनीय आहे. तथापि तत्सम म्हणून मानण्यास कांही प्रत्यवाय नसावा. महत्त्वाची गोष्ट ही की ह्या बाबतींतहि देवाण-घेवाण चालत आली आहे. शंकराचार्यांचा अद्वैत सिद्धान्त केवळ पूर्वेकडील म्हणून पाश्चात्यांनी तो झिडकारणें मूर्खपणाचें ठरेल. त्याचप्रमाणे पाश्चात्यांच्या तत्त्वज्ञानाचा धिक्कार मतभेद असूनहि आपणांकडून झाल्यास तें असमंजसपणाचें होअील. प्रो. केळकरांनी ह्या देवघेवीचीं अुदाहरणें दिलीं आहेतच.

संशोधनाकरिता ज्ञानाचा स्वतंत्र वर्ग कदाचित् पाडावा लागेल. ह्यांतहि भूगर्भशास्त्र, ज्योतिःशास्त्र ह्यांविषयींचें सृष्टिविषयक संशोधन अेका प्रकारचें तर व्याकरणादि संशोधन दुसऱ्या प्रकारचें. आता ग्रंथकारांनी दाखविल्याप्रमाणे पाणिनी-पतंजलीची प्रशंसा पाश्चात्य मुक्तकंठाने करीत असतात. तसेंच यवनाचार्यांचें ज्योतिर्ज्ञान आम्ही नुसतें प्रशंसून राहिलों नाहीं तर तें आत्मसात् करून टाकलें आहे. येथपर्यंत अुल्लेखिलेल्या बाबतींत संस्कृति– मग ती कोठेहि जन्म पावो– विश्वगामी आहे ह्यांत शंका नाही. संस्कृति बुडाली हा जो लौकिकरीत्या आक्रोश केला जातो तो आचारासंबंधी होय. गळ्यांतलें जानवें काढून टाकून सदरा टोपी घालून ब्राह्मण भोजनास बसला की आचार बुडाला, संस्कृति बुडली, धर्मावर गंडांतर आलें अशी हाकाटी सुरू होते.

वस्तुतः पाहतां संस्कृति हा शब्द संस्कृत वा मराठी दोनहि वाङ्मयांत आढळत नाही. शब्द नाही याचा अर्थ तन्निर्दिष्ट कल्पनाहि नाही. अिंग्रेजी कल्चर शब्दाला संस्कृति हा शब्द आम्हीं बनविला आहे. अर्थात् कल्चरचा जो कांही अर्थ असेल तोच संस्कृति शब्दाचा असला पाहिजे. परंतु अिंग्लिश शब्द कल्चर हाच आधी संदिग्ध किंवा मोघम अर्थाने वापरला जातो. ह्यासाठी संस्कृतीची व्याप्ति प्रथम निश्चित करणें अगत्याचें होतें. पाणी पाण्याला मिळतें आणि अेकजीव होअून पुढे जातें. पाणी आणि दगड ह्यांचा संगम होत नाही. म्हणून हिंदु व अिंग्रज ह्यांचा संपर्क म्हणजे दगड-पाण्याचा नाही, पाणी-पाण्याचाच आहे, ही गोष्ट स्पष्ट करावयास हवी होती. संस्कृति बुडाली; संस्कृति रक्षिली पाहिजे हा शब्दप्रयोग नवीन आहे. आमच्या परिचयाचा शब्दप्रयोग म्हणजे धर्म बुडाला हा होय. धर्म शब्दाने आम्ही आचारपद्धति समजतों. ह्या दृष्टीने आचारशास्त्राची चर्चा करणें अवश्य होतें.

आचारशास्त्र हें समाजाच्या तत्त्वज्ञानावर अथवा ध्येयावर प्रस्थापित केलेलें असतें. म्हणून आचार हा स्वाश्रित नसतो; पराश्रित असतो. तत्कालीन अवश्यकता व अंतिम साध्य हीं विशिष्ट आचारांना जन्म देतात. निरनिराळ्या कालखंडांत निरनिराळ्या समाजांचें ध्येय व अवश्यकता हीं निरनिराळीं असतात. ह्या कारणाने आचारभिन्नता अुत्पन्न होते. मानवी जीवनाला सदाचार

अत्यवश्यक असतात. अेकदा जो सदाचार म्हणून आपण ठरवला तो अनाचार अथवा दुराचार म्हणण्यास मनुष्य साहजिकपणेंच नाखुष असतो. ह्यामुळे रूढी अुत्पन्न होतो. शिवाय आचारांतील चांगुलपणा व अुपयुक्तता निघून गेली आहे हें सामान्य माणसाच्या चटकन लक्ष्यांत येत नाही. अिंग्लंडांतून हिंदुस्थानांत आल्यावर देखील साहेब आपला गरम कोट सोडीत नाही. सारांश, आचार म्हणजेच धर्म अशी समजूत बनते. ह्या धर्मभावनेची मनावर बसलेली पकड सवयीने घट्ट होते. अशा रीतीने आचारांना आगंतुक महत्त्व दिलें गेलें आहे.

कांही आचार भौगोलिक परिस्थितीवर अवलंबून असतात. थंड प्रदेशांत शीतोदकाचें प्रातःस्नान विहित आहे असें कोणतेंहि शास्त्र सांगणार नाही. ब्राह्ममुहूर्तावर अुठावयाचें नाही असें ठरलें की आवशींस लवकर निजावें हा नियम घालतां येत नाही. म्हणून थंड प्रदेशांतील व अुष्ण प्रदेशांतील आचार परस्परविरुद्ध असतात. ह्यांची देवघेव होणें कधीच शक्य नसतें. आहार निराळा; पोषाख निराळा; अितर रीतिरिवाज निराळे. अुष्ण प्रदेशांत सोवळेंओवळें चालवितां येअील व चालविणें अिष्टहि आहे. परंतु थंड प्रदेशांत तें अशक्य होतें. अेवढ्या-साठीच ज्या देशांत जे आचार रूढ असतील त्यांची निंदा करूं नये असा समंजसपणाचा अुपदेश स्मृतिकारांनी केला आहे. अेकंदरींत आचारांचा विचार नेहमी गौण ठरतो. कारण ते परिस्थित्यनुरूप बदलत असतात. परिस्थितीशीं माणसाला झगडावें लागतें. म्हणून परिस्थित्यनुरूप आचार असेल तो धर्म्य. परिस्थितीशीं विसंगत होअील तो अधर्म्य. समाजांत स्त्रीपुरुषांची संख्या समसमान असल्यास अेका स्त्रीला अेक पति व अेका पुरुषाला अेक पत्नी हा सर्वश्रेष्ठ आचार होय. अुलट स्त्रीपुरुषांची विषम संख्या झाल्यास अनेकपत्नीत्व किंवा अनेकपतित्व हाच धर्म्य आचार होअील. विमान किंवा आगगाडी चालविणाऱ्या अिसमाने टांचेपर्यंत धोतर, पायघोळ बंदांचा अंगरखा, वर अुपरणें आणि डोक्यावर चक्री पागोटें अशा पेशवाअी पेहरावाने काम करण्याचें ठरविलें तर तें अधर्म्य समजलें जाअील. ह्यावरून आचारशास्त्र अगदी स्वतंत्र आहे, त्याचा संस्कृतीशीं संबंध येत नाही, असें म्हणतां येअील.

ह्या विवेचनावरून संस्कृतिसंरक्षण ह्यास फारसा अर्थ आहे असें आम्हांस वाटत नाही. संगम न होतांहि संस्कृति सर्वत्र पसरत राहणार. तो तिचा स्वभावच आहे. ह्या कारणास्तव पुस्तकाचा विषयच आम्हांस समजत नाही. अिंग्रेजींतहि कल्चर शब्दाचा अर्थ प्रथम तरी मर्यादित होता. अभ्यासाने मनाला वळण लावणें; शिष्टाचार शिकणें; सुज्ञपणा अंगीं बाणणें हा ह्या अिंग्रेजी क्रियापदाचा अर्थ आहे. कल्चर्ड मनुष्य दुसऱ्याचें मन दुखवीत नाही. अेकदा अेका शिक्षिताने pint ह्या अिंग्रेजी शब्दाचा अुच्चार पिंट केला तेव्हा दुसरा मनुष्य म्हणाला आम्ही ह्या शब्दाचा पाअिंट अुच्चार करतों. त्याने तुमचा अुच्चार चुकला आहे म्हणून म्हटलें नाही. हें संभावितपणाचें लक्षण होय. अशा संभावित माणसाला कल्चर्ड हा शब्द लावण्यांत येतो. ह्या शब्दाच्या अर्थाचा व्याप अलीकडे विस्तार पावला हें मात्र खरें.

संस्कृति-संगम हे शब्द वाचावयास कितीहि गोड असले तरी तो दोन अर्थशून्य शब्दांचा अर्थहीन संगम आहे. जगांत जी कांही देवघेव होते ती मनुष्याच्या अनुकरणप्रियतेने होत असते. ह्या देवघेवीकरिता संगमाची अवश्यकता असतेच असें नाही. संबंध किंवा वस्तूचें ज्ञान पुरें आहे. समजा, नदीच्या तीरांवर समोरासमोर दोन अिसम राहतात. त्यांपैकी अेकाने सुंदर घर आपल्या कल्पकतेने बांधलें तर समोरचा अिसम तसेंच घर बांधणार नाही काय ? चांगल्याचें अनुकरण अशा बाबतींत झपाट्याने होत असतें. परंतु जित व जेते म्हणून दोन समाजांचा संबंध आला म्हणजे जितांकडून जेत्यांचें दासवृत्तीने अनुकरण होत असतें. अशा अनुकरणांत

समंजसपणाचा अंश फार कमी असतो. अिंग्लिशांचा व हिंदूंचा आज १५० वर्षे 'संगम' झालेला आहे. ह्या कालांत अिंग्लिशांनी हिंदूंचें काय घेतलें ह्या प्रश्नाचें अुत्तर केळकरांनी दिलेलें दिसत नाही. आम्ही मात्र संपूर्णतेने साहेब बनलों आहों.

मौतिकशास्त्रें अुदयास येण्यापूर्वी जगांतील सर्व समाजांच्या धर्मकल्पना सारख्याच होत्या. त्यामुळे अिकडल्याप्रमाणे युरोपांतहि हटयोगी, ब्रह्मचारी, संन्यासी, कर्मठ वगैरे सर्व नमुने पाहावयास मिळतात. ज्या वेळचें अशा स्थितीचें वर्णन ग्रंथकारांनी केलें आहे त्या वेळीं पूर्वपश्चिमेचा संगम होअून ह्या गोष्टी घडल्या असें म्हणतां येणार नाही. ह्याचा विचार अधिक करण्याचें कारण नाही. कारण जपानच्या अुदाहरणावरून संगमावांचून परकीयांचे गुण घेतां येतात हें प्रा. केळकर ह्यांस मान्य आहे. गुणांचाहि समावेश ते संस्कृतींत करतात!

वाअिटापासून चांगलें निघतें हें खरें; घर जळून खाक झालें की, घरांतली घाण नाहीशी होते! त्याप्रमाणे जितजेत्यांच्या संबंधापासून थोडासा फायदा होअील पण तोट्याचें माप कोणीं करून पाहावें! अशा संबंधापासून मनुष्यांतला मनुष्यपणाच नष्ट होतो. तेव्हा असले संबंध नैतिकदृष्ट्या सदैव त्याज्य ठरवावे लागतील. संगम झाल्यावर दोन नद्यांचें पाणी अेकजीव होअून अेका प्रवाहाने वाहतें; अेक नदी नामशेष होते. अिंग्रेजी व हिंदी ह्यांच्या संगमाने नामशेष होण्याचा प्रसंग बिचाऱ्या हिंदु समाजावर न येवो!

पुस्तकाला संस्कृतिसंगम नांव नसतें तर ग्रंथ अत्यंत वाचनीय आहे असें नमूद करतां आलें असतें. परंतु नांवामुळे वाचक विषयप्रतिपादनाची अपेक्षा करतो आणि ती निष्फळ ठरते. ह्यास्तव ग्रंथाचें परीक्षण करणें दुःसाध्य झालें आहे. 'संस्कृति-संगमांत' संस्कृति नाही व संगमहि नाही. बाकी सर्व कांही आहे; पण तें अनुपयुक्त आहे असें मात्र नाही.

**ना. गो. चा.**

'न हि सर्वहितः कश्चिदाचारः संप्रवर्तते' — सर्वांना अेकसारखाच हितकारक असा आचार सांपडत नाही असें भीष्माचार्यांनी शांतिपर्वांत म्हटलें आहे. तथापि मन्वादि स्मृतिकारांनी आपापल्या स्मृतींत तत्तत्कालीन आचार, व्यवहार व प्रायश्चित्तें यांचें वर्णन केलें आहे. 'व्यवहार आणि शिष्टाचार' या पुस्तकांत श्री. हणमंते यांनी दिनचर्या, वेष, सामाजिक व्यवहार, दानधर्म अित्यादि प्रकरणांत व्यवहार-शिष्टाचारांची जुनीच शिकवण पण नवीन स्वरूपांत व सुबोध भाषेंत सांगितली आहे. कोणत्याहि प्रकरणाचें साधकबाधक विवरण न करितां स्फुट व त्रुटित विचार यांचा संग्रह लेखकाने केला आहे; त्यामुळे हें पुस्तक कोठेहि अुघडून फावल्यावेळीं वाचण्यासारखें झालें आहे.

श्री. हणमंते ह्यांच्या पुस्तकास प्रारंभापासून शेवटपर्यंत जुनाटपणाचाच वास येत आहे. अुदाहरणार्थ, आदरसत्कार या प्रकरणांत 'आसन, पाणी देअून पाहुण्याचें स्वागत करावें' असें त्यांनी सांगितलें आहे. सांप्रतच्या आदरसत्कारांत शहरापासून खेड्यापर्यंत 'चहा' येअून बसला आहे त्याविषयीं लेखक अनुकूल वा प्रतिकूल कांही लिहितील असें वाटलें होतें; पण त्याविषयीं लेखकाने अवाक्षरहि लिहिलेलें नाही. 'वाचन-लेखन' या प्रकरणांत 'पुस्तक डोळ्यांजवळ नेअून वाचणें दृष्टीला बाधक आहे' असें म्हटलें आहे. या गोष्टीचा प्रस्तुत पुस्तकांत समावेश कसा होअूं शकतो हें कळत नाही.

**नी. शं. न.**

भाषा-व्याकरण—

१ पेशवे दप्तरांतील मराठी भाषेचें स्वरूप— ले० डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये; प्रका० व्ही. अेम्. नेर्लेकर, बुधवार पेठ, पुणें २; मूल्य रु. ४.

२ भुरग्यांलें व्याकरण (पैलो वांटो)— ले० श्री. शणै गोंयबाब; प्रका० श्री. के. अेस्. नायक, गोमंतक छापखाना, गिरगांव, मुंबअी ४; मूल्य आ. ६.

मराठी भाषेचें स्वरूप—साधु ! लेखक लोकेषु यत् प्रमाणं निबन्धकान् ।
मतानधीत्यापि दुष्टान् प्रमत्तं भवताल्पशः ।।

अर्थ— हे लेखका, तूं अभिनन्दनार्ह आहेस;—अशाकरिता की दोषसंकुल व म्हणून टाकाअू असूनहि लोकांत प्रमाण म्हणून मानल्या गेलेल्या पुस्तकांचा अभ्यास करूनहि तूं लिहिलेल्या या पुस्तकांत अजमासापेक्षा फारच कमी दोष आहेत.

१ प्रस्ताव— माझे शिष्यमित्र रा. गं. ब. ग्रामोपाध्ये यांनी वरील नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. त्यावर अभिप्राय देण्याची आज्ञा साहित्य-परिषदेकडून मला झाली आहे. तदनुसार पुढील ओळी विद्वज्जनांच्या वाचनार्थ मी येथे लिहीत आहें. यांत मला तीन कर्तव्यांकडे दृष्टि द्यावी लागत आहे— परिषदेसंबंधी, लेखकासंबंधी व विद्वान वाचकांसंबंधी. हीं तीन कर्तव्यें वारंवार परस्परविरोधी होण्याचा संभव असल्याने माझें काम कांहीसें बिकट झालें आहे हें लक्ष्यांत वागवूनच विद्वानांनी पुढील अभिप्राय वाचावा अशी त्यांस विनंती आहे.

२ विषयमर्यादा— वेदभाषा > संस्कृत काव्यभाषा > पाली > माहाराष्ट्री > अपभ्रंश > ज्ञानेश्वरकालीन मराठी >...आपली वर्तमान मराठी— अशा परंपरेने आपली मराठी भाषा अुद्भवली आहे. तिची प्रथमावस्था आपण ज्ञानेश्वरींत पाहतों. द्वितीयावस्था म्हणजे बहामनीकाल व शिवाजीकाल यांतील रूप. तिच्यापुढील म्हणजे तृतीयावस्था पेशवेकालीन होय. हीच अवस्था प्रस्तुत पुस्तकाचा विषय आहे. या अवस्थेची व्याप्ति तिच्या नांवानुसार सहजच सन १७०० पासून १८१८ पर्यंत आहे. हीच लेखकाने स्वीकारली आहे. या कालांतील मराठीचें रूप आपणांस बरेंच परिचित आहे. कारण या कालांतील अनेक कवींशीं आपला परिचय आहे. तरी पण कवितेंतील विषय प्राय: मर्यादित व भाषा थोडीबहुत कमावलेली असल्याने, तिच्यामध्ये तत्कालीन अस्सल भाषेचें प्रतिबिम्ब पूर्णपणें अुमटतेंच असें नाही. अशी स्थिति दैनंदिन पत्रव्यवहाराची असत नाही. अशा व्यवहारांत विषयांची विविधता व लेखकाचा विविध शैक्षणिक दर्जा यांमुळे भाषेचीं प्राय: सर्वच अंगें प्रतिबिंबित असतात. यामुळे अशा पत्रांस तत्कालीन भाषेचा खरा नमुना असण्याचा मान सहजच प्राप्त होतो; व ही गोष्ट लक्षांत आणून आपल्या विषय प्रतिपादनासाठी **पेशवाओंतील दप्तराची निवड** लेखकाने केलेली सर्वस्वीं योग्यच ठरते. अशा रीतीने या पुस्तकांतील भाषास्वरूपाच्या अन्वेषणाचें क्षेत्र मर्यादित असल्याने, हें अन्वेषण निश्चित स्वरूपाचें व म्हणून सोपेंहि होणें संभवतें. या संबंधांतील लेखकाचा प्रयत्नहि बराच यशस्वी झाला आहे, हें आपणांस पुढील ओळींवरून दिसून येअील.

३ लेखकाच्या अडचणी— विषयाच्या मर्यादा निश्चित असल्याने आलेल्या सौकर्याबरोबर, अुलट बहुविध अडचणीहि लेखकाच्या मार्गांत आल्या आहेत. वर अुल्लेखिलेलीं पत्रें सर्वच मोडी लिपीमध्ये आहेत. या लिपींत (क) ऱ्हस्वदीर्घाचा भेद दाखवीत नाहींत. (ख) वारंवार अेकच आकार निरनिराळीं अक्षरें दर्शवितो [जसें-क-ला, द्र-द्द]. (ग) लेखनाच्या

लपेटीमुळेहि वर्णनिश्चय करणें वारंवार दुष्कर होतें. (घ) लेखकहि प्रायः अव्युत्पन्न असल्यामुळे अुच्चाराशीं लेखनाचा मेळ नेहमीच असतो असें नाही. गृह-च्या स्थानीं ग्रह (१०) असें आढळतें, तर अुलट ग्रह-च्या स्थानीं गृह (११) आढळतें. आश्रीवाद (३०१) असेंहि लेखन सांपडतें. यावरून स्पष्ट होतें की वारंवार आपलें लेखन अुच्चाराशीं अनुरूप ठेवण्याचा प्रयत्न किंवा पात्रता लेखकाच्या ठिकाणीं असत नाही. ज्याचा अुच्चारच प्रायः अशक्य असेंहि लेखन [अुदाहरणार्थ–(११) त्रृण, (२३६) श्रुत-च्या स्थानीं श्रृत] आढळतें. यांत आपल्या लेखनाचा अुच्चार कसा काय होणार याचा विचारहि लेखकाच्या मनास शिवलेला दिसत नाही. पत्रव्यवहारांतील या विशिष्ट अडचणींशिवाय सर्वसामान्य अशाहि अडचणी लेखकाच्या मार्गांत आहेतच. ज्ञानेश्वरकालाच्या आसपास **पंचवार्तिक** नांवाचें मराठीचें व्याकरण अेका महानुभावानें यथामति लिहिलें आहे. तेव्हापासून आंग्लशाहीच्या आरंभापर्यंत व्याकरणनिर्माणाकडे कोणींहि लक्ष दिलेलें दिसत नाही. आपल्यांतील पंडितांचें मराठीकडील शोचनीय दुर्लक्ष यावरून स्पष्ट होतें. यास अपवाद फारच थोडे सांपडतील. अर्थात् वरील पत्रांच्या अध्ययनास व्याकरणग्रंथाची मदत लेखकास प्रायः शून्यच मिळाली आहे. वर्तमान व्याकरणपरंपरा सर्वस्वीं आंग्लशाहीच्या काळांतील आहे. तरी पण अलीकडील ग्रंथांनी लेखकाचा मार्ग कांहीसा सुकर झाला आहे. भाषाशास्त्राचीं तत्त्वें हीं प्रायः नित्य अेकाच स्वरूपाचीं व म्हणून स्थिर असल्यानें, वर्तमानकालच्या ग्रंथांतील विवेचनापासूनहि लेखकास लाभ मिळाला आहे. असे ग्रंथ म्हणजे स्वदेशी व परदेशी. स्वदेशींचे लेखक डॉ. भाण्डारकर, राजवाडे, दादोबा अित्यादि व परदेशींचे लेखक ब्लोक, बीम्स अित्यादि. या लेखकांच्या ग्रंथांतील विवेचनाच्या धोरणानें ग्रंथकारानें सजविलेल्या पेशवाअी भाषेच्या रूपाविष्काराच्या परीक्षणाकडे आता आपण वळूं.

**४ विचाराची व भाषेची ढिलाअी— (क) घोटाळा**— (१) (पान ३५) नगर > नयर, (पान ३८) नगर > नअर > नेर अशी द्विविध रूपपरंपरा वाचकांस निःसंशय गोंधळांत पाडणारी आहे. (२) (पान ३२५) 'जागा बाका' पुल्लिंगी, (पान ३२६) 'ते जागा' अर्थात् स्त्रीलिंगी, अशा भिन्न-भिन्न विधानांवरून **जागा** हा शब्द वाचकानें कोणत्या लिंगाचा मानावा? अर्थात् अुभय लिंगांचा. पण तसें विधान लेखक मुळींच करीत नाही. (ख) **धरसोड**— (पान १६) मयूर > मोर. अ > ओ. यावरून **यू** लोपला हें म्हणणें प्राप्त होतें. (पान ३८) मयूर > मअूर. यावरून **य्** लोपला असें दिसतें. यांतील कोणतें खरें म्हणून वाचकानें स्वीकारावें? (ग) **अतिव्याप्ति** (पान १४१) 'संस्कृत अिन्- प्रत्ययान्त नामापासून आलेल्या अी-कारान्त नामांचें सामान्य रूपसुद्धा अी-कारान्तच होतें; जसें– हत्तीस– हत्तींनीं.' या स्थूल विधानांत, धनी– (धन्याचा), योगी– (योग्याला), अित्यादि (धनिन्-धनी, योगिन्-योगी) शब्दांचा समावेश होतो, पण तो अभिप्रेत नाही. (घ) **अपुष्ट विधानें**— (१) (पान ४६) 'दन्त्य तालव्य आणि शुद्ध तालव्य असे दोन्ही ज्ञानेश्वरींत आहेत. या दोवांचें लेखन अेकाच प्रकारें होतें' या विधानाचें समर्थन लेखकानें मुळींच केलें नाही. (२) (पान ५२) 'र्+ह् अशा संयोगांतील ह् लोपतो.' याचें अुदाहरण लेखकानें मुळींच दिलें नाही. (९) (पान १५४) 'विभक्तिप्रत्यय दोनदा लावण्याची संस्कृतची वहिवाट आहे.' कशावरून? हीं येथील तिन्ही विधानें सर्वमान्य अथवा नित्यपरिचित अशीं नाहीत. अर्थात् वाचकांनी हीं स्वीकारावीं अशी लेखकाची अिच्छा असल्यानें त्यांचें समर्थन अुदाहरणें देअून अथवा ग्रंथाधार दाखवून लेखकानें करणें अवश्य होतें. (ङ) **विधान व अुदाहरण यांचा विसंवाद**— (१) (पान ३१४) लुप्त-सामान्य (=Contracted) वाक्यांच्या चर्चेत पुढील अुदाहरण आढळतें:— 'तो

मुहूर्त अुत्तम आहे; परंतु मातुश्रीचें श्राद्ध ते दिवशीं आहे.' हें वाक्य मुळींच लुप्तसामान्य नाही. (२) (पान १४) 'संयुक्त व्यंजन (= जोडाक्षर) तसेंच राहत असलें तरी त्याच्या-पूर्वीचा स्वर दीर्घ होतो;– जसें– अलंकृत > आलंकृत'. येथे लेखकाच्या मतानुसार लं जोडाक्षर मानावें काय ? (च) **विपरीत विधानें** — (१) (पान ८०) 'ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽणः. या सूत्राच्या आधारें अुत्तर > अूतर असें प्राप्त होतें' असें लेखकाचें म्हणणें. यांतील प्रमाद अुघड आहे. ढ् किंवा र् यांचाच लोप हा सूत्राचा विषय असतां, हें सूत्र त् व्यंजनास लावण्यांत आलें आहे. हें पाहून 'डोळ्यांत केर व कानांत फुंकर' ही म्हण आठवते. (२) पान ३०६) 'क्रियापद **सकर्मक** असल्यास, प्रश्नार्थक शब्द कर्म व क्रियापद यांमध्ये येतो;— जसें– मोकासा कोणाकडून **आला** ?' येथें ये हा धातु सकर्मक कसा ? मोकासा हें कर्म कसें ? (३) (पान २३९) 'संयुक्तक्रियापदांत पूर्वकालवाचकाचा अुपयोग केला जातो; जसें– राहून गेलें, दिसोन येतें. अशा वाक्यांत क्रियापद कर्मणि किंवा भावे असतें' असें लेखकाचें विधान. यावर प्रश्न असा की **गेलें** आणि **येतें** हीं क्रियापदें कर्मणि किंवा भावे मानावयाचीं का ? (४) (पान २४३) '**अून** हें **भूत**कालबोधक **ल्यबन्त** आहे; तर **अूं** हें भविष्यकाळी निमित्त-बोधक **तुवन्त** आहे, हें विधान अत्यन्त दोषसंकुल आहे. मुळांत अून हें अव्यय कीं प्रत्यय ? तुवन्त कीं तुमन्त ? येथील संज्ञा रूपाश्रित असतांहि, त्या दुसऱ्या भाषेंत वापरणें योग्य मानल्यास going, standing अित्यादि अिंग्लिश रूपें [जात, येत, अुठत– याप्रमाणें] त-प्रत्ययान्त, व बोलत, गात हीं ing प्रत्ययान्त मानावयाचीं काय ? (छ) **समाधेय पाठदोषांची अुपेक्षा**— (पान २९८) 'जागिरीची मजकूर केला' हें लेखन चर्चाविषय मानण्यांत आलें आहे. पण येथे **जागिरीचा** असेंच लिहावयाचें आहे; कारण केला पुल्लिंग, म्हणून मजकूर पुल्लिंग; आणि मजकूर पुल्लिंग म्हणून जागिरीचा पुल्लिंग. अर्थात् विवेचनाचा विषय असलेलें जागिरीची असें रूपच मूळांत नाही. चा लिहिणें असतां चुकून वक्र रेषा ओळीच्या वर गेली, अितकेंच. असले अुघड-अुघड लेखन-दोष लक्ष्यांत घेणें लेखकाचें कर्तव्य होतें. (ज) **पारिभाषिक शब्दांचा अशास्त्रीय अुपयोग**— (१) (पान ४०) 'अनुनासिक आदि नसल्यास वर्ण**विपर्ययानें** त्याचा अनुस्वार होतो; जसें— नाम् > नं. येथे, मला वाटतें, वर्ण**भेदानें** असें पाहिजे. विपर्यय किंवा (पान ९२) व्यत्यास हे शब्द वर्णांची उलटापालट दर्शवितात. **सिंहो वर्णविपर्ययात्** (हिंस् > सिंह. यांत स आणि ह या व्यंजनांनी परस्परांत जागा बदलली आहे.) हें अुदाहरण प्रसिद्धच आहे. अर्थात् वर्णभेद अशा अर्थी वर्णविपर्यय योजणें योग्य नाही. (२) (पान २५४) **साहाय्यक्रियापद**— यांत साहाय्य भाववाचक नाम आहे. येथे आपणांस क्रियापदाचें विशेषण पाहिजे आहे. 'तो जात आहे' यांतील क्रियेची अपूर्णावस्था दर्शविण्यासाठी **अस्** हा धातु आला आहे. जा-बरोबर अस् **येतो**. करितां **सह अेति सः सहायः**—(दुसऱ्याबरोबर जातो तो सहाय.) हा अर्थ लक्षांत घेतां **सहायक्रियापद** असाच शब्दप्रयोग येथे योग्य होअील. (३) (पान ३१) **अुपान्त्योपान्त्यस्वर** अशा प्रदीर्घ संज्ञेच्या स्थानीं **अुपान्त्यपूर्व स्वर** असें म्हणणें योग्य झालें असतें. (झ) **रसिकता विरुद्ध वस्तुस्थिति**— (पानें २९४ आणि ३०५) वोडछाचें व दयिताचें राज्य या अुदाहरणांतील दयितांचें हा शब्द जरी रसिकतेस अनुकूल असला, तरी वस्तुस्थितीस अनुसरून दतियाचें असा रसशून्य प्रयोगच येथे केला पाहिजे. वोरछा आणि दतिया हींच मध्यहिंदुस्थानांतील संस्थानें येथे विवक्षित असावीं.

(५) **अस्थाने श्रद्धा**— [ग्राह्या मुद्रा नादशुद्धा, = नाणें वाजवून घ्यावें] (क) (पान

३५) 'प्रोच्छयति < पोहचवतो', यांतील अुच्छ् किंवा प्रोच्छ् हा प्राप्त होणारा धातु कोशांत सांपडत नाही. कोणा अितर लेखकाने चुकून योजिलेला हा धातु, मुळांत म्हणजे कोशांत न पाहतां, लेखकाने येथे योजिलेला दिसतो. (ख) (पान ११५) 'चतुर्थीचा **स** प्रत्यय **आस**–च्या सप्तमीपासून निघाला आहे' आवळा-जावळा यासारख्या द्विरुक्त शब्दांत पूर्वभाग केवळ निरर्थक पण नादतुल्य असा वारंवार आढळतो. प्रायः असाच प्रकार येथील (पार्श्व >) **पास**च्या पूर्वीच्या **आस**-चा आहे. अर्थात् **आस** यास कांहीच अर्थ नाही. तरीपण अशा अर्थशून्य शब्दाची सप्तमी (आसीं) करून तींतून **आ** छाटून चतुर्थीचा स प्रत्यय येथे काढिला आहे. अर्थात् हा प्रयत्न म्हणजे वन्ध्यापुत्राच्या नामकरणाचिन्तेप्रमाणे सर्वस्वीं निरर्थक व अशास्त्रीय आहे. (ग) (पान ७५) 'शृथिर > सढळ' यांतील शृथिर हा शब्द लेखकास कोठे मिळाला ? (घ) (पान २२५) 'नमेयं > नमिजे > नमित जा' ही व्युत्पादन-परंपरा पाहून मन थक्क होतें. या परंपरेंतील पहिला घटक कर्तरि, तर दुसरा कर्मणि; व दुसरा तृतीयपुरुषी, तर तिसरा द्वितीयपुरुषी ! तरी पण या तिहींमध्ये जन्य-जनक-भाव मानण्यांत आला आहे. याहून अंधतर श्रद्धा व्यवहारांत सांपडेल काय ?

(६) **प्रमाद** (क) (पान २५) पाय, (३२) वारा, (३३) धूर, (६०) खुशाल, (७२) सावकार, यांचीं दिलेलीं मुळें चूक आहेत. तीं क्रमाने पाद, वातर, धूम्र, (पर्शियन) खुशहाल (चांगली स्थिति), साधुकार अशीं पाहिजेत. (ख) (पान ५३) दन्त्य ल आणि मूर्धन्य ळ यांच्यामधील अेक अुचार ल्ल असा मानिला आहे. पण हा अुचार निराळा नसून तो ळ-चाच आहे. मध्यकाळ'त ळ-चेंच लेखन असें होत असे असें तज्ञ म्हणतात. (ग) (पान ६८) सिद्धान्त > सित्धान्त. या अुत्तर शब्द-रूपावरून 'मृदुव्यंनाचें क्वचित् कठोर व्यंजन होते' असें लेखकाचें अनुमान आहे हें चूक आहे. कारण द्ध-च्या अुच्चारांत धू-पूर्वी त् टिकणेंच नाही. त्-चा अुचार बळें करूं गेलें तरी त्याच्या स्थानीं द्-चेंच अुचारण होणार. अर्थात् येथील त् अुचाराचा सूचक मानण्याचें कारण नाही. शुद्धाकार द्ध याच्या स्थानीं लेखनास सोपा म्हणूनच हा आकार योजण्यांत येत असे अेवढेंच. (घ) (पान ९७) बहुमानार्थी प्रत्यय **आ** दिला आहे. तत्-स्थानीं, माझ्या मतें, **वा** पाहिजे. (ङ) मंडली– मधील ओं समुदायवाचक सांगितला आहे. यास आधार ? (च) (पान १७५) दर्शनातुल्य, रंगासारिखें अित्यादि विशेषणांत **तुल्य, सारिखें** हीं **शब्दयोगी** अव्ययें आहेत. हीं अव्ययें नसून विशेषणें आहेत. (छ) (पान १७६) 'कार्तिक सुध द्वितीया' या प्रयोगांत **विशेष्यानंतर विशेषणें** आहेत असें लेखकाचें म्हणणें; पण तें खरें नाही. सुध या विशेषणाचें विशेष्य कार्तिक नसून (अनुक्त पक्ष किंवा अुक्त) द्वितीया हेंच आहे. (ज) (पान २६९) 'स्थलापयति>ठरावअि>ठरावतो.' येथे **स्थिरापयति** हें मूळ अुघड असल्याने येथील व्युत्पत्ति चूक आहे. (झ) (पान ३१७– क्रियाविशेषणवाक्यांत परिणामवाचक म्हणून पुढील अुदाहरण आढळतें. 'ब्राम्हणाची मुक्तता होय ते गोष्टी केली पाहिजे.' येथे **जिनें** (ब्राह्मणाची मुक्तता होय) असा अध्याहार असून, हें अुपवाक्य **ते गोष्टी**चें वर्णक आहे. गोष्टी हें नाम आहे. **नामाचें वर्णक तें विशेषण.** तेव्हा प्रस्तुत वाक्य विशेषणवाक्यच आहे. अर्थात् पुस्तकांतील त्याचें वर्णन चूक आहे. (ञ) (पान २००) 'भूतकाळाच्या रूपांत येणारा **ल** क्रियाविशेषणात्मक आहे.' येथे विवक्षित काय आहे ? काम **केलें, केलेलें** काम या दोन्ही रूपांतील **ल** विशेषणात्मकच आहे. अर्थात् येथील **क्रियाविशेषणात्मक** हें वर्णन चूक आहे.

(७) **मतभेद**— (क) (पान १२१) 'वऱ्हाडांतून खांडवेप्रांते गेलों' या ठिकाणीं प्रान्ते या सप्तम्यन्त रूपावरून **ए** हा मराठींत सप्तमीचा प्रत्यय मानिला आहे. पण **हें** रूप

मराठींत बनविलें नसून संस्कृतांतील सिद्ध रूपच येथे घेतलें आहे. अर्थात् यांतील घटकांची अुठाठेव मराठींत नको. या रूपांची बनावट हा मराठीचा विषयच नाही. अुदाहरणार्थ— बुद्ध्या हें संस्कृतांतील तृतीयान्त रूप आपण मराठींत योजितों; पण या रूपांतील आ हा प्रत्यय मराठींतील तृतीयेचा प्रत्यय असें कधीच म्हणत नाही. सारांश— सिद्ध रूपांतील प्रत्ययावर मराठीचा शिक्का मारणें चूक आहे. तेव्हा प्रांते या रूपावरून ए हा मराठींत सप्तमीचा प्रत्यय मानतां येत नाही. (ख) (पान ४२) 'त्यांचे, त्यांहचे' या दोन रूपांपैकी अुत्तररूपांतील अनुस्वार अधिक खणखणीत आहे असें लेखकाचें म्हणणें. येथे त्याच्या अुलट प्रकार सत्य आहे, असें मला वाटतें. (ग) (पान १७४) लिहिती आज्ञा, लिहिता पुरुष, लिहितें मूल अित्यादि शब्दांतील मूळ **त–कृदन्त** आहे असें लेखकाचें म्हणणें. माझ्या मतें (दातृ-दाता यासारखें) **ता**-प्रत्ययान्त मूळ येथे असावें. (घ) (पान ३०७) 'जाअूं न देतो— अित्यादि ठिकाणीं न-चा स्थान-निश्चय फारशी मापेच्या वळणावर आहे' असें म्हणणें मला चूक वाटतें. गन्तुं **न** ददाति, पत्रं **न** आगतं अित्यादि संस्कृत वाक्यांतील न-चें स्थान मराठींत अुतरलें आहे, असें कां म्हणूं नये ? (ङ) (पान १८३) '**सतरा** या शब्दांत **रा**–वर आघात आहे. मला वाटतें तो **स**–वर आहे.

(८) **गुणग्रहण**— येथवर या पुस्तकांतील लहानमोठ्या अुणीवा, दोष, अपविधानें अित्यादिकांची चर्चा झाली. या गोष्टींबरोबर प्रस्तुत पुस्तकांतील पुढील गुणहि लक्षणीय आहेत. त्यांकडे आता मोकळ्या मनाने वळतों. (क) (पान ३८) फलानि (सं.) > फलाइं (प्रा.) > **फळें** ही व्युत्पत्ति सर्वथा बरोबर आहे. (ख) (पान ४३) 'प्राकृतोद्भव भाषांच्या स्वभावाप्रमाणे मराठींत अनुस्वारांचा अुपयोग घटत आहे' ही विचारसरणी शुद्ध आहे. (ग) (पान २०९) होता, होती, होतें अित्यादि रूपें भूतकालीन असून **त**– प्रत्ययान्त आहेत. हें लेखकाचें निरूपण ग्राह्य आहे. (घ) (पान १०९) 'लागी > ला' ही व्युत्पत्ति समंजसपणाची आहे. (ङ) (पान ११६) 'होन्तउ > ... अून' ही पंचमीच्या अूनप्रत्ययाची पूर्वपीठिका लेखकाने स्वीकारली आहे. तींत त्याचा सारासारविचार दिसून येतो. (च) (पान ११९) 'षष्ठीचा **चा** प्रत्यय **त्य** ह्या साधित प्रत्ययापासून आला आहे' हें मत स्वीकारण्यांत मार्मिकता स्पष्ट दिसते. (छ) (पान १५४) मज्झ > माझा, तुज्झ > तुझा अित्यादि व्युत्पत्तिहि स्वीकारार्ह अशीच लेखकाने घेतली आहे.

(९) **थोडी चर्चा**— (क) (पान १०६) 'चिटणिसांनी कागद वाचिला' यांत **कागद** हें कर्म व त्याची विभक्ति **द्वितीया**. (ख) (पान २२४) 'भेट व्हावी असा हेतु आहे' येथे **भेट हें कर्म** असून त्याची प्रथमा आहे. (ग) (पान ३०४) 'स्वामींनीं मजला पत्रें पाठविलीं' यांत **मजला** हें अप्रत्यक्ष **कर्म** आहे. (घ) (पान ३२०) 'ताजी सनद करून दिली' यांत **सनद** हा **कर्ता** आहे. याचा विचार— लोकांत कर्ता व कर्म यांविषयी भलत्याच कल्पना रूढ झालेल्या वारंवार आढळतात. 'अुंदीर मांजराला भ्याला' यांत भिणारा अुंदीर व भ्यालेलाहि अुंदीरच. दोन्ही ठिकाणीं अुंदीर हेंच **अेक विशेष्य**. म्हणून भिणें हा धातु **अकर्मक** आहे. अुलट— 'अुंदराने दाणे खाल्ले' येथे खाणारा अुंदीर; पण खाल्लेला अुंदीर नसून दाणे. येथे विशेष्यें **दोन**, भिन्न आहेत; म्हणून खाणे हा धातु **सकर्मक**. म्हणजेच (१) **णारा**– प्रत्ययान्त आणि **लेला**– प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणें, **एकच विशेष्य** दाखवीत असल्यास, त्यांतील धातु **अकर्मक** मानावा. (२) हीं विशेषणें **दोन** भिन्न **विशेष्यें** दाखवीत असल्यास धातु **सकर्मक** मानावा. (३) या दोन विशेष्यांतील कर्त्याहून निराळें असलेलें विशेष्य तें कर्म होय. या येथील

वर्णनावरून अकर्मक धातु, सकर्मक धातु आणि कर्म यांचा बोध विद्यार्थ्यांनी घ्यावा म्हणजे त्यांचा कर्मासंबंधी घोटाळा होणार नाही. याबरोबरच पुढीलहि विधान विद्यार्थ्यांनी लक्षावें. (४) वाक्यांतील क्रियापद ज्याशीं सधर्म (= पुरुष-लिंग-वचनांनीं समान) त्याची विभक्ती प्रथमाच असावयाची. या गोष्टी लक्ष्यांत घेऊन अुदाहरण क–कडे पाहतां **कागद** ही **प्रथमा** आहे, त्यास द्वितीया म्हणणें प्रमाद होय. वाक्य ख–मध्ये **व्हावी** यांत हो धातु आहे. होणारी भेट व झालेलीहि भेटच. करितां **व्हावी अकर्मक.** अर्थात् भेट हें कर्म होत नाही. वाक्य ग–मध्ये पाठविणारा स्वामी हा कर्ता; पाठविलेला कोण ?— मी कीं पत्रें ? पाठविलेलीं **पत्रें;** अर्थात् **मजला** यास कर्म म्हणणें चूक आहे. वाक्य घ–मध्ये सनद ही काय आहे ? करणारी कीं केलेली ? देणारी कीं दिलेली ? करणारी व देणारी व्यक्ति राजा अित्यादि असून, केलेली किंवा दिलेली **सनद** आहे. अर्थात् सनद कर्त्याहून भिन्न असल्याने कर्म आहे; तेव्हा सनद कर्ता म्हणणें प्रामादिक आहे.

(१०) **समारोप—** येथवर आपण प्रस्तुत पुस्तकांतील विषयाच्या मर्यादा, लेखकाच्या अडचणी, त्याच्या विचारसरणींतील वैगुण्यें (भाषेची ढिलाअी, अंधश्रद्धा व तज्जन्य प्रमाद) हीं चर्चिलीं. त्यानंतर मतभेदाचींहि स्थानें दर्शविलीं. त्याच्या विवेचनांत आढळणारीं शुद्ध विधानेंहि दाखविलीं. या शुद्ध विधानांबद्दल लेखक जसा अभिनन्दनास पात्र आहे, तसाच निरूपित दोषांबद्दल दूषणीयहि आहे. आणि खेदाची गोष्ट अशी की यांतील दोषांची संख्या अगण्य नाही. असें कां व्हावें ? या दोषांबद्दल दोषी कोण ? याचा विचार करितां 'परिस्थिति होय; लेखकाची कृति नव्हे'—असें उत्तर मनांत येतें. अलीकडे व्युत्पत्ति आणि निबन्ध यांचा समावेश करणारीं अशीं पुस्तकें निघत आहेत. यांत पहिल्या दोन विषयांचा विचार प्रायः केवळ तांत्रिक असतो, नव्हे, वारंवार सदोष असतो; तरी पण अशीं पुस्तकें शाळांतून लाविलीं जातात व तीं शिकण्याचा विद्यार्थ्यांवर आणि शिक्षकांवर प्रसंग येतो. या प्रसंगामुळे परिचय दृढ होऊन **या पुस्तकांतील विधानें हेंच सत्य** असें वाटूं लागतें व सर्वस्वीं अशा पुस्तकांसच अनुसरून अध्ययन, अध्यापन व परीक्षण हीं चालतात. अर्थात् हीं पुस्तकें पढविणाऱ्या शिक्षकांनी लिहिलेल्या प्रबंधांत अशास्त्रीयता येणारच. पण हें लक्षांत ठेवावें की या अशास्त्रीयतेचा दोष अशा प्रबन्धलेखकांकडे नसून तो सर्वस्वीं अशुद्ध पुस्तकें पाठ्यपुस्तकें म्हणून शाळांत नेमण्याच्या प्रवृत्तीकडेच आहे. तरी पण अशा सदोष लिखाणाबद्दल लेखक पूर्णतया निर्दोषी ठरतो, असें नाही. परिस्थितीचें सदोष बंधन झुगारून जो सत्याशीं गांठ घालील तोच खरा विद्वान्. परिस्थितीपुढे कळत वा नकळत मान वाकवून वागणारा विद्वान् हा गौण श्रेणींतीलच होय. या श्रेणींतच प्रस्तुत पुस्तकाच्या लेखकाची गणना संभवते. मात्र हें विसरूं नये की परिस्थितीशीं न झगडतां, यथाप्राप्त साधनांच्या अुपयोगाने परिश्रमपूर्वक हा प्रबंध लिहिला आहे. व हा प्रयत्न बराच यशस्वी व सफल झाला आहे (हेंच आरंभींच्या पद्यांत दिलें आहे). यांतील प्रतिकूल परिस्थिति पुढीलप्रमाणे पद्यांत मांडून आपला निरोप घेतों.

शास्त्र-युक्ति-विरोधी चेत् प्रमाणी-कारितो बलात् ।
ग्रन्थस्तदभ्यासको यत् न प्रमाद्येत् तदद्भुतम् ॥

**अर्थ—** शास्त्र आणि युक्ति या दोहोंस पारखा असा ग्रंथ हट्टाने प्रमाण म्हणून नेमण्यांत आल्यास त्याचें अध्ययन करणारा छात्र, किंवा अध्यापन करणारा शिक्षक, यांच्या हातून (पदोपदीं), चुका न झाल्या तरच आश्चर्य ! (चुका झाल्यास मुळींच आश्चर्य नाही.)

**गो. कृ. मो.**

अनुक्रमणिका

१. प्रस्ताव– 'मुरग्यांलें व्याकरण' नांवाचें पुस्तक रा. शेणै गोंयबाब यांनी लिहिलें आहे. लिहिण्यास आनंद वाटतो की या पुस्तकांतील प्रतिपादन खोल विचाराचें व प्रायः तर्कशुद्ध असें आहे. यावरून लेखकाचा अधिकार मोठा आहे हें उघड होतें. हें पुस्तक त्याच्या नांवावरून जरी मुलांकरिता लिहिलेलें दिसत असलें तरी त्यांत गाढ व्याकरण-तत्त्वें चर्चिलीं असल्यानें तें प्रौढांनीसुद्धा वाचण्याजोगें आहे.

२. गुणदोष—नामांच्या वर्गीकरणांत दिसून येत असलेली विचारसरणी अभिनंदनार्ह आहे. नामांच्या भिन्न वर्गांत कसकसा भेद आहे, हें येथे तर्कशुद्ध रीतीनें सांगितलें आहे. या-संबंधांत तीनच मतभेद येथे सांगावेसे वाटतात (१) (समुदायवाचक नाम) रासनाम हा नामाचा वर्ग केवळ अिंग्रजीचें अंधानुकरण सुचवितो. शेंडी (केसांचा समुदाय), धोतर (सुतांचा समुदाय), फूल (पाकळ्यांचा समुदाय), अित्यादि नामें जरीं अशा वस्तु दर्शवीत असलीं की ज्या पुष्कळ घटकांनी बनल्या आहेत तरी यांना (सामान्यनाम किंवा) जात-नामांच्याबाहेर स्थान नाही हें अुघड आहे. तसेंच (२) अुदक-सारखीं नामें नित्य अेकवचनी असल्यामुळे त्यांचा समावेश द्रव्यनामें या स्वतंत्र वर्गांत केला पाहिजे. (३) देव, सैतान, भूत (स्वर्ग=) सर्ग, नरक हीं भावनामें नसून वस्तुनामेंच (सामान्य वा विशेष) आहेत. या पुस्तकांत नामाच्या पलीकडे पुढील व्याकरणाचा भाग मुळींच आला नसल्यानें, आता शास्त्रीय विषय सोडून अितर गोष्टींकडे थोडासा वळतों.

३. अवांतर माहिती—(क) पान (३९) 'भट्टोजी दीक्षित मार्ग' असें विशेष-नाम आहे. हें नाम कधी प्रचारांत आलें ही गोष्ट कळल्यानंतर, व गोवें प्रांतांतील मट यांचा विशिष्ट अर्थ लक्षांत घेऊन, या दीक्षिताच्या जातीविषयी कांही अनुमान करितां येअील.

(ख) पाकड हें धान्य म्हणून विकविण्यांत येतें (पान ५२).

(ग) अुजवाड (पान ५७), अुत्तर (=शब्द), भांगर (=सोनें) गोखां (=गुरें, पान ५०) हे शब्द आपण ज्ञानेश्वरींत वाचतों. याप्रमाणे या पुस्तकाचे विशेष व त्यांतून मिळणारी अितर माहिती हीं येथे सांगितलीं आहेत.

या पुस्तकाच्या कोंकणी भाषेशीं मी परिचित नसल्यानें या अभिप्रायांत कांही प्रमाद शिरले असल्यास त्याबद्दल लेखकाची क्षमा मागून निरोप घेतों.

गो. कृ. मो.

## साहित्य-शास्त्र

**पुरोगामी साहित्य**— (प्रो. ना. सी. फडके यांची टीका व तिचें खंडन) ले० आचार्य शं. द. जावडेकर; प्रका० माधव देशपांडे, सन्ध्या प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. १॥

विशेषणानें विशेष्याचें वैर साधल्याचें अुदाहरण प्रस्तुत पुस्तकासारखें आजवर दुसरें कोणतेंहि घडलें नसेल. यांत साहित्यचर्चा फार थोडी व अितर गोष्टीच फार आहेत. यजमानाच्या येथे पाहुण्यांनीच धुडगूस घातल्याचें आपण विनोदी लेखांतून वाचतों, त्याचा प्रत्यय या पुस्तकांत चांगलाच येतो. यांत शास्त्र आहे, नीतिविचार आहे; मार्क्स आहे व फ्रॉअिड आहे; धर्ममोक्ष आहेत, अर्थ-कामहि आहेत; कला मधून मधून दिसते; साहित्याला मात्र चोरट्या-सारखें झालें आहे. पुस्तक साहित्यापेक्षा पुरोगामित्वावरच लिहिलेलें आहे.

या पुस्तकाचे तीन भाग आहेत. पहिल्या भागांत आचार्य जावडेकर यांचें मुंबअी-अुपनगर साहित्यसंमेलनाचें अध्यक्षीय भाषण आलें आहे. दुसऱ्यांत प्रो. फडके यांनी त्यावर

केलेली 'सात्त्विक' टीका आहे, व तिसऱ्या भागांत त्या टीकेस आचार्यांनी दिलेलें 'तात्त्विक' अुत्तर आहे. टीका-प्रतिटीकेचा हा देखावा मनोरंजक व मोठा अुद्बोधक आहे. आचार्यांचें पहिलें भाषण सूत्ररूप झाल्याने तितकेंसें स्पष्ट झालें नाही. ह्याचा फायदा प्रो. फडके यांस मिळून त्यावर टीका करतां आली. या टीकेस अुत्तर म्हणून जावडेकरांनी पहिल्या भाषणापेक्षा अधिक सविस्तर असें लिहिलें. ही टीका-प्रतिटीका मोकळ्या मनाने व तत्त्वबोधाकरिता झालेली असल्याने बहुतेक वरच्या पातळीवर राहूनच करण्यांत आली हा तिचा विशेष आहे. फडक्यांची लेखनपद्धति नेहमीप्रमाणेच सुगम व आकर्षक आहे, पण प्रतिपक्ष्यास हळूच कां होईना बोचकारे घेणारी आहे. लक्ष्मीधराचा व खुपमस्कऱ्याचा दृष्टान्त या दृष्टीने पाहण्याजोगे आहेत. तसेंच प्रतिपक्षाचे मुद्दे आपण व्यवस्थित मांडून क्रमशः त्यांचें खंडन करीत आहों असा परिणामकारक आविर्भावहि त्यांना चांगला साधला आहे. आचार्यांच्या जवळ ही कला नाही, पण तत्त्वनिश्चय, हेत्वाभासाचें आकलन व खंडन करण्याची कुशलता, स्वमतपुष्ट्यर्थ आधार मांडण्याचें सामर्थ्य या गोष्टी असल्याने आपलें म्हणणें परिणामकारकपणें ते मांडूं शकतात. प्रतिपक्ष्याच्या कोटिक्रमाने चिडून न जातां आपलें म्हणणें नेटाने पुढे मांडतांना पाहून सकौतुक आदर वाटतो. मराठीमध्ये साहित्यध्येयविषयक चर्चा या दृष्टीने या पुस्तकाने महत्त्वाची भर पडली आहे.

हें पुस्तकाच्या रंगरूपासंबंधी झालें. अंतरंगाकडे वळल्यास केवळ साहित्यविषयक चर्चा यांत थोडीच असल्याचें दिसतें हें प्रारंभींच सांगितलें. सारा भर पुरोगामित्वावर. आपण पुरोगामी असावें कीं नाही याविषयीं साहित्याचा विचार दोघांनीहि लक्ष्यांत घेतला नाही. आजचा विशेष प्रसंग म्हणून किंवा नेहमीच त्याने पुरोगामी असलेंच पाहिजे, आणि कांही निश्चित प्रकारचेंच पुरोगामी असलें पाहिजे असा दोघांचाहि आग्रह. तो प्रकार म्हणजे समाजवाद. या बाबतींत पूर्वीच्या अघळपघळ ध्येयवादावर त्यांचें समाधान नाही. साहित्याचें अथवा सर्व सामाजिक जीवनाचें ध्येय 'सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः' हें असलें तरी अेवढ्या अैसपैस ध्येयावर दोघांचेंहि समाधान न होतां हें ध्येय समाजवादानेच साधणारें आहे व म्हणून त्याचाच पुरस्कार करणारें वाङ्मय तें पुरोगामी वाङ्मय असा त्यांचा आग्रह आहे. हा समाजवाद मार्क्सप्रणीत असावा कीं गांधीप्रणीत असावा याविषयी त्यांच्यांत मतभेद होण्याचा संभव आहे; पण 'दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो। जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिमात्र' अेवढें व्यापकपणामुळे संदिग्ध असणारें ध्येय व त्या दृष्टीने लिहिलें गेलेलें साहित्य आज यांचें समाधान करील असें वाटत नाही.

वस्तुतः पुरोगामित्वाविषयींच्या श्री. जावडेकर व फडके यांच्या कल्पनांत फार मोठा भेद आहे असें नाही हें फडके यांनी दाखवून दिलेंच आहे. समाजवाद हें दोघांचेंहि ध्येय आहे. हा समाजवाद धर्मार्थकाममोक्षादि चारहि पुरुषार्थांच्या धोरणाने सिद्ध झाला तरच खरोखर फलदायी व हितकारक होईल असें जावडेकरांचें म्हणणें. प्रो. फडके यांना चार पुरुषार्थांची ही भाषा मान्य नसून केवळ अर्थ व काम यांवरच आधारलेली संस्कृतिहि तेजस्वी असूं शकेल, धर्म व मोक्ष या शास्त्राने सिद्ध न झालेल्या व म्हणून बुद्धिवादास न पटणाऱ्या गोष्टींची भाषा पुरोगामित्वाच्या चर्चेत न आलेली बरी असें त्यांचें म्हणणें. चार पुरुषार्थांच्या या वादाने आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता व दण्डनीति या चार विद्यांच्यासंबंधी पूर्वी झालेल्या वादाची आठवण होते. अशा वादांत मतभेद मनांतील अर्थांमध्ये नसून योजलेल्या शब्दांच्या अर्थांत असतो. श्री. जावडेकर व फडके यांचे धर्ममोक्षांचे अर्थ वेगळे असून फडके यांना वाटतें त्याप्रमाणे

कर्मकाण्ड, अंधविश्वास, मूर्तिपूजा किंवा देवावरील श्रद्धा यांचा त्यांत अंतर्भाव होतोच असें दिसत नाही; किंवा मोक्षाच्या कल्पनेंत परलोकाचा अंतर्भाव होत नाही (पृ. १२८-१४१ पाहा). पण हे अर्थ मूळ भाषणांत तितकेसे विशद न झाल्याने प्रो. फडके यांनी आपल्या टीकेंत चार पुरुषार्थांच्या कल्पनेवर झोड अुठविली आहे. फडक्यांच्या मताने मार्क्सला जर 'मनुष्यमात्राच्या ठिकाणीं अेकच आत्मा स्फुरण पावत असून, प्रत्येक व्यक्तीने अितर सर्व व्यक्तींचा आत्मौपम्य दृष्टीने विचार केला पाहिजे' असें वाटत असेल तर धर्म तरी यापेक्षा निराळे काय सांगत आहे? 'देहात्मभाव नष्ट होअून सर्वात्मभाव अंगीं बाणणें' हीच जर श्री. जावडेकरांची मोक्षाची कल्पना असेल (पृ. १४६) तर मोक्ष शब्दानेहि प्रो. फडके यांना बिचकून जाण्याचें कारण नाही. आता या दोन्ही पुरुषार्थांचा अंतर्भाव अर्थ-कामामध्ये होण्यासारखा असेल तर हे दोन पुरुषार्थ तरी कशाकरिता हवेत? केवळ अेक काम ठेवला व त्याचा अर्थ सर्वस्पर्शी केला की काम झालें. लोकहिताची अिच्छा, ध्येयवाद या साऱ्या गोष्टींचें स्वरूप शेवटीं अिच्छा अथवा काम हेंच नाही काय? व या व्यापक अर्थाने 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति' असें अुपनिषदांत म्हटलें नाही काय? किंबहुना धर्म व अर्थ हेहि अेकैकशः पुरेसे होतील. आवश्यक तो अर्थ व काम साध्य करून घेणें हेंहि धर्माचा अैहिक दृष्टीने विचार करणाऱ्या लोकांना धर्मांत अंतर्भूत करतां येअील. पण त्या शब्दाचा अर्थ मात्र व्यापक केला पाहिजे. पण असें करून भागत नाही. अतिरिक्त वर्गीकरणाप्रमाणे अेकाच वर्गांत अितर अनेकांचा अंतर्भाव करणें हेंहि सुगमतेच्या दृष्टीने अिष्ट नसतें. काम या शब्दाचा अर्थ जसा फार व्यापक करून सर्वव्यापी करणें अिष्ट नाही त्याचप्रमाणे संकुचित अर्थाने केवळ अर्थप्राप्ति आणि कामप्राप्ति यांपेक्षा आणखीहि कांही गोष्टी जीवनांत आहेत असें ज्यांना वाटतें त्यांना धर्ममोक्षांची अैहिक अशी कल्पनाहि स्वतंत्र व आवश्यक वाटणें साहजिक आहे. तेव्हा पुरुषार्थांच्या संख्येबद्दलचा हा वाद विनाकारण झाला असें वाटतें. तसेंच पाहिल्यास माणसाची क्रीडाप्रवृत्ति किंवा कलाप्रवृत्ति ही तरी अर्थकाममोक्षांत अंतर्भूत झाली आहे असें कां समजावें? अर्थकामविषयक केवळ दैहिक अपेक्षा कलानंदामध्ये नसते असेंच सांगण्यांत येत नाही काय? मग तो अेक पांचवा पुरुषार्थ मानावयास काय प्रत्यवाय आहे.

समाजवाद ध्येय म्हणून वाईट आहे असें कोण म्हणेल? पण तें साध्य नसून साधन आहे हें विसरतां कामा नये. केवळ शंभर टक्के आर्थिक समता व भोगवस्तूंची समान वांटणी ही व्यवहार्य व शक्यहि नाही. तथापि सर्वभूतीं समदृष्टि बाळगून सर्वांचें सुख साधावें या-करिता शक्य त्या किमान संधि व सुख सर्वांना मिळावें ही गोष्ट कोणत्याहि साहित्यास अमान्य नव्हती व होणार नाही. पण सर्व तपशिलाच्या बाबतींत आम्ही म्हणतों तेंच पुरोगामित्व असें बोलण्याची जी पद्धत सुरू आहे ती अनिष्ट आहे. मध्यमवर्ग म्हटला की येथून तेथून स्वार्थी व कामगारवर्गाच्या हिताशीं विरोध करणारा, सारे भांडवलवाले स्वार्थी, क्रूर व बदमाश, प्रेम-भावना ही तहानभुकेप्रमाणेच अेक शारीरिक गरज आहे, कुटुंबसंस्था ही समतेस विघातक असून नष्ट झाली पाहिजे यांसारख्या मतांचा पुरस्कार करण्यांतच पुरोगामित्व सांठविलें आहे असें म्हणणें अयोग्य आहे. समाजाचें सुख हेंच समाजवादीयांचें ध्येय असल्यास कदाचित् शास्त्रानेच गुण-कर्मविभागशः समाजांत भिन्न वर्ग असणें अिष्ट आहे असें सिद्ध होण्याचा संभव आहे. आजचे अतिप्रौढविवाह अनिष्ट ठरून कदाचित् पूर्वीअितके नसले तरी आजच्या मानाने बालविवाह होणेंच अिष्ट ठरेल. कुमारिकांचे विवाह अेकदा तरी व्हावेत म्हणून— कोणास ठाअुक — विधवाविवाहांना मर्यादा घालावी लागेल. सुप्रजाजननाच्या दृष्टीने विवाहबंधनें कडक करावीं

लागतील. शास्त्राच्या आज्ञेने होणाऱ्या वा गोष्टी शास्त्र-शास्त्र, विज्ञान-विज्ञान म्हणून ओरड करणाऱ्या पुरोगामी लोकांनी मान्य केल्या तरच ते समाजवादी म्हणून खरे ठरतील. व्यक्ति-स्वातंत्र्य व समान संधि या गोष्टींना बरीच मुरड घालावी लागेल. शास्त्र प्रमाण मानण्याची येथवर तयारी साऱ्याच पुरोगामी लोकांची दिसत नाही.

वस्तुतः समाजाच्या प्रदीर्घ अितिहासांत अुपरिनिर्दिष्ट गोष्टींपैकी कांही गोष्टी तरी तत्कालीन स्वरूपाच्या असतात. राष्ट्ररक्षणाकरिता लोकसंख्या अपुरी पडत असल्यास पुष्कळ संतति निर्माण करणें हीच नीति ठरून स्त्रियांच्या आर्थिक व वैवाहिक स्वातंत्र्यावर बंधनें पडतील. कांही राष्ट्रांत आज तें चालू आहे. स्वसंरक्षणाकरिता किंवा राष्ट्ररक्षणाकरिता हिंसेचा पुरस्कार करावा लागेल. नीतीचे हे तत्कालीन आदेश साहित्याने जोरांत पुढे मांडले पाहिजेत हा दुराग्रह आहे. सत्य, न्याय, अहिंसा, दम, शम, अस्तेय अित्यादि सर्वसामान्यपणें चिरंतन अशा स्वरूपाचीं नीतितत्त्वें साहित्यास मान्य असतात, व हीं अेवढीं सांभाळलीं म्हणजे पुरे आहे. पण यांचाहि प्रसार करण्याकरिता साहित्य, निदान ललितसाहित्य, नाही. ज्ञानेश्वरांनी किंवा अितर कांही संतांनी आपल्या साहित्यांतून तें साधलें हा कांही बिनतोड पुरावा होअूं शकत नाही. ज्ञानेश्वरी वाचून मन अुदात्त होतें, पण ललितसाहित्याची भूक सर्वस्वीं भागते असें नाही. अितर संतांची गोष्टच राहिली. खरें पाहतां धर्मार्थकाममोक्षाप्रमाणे कलाप्रवृत्ति अथवा क्रीडा-प्रवृत्ति ही मानवाची स्वाभाविक प्रवृत्ति असते. अितर पुरुषार्थांबरोबर याहि पुरुषार्थाची प्राप्ति त्यास हवी असते. या साऱ्यांच्या सहकार्यानेच जीवन सर्वांगीण व सुखी होअील. यांमध्ये श्रेष्ठ-कनिष्ठ भाव लावण्यांत व अेकाचें पर्यवसान दुसऱ्यांत झालें पाहिजे असा आग्रह धरण्यांत अर्थ नाही. मीराबाअीने आपला काम व अर्थ कृष्णाच्या चरणीं लावून धर्ममोक्षसाधनांत त्यांचें पर्यवसान केलें ही गोष्ट सर्वच समाजाला सांगून काय अुपयोग? 'घरीं दारीं शय्येवरि...भगवच्चिंतन करीं' हाहि अुपदेश त्याच प्रकारचा होअील. 'धर्माकरिता काम' असें न सांगतां 'धर्माला अविरुद्ध' असा काम मी आहें असें भगवंतांनी गीतेंत सांगितलें हीच गोष्ट अितर पुरुषार्थांची. अेकाचा दुसऱ्याशीं अविरोध साधला म्हणजे झालें. अेकाच विशिष्ट पुरुषार्थाचें स्तोम माजवून अितर पुरुषार्थांना त्यांचें दास्य करावयास लावावयाचें किंवा निदान आपापल्या क्षेत्रापुरतें संपूर्ण स्वातंत्र्य द्यावयाचें नाही ही Totalitarian पद्धति कांही काल फायदेशीर वाटली तरी परिणामीं किंवा वस्तुगत्या अिष्ट ठरणार नाही.

'कलेकरिता कला' या चिरपरिचित घोषवाक्याचा अुद्धारहि साहजिकच या संदर्भात करण्यांत आला आहे. या वाक्यास अेका बाजूने अवास्तव महत्त्व देण्यांत येतें तर दुसऱ्या बाजूने विनाकारण धोपटण्यांत येतें. या परस्परावलंबी जगांत कोणतीहि गोष्ट केवळ स्वतःसाठी असूं शकत नाही, तशी कलाहि नाही. ती स्वतःच्या अस्तित्वासाठींसुद्धा जीवनावर अवलंबून आहे. जीवनांतूनच तिचा जन्म झाला आहे. पण अेवढ्यामुळे तिला मर्यादित अर्थाने कां होअीना स्वतंत्र असें क्षेत्र मिळत नाही असें नाही. आपलीं अपत्यें आपल्यामुळेच जन्माला आलीं असलीं तरी साऱ्याच बाबतींत सर्वदा त्यांच्यावर आपलें वर्चस्व चाललें पाहिजे असें नाही. 'कलेकरिता कला' या घोषवाक्याचा अर्थहि अेवढाच आहे. अर्थोत्पादनाकरिता कला जुंपणें म्हणजे जर तिचा विक्रय होतो, कामजागृतीसाठी कलेचें साहाय्य जर अश्लाघ्य (याहि गोष्टी कित्येकांस तशा वाटत नाहीत) तर धर्ममोक्षाचें दास्यहि त्या कलेस करावयास लावणें अिष्ट नाही. धर्माऽविरोधी कामाप्रमाणे सर्वच गोष्टी अितरांशीं अविरोधी असावयास पाहिजेत व

असें झाल्यावर त्यांना जें स्वतंत्र क्षेत्र या मर्यादित अर्थानें अुरतें त्यांत त्यांस स्वातंत्र्य हवें. याच अर्थानें कलेकरिता कला हीच गोष्ट आपल्यास मान्य करावयास हवी. त्यांत आणखी अितरांची ढवळाढवळ नको, अेवढाच त्याचा अर्थ. याकरिता जीवनवादीयांनी तरी त्याबद्दल गहजब करण्याचें कारण काय?

समाजवादी किंवा पुरोगामी म्हणवून घेणारांनी निदान अेवढें तरी करावें. पुरोगामित्व ही साहित्याच्या चांगले-वाअीटपणाची कसोटी ठरवूं नये, व पुरोगामी साहित्यच निर्माण झालें पाहिजे असा आग्रह धरूं नये. पुरोगामित्व म्हणजे काय ही गोष्ट आधी वादग्रस्त आहे. आपली कल्पना तीच पुरोगामित्व असें म्हणण्याचा फार मोह होतो, आग्रह वाढतो व हा आग्रह साहित्याला अथवा कलेला विघातक आहे. 'आजच्या घटकेला' जगण्याची भ्रान्त वाटत असेल तर कला कांही वेळ अवश्य बाजूला ठेवा. देशाला आग लागलीशी वाटत असल्यास निश्चिंत-पणें वीणावादन करणारा कलावंत खरा कलावंतच नव्हे; परंतु त्याच्या वीणेच्या भोपळ्याचा अुप-योग आग विझवण्याकरिता करण्याचा अट्टाहास नको. आपद्धर्म म्हणून कलेसाठी कला हें तत्त्व दूर ठेवण्यास प्रो. फडके आज तयार आहेत. पण हें तत्त्व दूर ठेवण्यापेक्षा कलाच कांहीं काळ दूर ठेवण्यास काय हरकत आहे? 'आजची घटका' अितकी आणीबाणीची आहे असें वाटत असल्यास कलेला सुट्टी देअून, वीणा गवसणींत घालून, बंदुक घ्यावयाचा अुपदेश सरळ करा ना! आणीबाणीच्या वेळीं कलेच्या मिठींतून सुटका करून घेअून संकटनिवारणार्थ प्रयत्न करणें बरें, कीं कलेच्या गळ्यांत हात ठेवून तिचाच अुपयोग संकटप्रतिकारार्थ करणें चांगलें? का संकट-निवारणहि कलात्मक पद्धतीनें व्हावयास हवें?

खरोखर ललितसाहित्यलेखकांचा जगदुद्धाराचा हा समारंभ पोकळ आहे. जगाच्या अुद्धाराची दिशा ठरविण्याचें काम त्यांनी आपल्याकडे न घेतां तें समाजशास्त्रज्ञ व समाजनेते यांच्याकडे सोपवावें. त्याला समाजजीवनाचा व शास्त्राचा खोल अभ्यास हवा, व परिश्रम हवेत. अंतःस्फूर्ति व भावना यांच्यावर भर देअून लेखन करणाऱ्या ललित-लेखकांच्या हातीं समाजानेहि पुढारीपण देअूं नये. अंतःस्फूर्ति व भावना यांच्यामुळे सर्वसामान्य नैतिक तत्त्वें आकलन होतात, परंत तत्तत्कालीन अिष्ट धोरणें हीं समाजनेते व समाजशास्त्रज्ञ यांनीच ठरवा-वयास हवींत. ललितलेखकांस फार झाल्यास या नेत्यांनी केलेल्या सुधारणांवर टीका करितां येअील. समाजजीवनांत चुकतें काय, तें सध्या कसें आहे, अेवढें त्यांनी सांगावें. Criticism of life एवढ्यावरच त्यांनी थांबावें, अधिक हाव धरूं नये. अेवढें करणें हेंहि कांही कमी महत्त्वाचें नाही.

**रा. श्री. जो.**

## चरित्र

**१ अेकावली**— (प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी संपादिलेल्या व्यक्तिचरित्रात्मक लेखाचा संग्रह), संपा० व प्रका० डॉ. मा. गो. देशमुख, अेम्.अे., अेल्अेल्.बी., पी.अेच्.डी. विड्ळ (यवतमाळ) मूल्य रु. १॥.

**२ मलिक-अंबर**— ले० व प्रका० श्री. वि. स. वाकसकर, रावपुरा, बडोदें; मूल्य आ. ६.

नागपूरचे प्रा. बनहट्टी यांनी "विहंगमा"दि मासिकांत लिहिलेल्या चरित्रात्मक लेखांचा हा 'अेकावली' संग्रह स्वागतार्ह आहे. तो वाचतांना श्री. देशाअी यांचें 'साहित्य आणि साहित्यिक' व प्रा. सरदार यांचें 'महाराष्ट्राचे अुपेक्षित मानकरी' या दोन पुस्तकांचें सहजच स्मरण होतें. व्यक्ति

जुन्या असल्या व लेख प्रासंगिक असले, तरी लेखक हा जर तत्त्वचिकित्सक असेल तर त्याच्या लेखनाला सार्वकालिक महत्त्व प्राप्त होतें. याचें ठसठशीत अुदाहरण म्हणजे या चरित्र-ग्रंथांतील 'खाडिलकरांची साहित्यक्षेत्रांतील तपश्चर्या' हें प्रकरण. अेकूण दोनशे पृष्ठांच्या या ग्रंथांतील चाळीस पानें या लेखाने घेतलीं असून 'अनंत वामन बरवे' या लेखानेहि तितकीच जागा व्यापली आहे. याशिवाय डॉ. केतकर, अण्णासाहेब किर्लोस्कर, बंकिमचंद्र वगैरेंवेहि परिचय-लेख यांत संग्रहित केले आहेत.

श्री. खाडिलकरांच्या नाट्यलेखनावर कांही टीकाकारांनी टाकीचे घाव अंधपणाने व निर्दयतेने घातल्यामुळे आणि टीकेला तोंड न देण्याचें खाडिलकरांचें व्रत असल्याने त्यांच्या नाट्यलेखनांतील रहस्य अुकलून दाखविणें तरुण पिढीच्या दृष्टीने तरी अवश्य झालें होतें. तें कार्य श्री. बनहट्टींनी आवेशयुक्त भाषेने, विवेचनयुक्त प्रतिपादनाने व आधारयुक्त मांडणीने पार पाडलें आहे. त्यामुळे हा लेख या अेकावळींतील मोत्यांमध्ये मेरूमण्याप्रमाणे शोभतो. "समाज-निष्ठ विचारसरणीचा व राष्ट्रोद्धारक तत्त्वज्ञानाचा तेजोदीप" प्रज्वलित करण्याच्या बाबतींत खाडिलकर शेक्सपीयरच्या पुढे आहेत हें प्रा. बनहट्टींचें विधान सकृद्दर्शनीं अेकांतिक व अति-शयोक्त वाटलें तरी त्यांनी केलेलें विवेचन नीट वाचलें असतां तें विधान यथार्थच असल्याचें पटतें. 'अुग्र असूनहि रमणीय, तत्त्वप्रचुर असूनहि रसाळ व पौराणिक असूनहि अभिनव' अशा प्रसिद्धिविन्मुख खाडिलकरांच्या सुप्रसिद्ध नाट्यसृष्टीचें मूल्यमापन श्री. बनहट्टींनी मोठ्या कौशल्याने केलें आहे.

७५० विठ्ठलमंदिरें बांधणारे ज्योतीपंत महाभागवत, 'झाली राळ अितर नाटकांची' अशा कर्तृत्वाचे किर्लोस्कर, 'समकालीनांनी अभिज्ञता दाखविली नसली तरी खंत' न बाळगतां भवभूतीप्रमाणे अभिमानोद्गार काढणारे डॉ. केतकर वगैरे वाग्भटांच्या साहित्यसेवेच्या सुबक, प्रमाणबद्ध व रमणीय मूर्ति या ग्रंथ-मंदिरांत प्रा. बनहट्टी यांच्या शिष्यवर्गाने मांडून ठेविल्या हे मराठी साहित्यावर खरोखर अुपकार होत.

दा. न. शि.

'बालज्ञानमाला' ही विशेषतः मुलांकरिताच असली पाहिजे. (१) अशा मालेंत मांडावयाचा विषय बराच संपूर्णपणें माहिती असलेला पाहिजे. (२) मुलांना माहीत असलेल्या घडामोडी, नांवें, घटना त्यांत पुष्कळशा असल्या पाहिजेत. (३) विषयाची मांडणी स्पष्ट, संगतवार व आकर्षक पाहिजे. (४) विषय मनावर बिंबविण्याच्या दृष्टीने पुनरुक्ति करावी लागली तरी तिने घोटाळा होतां कामा नये. (५) परस्परविरुद्ध विधानें तर येतांच कामा नयेत. (६) भाषा सोपी, ओघवती व परिचयाची पाहिजे. (७) विषयान्तर फारच थोडें असावें. आणि (८) अेकंदर पुस्तक वाचून मनावर कोणता ठसा अुमटवावयाचा याची लेखकाला पक्की कल्पना असून त्याने ती कल्पना अथपासून अितिपर्यंत सोडतां कामा नये. बालज्ञानमालेंत प्रसिद्ध झालेल्या अेकूण ३८ अैतिहासिक चरित्रांची जी यादी दिलेली आहे आणि त्यांतील १४ मराठी चरित्रांचीं जीं नांवें तींत आलेलीं आहेत तीं पाहिलीं म्हणजे वरील आठ सूत्रांपैकी पहिल्या दोन सूत्रांकडे दुर्लक्षच झालेलें दिसेल. प्रस्तुत चरित्रनायक मलिक-अंबर हा विषय तर अद्यापिहि संशोधनाचा आहे. चरित्रनायकाचा जन्ममुद्दा कल्पित धरण्याची लेखकाला आवश्यकता भासली. यामुळे आणि त्यावरील सर्व साधनें अेकत्र छापलीं तरी देखील प्रस्तुत छोट्या पुस्तकाच्या पृष्ठमर्यादेबाहेर फारशीं जाण्याअितकीं तीं विपुल नसल्यामुळे बालवाचकां-साठी प्रस्तुत विषय निवडणें हीच अेक प्रकारें चूक होय असें आम्हांस वाटतें. हीच गत पुढील

सहाद्रि सूत्रांची झालेली आहे हें प्रस्तुत पुस्तक काळजीपूर्वक वाचणाराच्या ध्यानांत येण्यास वेळ लागणार नाही. प्रस्तुत छोट्या पुस्तकांतील अशा दृष्टीचे प्रमाद दाखवावयाचे म्हटले तर पुस्तकाच्या मानाने फारच मोठा परीक्षणलेख लिहावा लागेल. म्हणून फक्त दिग्दर्शनच करतों. मलिकंबराच्या कामगिरीमध्ये अुत्तरेकडील मोगलांच्या स्वारीविरुद्ध दक्षिणेंतील सर्व शाह्यांची अेकजूट करण्याचा अुद्योग हा दूरदर्शी राजकारणाचा व अनुकरणीय म्हणून मानला गेला आहे. त्याचा आविष्कार या पुस्तकांत झालाच नाही असें म्हणावयास हरकत नाही. 'खैदानमैदान' यासारखे विक्षिप्त शब्द पुनः पुनः वापरले आहेत. भाटवडी व फातखान हे भातवडी व फत्तेखान यांचे मराठी वाचकांना अपरिचित आणि अशुद्धच अुच्चार केवळ भाषान्तरावर भर दिल्यामुळे वापरले गेले आहेत. अद्यापिहि भातवडीचा तलाव स्थानिक वस्तींत लोकप्रसिद्ध आहे व पाहावयासहि मिळतो. चांदबिबीचा खून अेकदा १५९९ (पृ. ६) व दुसऱ्याने १६०० मध्ये (पृ. १५) झाला, अशी विसंगति दहा पृष्ठांच्या आंतच झाली आहे. अप्रस्तुत विषयान्तराबद्दल तर बोलावयासच नको. मराठ्यांच्या गौरवपर अुद्गार झाले तरी ते पुनः पुन्हा गैरसंदर्भात घातल्याने त्यांचा सुपरिणाम तो काय होणार ? पृ. २६ ते ३० वरील न्या. रानड्यांच्या पुस्तकांतला आणि मलिकंबरानंतरच्या कालाला लागू असा प्रदीर्घ अुतारा केवळ पृष्ठसंख्याच फुगवूं शकेल हें अुघड आहे. पृ. ६५ वरील 'निजामुल्मुक' हें नांव वाचून चाणाक्ष मुलें देखील हसूंच लागतील ! संशोधनाच्या दृष्टीचे लपंडाव व अप्रस्तुत अुल्लेख तर मुलांच्या पुस्तकांत वास्तविक नसावे असे पुष्कळच आहेत.

सर जदुनाथ सरकार यांच्या अेका अिंग्रजी लेखांत आलेली माहिती मराठींत आणण्याची कामगिरी या ग्रंथांत कांहीशी झाली आहे हा या पुस्तकाचा विशेष आहे. सिंहावलोकन हें शेवटचें प्रकरण मांडणी व भाषा या दृष्टीने त्यांतल्या त्यांत चांगलें आहे. अशीच सरणी सर्वत्र अवलंबिली असती तर आहे त्या ज्ञानाच्या परिस्थितींत प्रस्तुत पुस्तक मुलांना नाही तरी प्रौढ जिज्ञासूंना संकलनाच्या दृष्टीने अुपयोगी पडण्यासारखें होतें. अेखादें विचित्र वाक्य सोडलें तर श्री. वाकसकरांची भाषा विशेष आकर्षक नसली तरी बहुधा छोट्या वाक्यांमुळे सुबोध वाटते.

## काव्य

**आलाप आणि विलाप**—ले० बी. रघुनाथ; प्रका० श्री. मा. वि. पाठक, दीप-प्रकाशन, परभणी; मूल्य आ. १०.

हा बी. रघुनाथ यांचा काव्य-संग्रह रसिकांना – विशेषतः राजकवि कविवर्य ताम्ब्यांच्या भक्तांना – आकर्षक वाटेल.

कुटिला ! भडकवुनी जीवनभर
देशील घनतमीं भिरकावुनी

या आडबाजूच्या दोनच ओळी वाचल्या तरी बी. रघुनाथांच्या काव्यप्रांतांतील कोनाकोपरे 'भास्करां'च्या काव्य-किरणांनी कसे अुजळले आहेत हें दिसेल. 'धुळ' (पृ. २२) असा शब्द शेवटीं आणून त्याचा बेंगरूळ अुच्चार करण्यास भाग पाडणें काव्यसौंदर्यास हानिकारक आहे. बी. रघुनाथ यांची काव्यात्मवृत्ति विकास पावली तर याहून सरस कवितांचे लेणें ते महाराष्ट्र-शारदेवर चढवूं शकतील. राजकवि यशवंत यांनी प्रस्तावनेंत त्यांना केलेला अुपदेश त्यांच्या-अितकाच नवोदित सर्व कवींनी लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

**गो. ग. त.**

## नाटक

**नाटिका नवरत्नहार**—लें० व प्रका० अनंत हरि गद्रे, गोरेगांवकर्स बिल्डिंग्ज, चाळ नं. ६, गिरगांव, मुंबअी नं. ४; मूल्य रु. २.

नांवावरून सूचित होतें त्याप्रमाणे या "नाटिका नवरत्नहारां"त श्री. अनंतराव गद्रे यांच्या नअू नाटिका संग्रहित केलेल्या आहेत. त्यांपैकी सात "अेक ऑगस्ट १९३० पासून अेक ऑगस्ट १९३१ पर्यंत अेका वर्षांत" लिहिलेल्या असून या नअुहि नाटिकांचे "अखिल महाराष्ट्रांत शेंकड्यांनी प्रयोग झालेले आहेत." श्री. अनंतराव गद्रे यांची धडाडी आणि तडाखेबंद लेखन व प्रचार यांचें मूर्तस्वरूप म्हणजे हा नाटिका नवरत्नहार होय. 'अच्युता'च्या चरणीं या शीर्षकाखाली श्री. अनंतराव गद्रे यांनी आपले नाटिकालेखन व आपला नाटिका संप्रदाय यांबद्दल जी माहिती दिली आहे ती वाचनीय असून मराठी रंगभूमीच्या तत्कालिन परिस्थितीच्या अितिहासाच्या दृष्टीने अुपयुक्त व अुद्बोधक अशीच आहे. यामुळे मुंबअी येथील बत्तिसाव्या नाट्यसंमेलनाच्या प्रसंगीं श्री. अनंतराव गद्रे यांनी आपल्या या नाटिका नवरत्नहाराचें प्रकाशन केलें ही गोष्ट औचित्यपूर्णच झाली. पुस्तकाच्या सुमारे पावणेचारशे पृष्ठसंख्येच्या मानाने २ रुपये ही किंमत अत्यंत माफक आहे.

के. ना. का.

## कादंबरी-लघुकथा—

**१ अपुरा डाव**— लें० श्री. द. र. कवठेकर; प्रका० देशमुख आणि कंपनी, २६४ नारायण पेठ, पुणें २; मूल्य रु. २॥.

**२ चंपी आणि मोत्या**— प्रका० श्री. म. म. केळकर; मनोहर ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. १॥.

**३ जिवलग**— लें० श्री. दा. न. शिखरे; प्रका० श्री. य. गो. जोशी, ६२३/१५ सदाशिव पेठ, पुणें २; मूल्य रु. १॥.

**४ निर्माल्यांतील देव**— लें० श्री. पां. गो. लोहोकरे; प्रका० श्री. हे. ग. करमरकर, २० नारायण पेठ, पुणें २; मूल्य रु. १।

**५ वज्राघात**— (संक्षिप्त आवृत्ति) संपा० श्री. वि. अ. पटवर्धन; प्रका० श्री. वि. ह. बर्वे, आर्यभूषण मुद्रणालय, पुणें ४; मूल्य आ. ८.

**६ अशोकाचीं पानें**— लें० श्री. कृष्णाकुमार; प्रका० श्री. ग. ना. अंबेकर, गोदावरी प्रिंटिंग प्रेस, नांदेड; मूल्य रु. १॥.

**७ अुपेक्षितांचें अंतरंग**—लें० व प्रका० प्रो. श्री. म. माटे, पुणें २, मूल्य रु. १।॥.

आपल्या समाजांतील पांढरपेशा वर्गांत नव्या विचारांचें व आचारांचेंहि महत्त्व दिवसेंदिवस वाढत चाललें आहे. 'नव्या' या शब्दाने निश्चित काय म्हटलें जातें तें सांगणें कठीण आहे; परंतु जुन्यापेक्षा, रूढापेक्षा कांहींतरी निराळें अेवढें मात्र निश्चित. अेकंदर समाजाच्याच पुनर्रचनेची आवश्यकता निरनिराळ्या अनुभवक्षेत्रांत भासूं लागली आहे, आणि थोडीफार सुरुवातहि कोठे कोठे झाली आहे. डोळ्यांत मरण्यासारखी किंवा डोळ्यांवर येण्यासारखी सुरुवात वैवाहिक आचारांत होत आहे. आजपर्यंत स्त्रीविषयी सर्वसाधारण पुरुषांचा दृष्टिकोन विकृत असल्यामुळे विवाहपूर्व व विवाहोत्तर जीवनांत त्यांची जी कुचंबणा होत असे

ती दूर करण्याचे कांही प्रयोग प्रत्यक्षांत व बरेंचसे वाङ्मयांत ऐकूं येतात. आणि त्या प्रयोगांनी कित्येकांच्या वैवाहिक जीवनाचे अपुरे आणि कुजलेले डाव पुन्हा रंगरूप धारण करूं लागलेले दिसतात. हे प्रयोग पुष्कळसे शिकलेल्या स्त्रीपुरुषांत चाललेले दिसतात. आपल्या मनाजोगी वैवाहिक घटना घडवून आणण्यासाठी किंवा अन्याय होऊन चुकला असल्यास हातीं लागलेल्या दुरुस्तीचा मार्ग स्वीकारण्यासाठी जें कर्तृत्व लागतें तें पुष्कळांच्या ठिकाणीं दिसूं लागलें आहे. सहवासोत्तर विवाह, प्रेमविवाह, द्वितीयविवाह, पुनर्विवाह, आंतरजातीयविवाह अित्यादि प्रकारांनी आता समाजांत फारशी गडबड अुडत नाही. परंतु फक्त सुशिक्षितांतच दिसणारें वैवाहिक असमाधान याहून जास्त व्यापक आहे, ही गोष्ट श्री. दत्त रघुनाथ कवठेकर यांची 'अपुरा डाव' ही कादंबरी वाचून आपणांस कळेल. असमाधानाची, अन्यायाची, असंतोषाची ओळख होण्यासाठी शिक्षणाचीच कांही जरूर आहे असें नाही. शिक्षणापूर्वी जन्माला आलेले कांही अन्याय व दुःखें आहेत त्यांपैकी वैवाहिक अन्याय व तज्जन्य यातना हीं होत. शिक्षणापूर्वी 'हें असेंच चालायचें' असें दैववादाचें पाठबळ या अन्यायांना असे. शिक्षणाने तें पाठबळ काढून घेतल्याने त्या अन्यायाला वाचा फुटली. मीना ही वास्तविक आधुनिकांत मोडेल अशी तरुणी नाही. तिचा नवरा तर कोणत्याहि अर्थाने आधुनिक नाही. तरी आपल्या बाबतींत चाललेला वैवाहिक अन्याय हा अन्याय आहे याची जाणीव मीनाला झाली. हा अन्याय म्हणजे अेक विधिघटनाच होय. लग्नापूर्वी मीना रेखीव व बांधेसूद होती. पण तिला गोरेपण नव्हतें व घरचें दारिद्र्य. यामुळे तिचा विवाह मोठ्या कष्टाने अेका व्यवहारी माणसाशीं झाला. आणि विवाह झाल्यावर तिला देवी आल्या !! ती विद्रूप झाली आणि नुसत्या वैवाहिक व्यवहारांतहि ती टाकावू ठरली. ती सासरीं राहत होती पण तिचा विद्रूप चेहरा नवऱ्यास नको असल्याने पतिसहवासास ती पूर्णपणें मुकली; कारण तिच्या नवऱ्याने अत्यंत शांतपणें तिला बाजूस लोटलें आणि आपला मार्ग मोकळा करून घेतला.

तिचा नवरा तिला मारण्यासाठीहि जवळ येत नव्हता. ती दुर्दैवी सुभगा होती! तरी तिला शाळेंत जायला मात्र परवानगी मिळालेली दिसते! शाळेमुळे नैसर्गिक विकारांचा थोडासा विसर पडे. परंतु शरीर वाढत होतें तसतसा विकारांचा दाब वाढूं लागला. आणि त्यांत कादंबऱ्या– वास्तववादी कादंबऱ्या वाचण्यांत आल्या! तिने तसलें कांही वाचायचें नाही असें ठरवलें. पण तेवढ्यांत समोरच्या खोलींत राहणारा तिच्या वडिलांच्या मित्राचा मुलगा मनोहर वावीकर तिच्या घरीं आला. प्रथमदर्शनीं जें होतें तें झालें. मीनाला तें कळलें नाही. मनोहरला मात्र तें कळलें. त्या पेटलेल्या जगांत मनोहर अेवढा अेकच प्राणी तिच्याविषयी सहानुभूति दाखवीत होता. तिचें मन मनोहराभोवतीं रंगूं लागलें–गुंगूं लागलें. आणि गुंगी अुतरल्याबरोबर ती दचकून म्हणे, "वाअीट, वाअीट–अगदी वाअीट !!!" आणि पुन्हा दुसरें मन पहिल्या मनाची समजूत करी, "त्यांत काय आहे?" अशा रीतीने मनोहरने जाणूनबुजून मीनाशीं परिचय वाढविला मीना नकळत (?) मनोहरच्या प्रयत्नाला अुत्तेजन देत होती. तिच्या मनाचा गोंधळ चालूच होता. आणि शरिराची ओढहि चालू होती. तिच्या बाअी तिला मधून मधून सावध करीत, पण मनोहर पाहिला की तिचें भान सुटे. मनोहराबरोबर बरेंच वाहवत जायचें आणि मध्येच दचकून ताडकन् अुठून चालूं लागायचें असें तिचें चाललें होतें. 'मी लावतें अं निरांजन' ही श्री. दत्त रघुनाथ कवठेकर यांची गोष्ट तिच्या वाचण्यांत आली आणि बाअींचा अुपदेश अैकल्यावर मनोहराविषयी आकर्षणांत पाप आहे हें तिला कळलें! मनोहरच्या वागण्यांत वास्तविक अितकी सलगी स्पष्ट अनुभवास येत असतांना त्या सलगीचा

अर्थ – हेतु – पर्यवसान मीनाला अितक्या अुशिरा कळावा हें या कादंबरीतलें अेक गूढ आहे ! तें पाप आहे कीं नाही हा प्रश्न निराळा. पण त्याचें पर्यवसान काय आहे याविषयी संशय असण्याचें कांहीच कारण नाही. परंतु लेखकाने पृ. १३८ पर्यंत मीनेस या गोंधळांत ठेवलें आहे. वास्तविक शील, पाप या कल्पना मीना ज्या सामाजिक वातावरणांत वावरत होती त्या वातावरणांत अतिशय परिचित असतात. असले विवाहबाह्य संबंध अव्यहार्य आहेत हा आणखी अेक या प्रश्नासंबंधीचा विचार आहे. परंतु लेखक सांगतात: जीवापेक्षाहि शीलाची मातब्बरी अधिक असते, असावी अशा 'सामान्य' समजुतीची ती अेक मुलगी होती: (पृ १३८). तरी तिला ती गोष्ट मनोहरशीं अितका दीर्घ सहवास होअूनहि समजूं नये हें पटत नाही. मन अनावर होणें, अेखादी गोष्ट पाप आहे हें कळूनहि मनानें नि शरीरानेहि तिकडे धाव घेणें ही गोष्ट शक्य आहे. पण तें पापच नाही, त्यांत काय आहे असें वाटणें, हें फार असामान्य अज्ञान आहे ! तरी अेका पाचकळ माणसाच्या श्रीमुखांत भडकावण्याअितकी ती लग्न **होण्यापूर्वीच** जागृत होती ! (पृ.१३९). असो. ती गोष्ट वाचल्यापासून नि बाअींचा अुपदेश अैकल्यापासून 'तें' पाप आहे अशी तिची खात्री पटली आणि ती मनोहराला टाळूं लागली. तरी तिच्या मनाची ओढ मात्र कायम होती. आणि मन असें कां करतें ? या प्रश्नाचा तिला त्रास होअी. ती वासनांच्या माराव्याने विवश आणि असहाय झाली होती आणि तो प्रश्न सोडविण्याची तिच्यांत कुवत राहिली नव्हती (पृ. १५३). लेखक या ओढीला, तळमळीला प्रेम म्हणत नाहीत, वासना म्हणतात, हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. पतिप्रेम, पतिसहवास हें मिळालें नाहीं, पण निदान मूल झालें तर बाळाकडे पाहून तरी मन शान्त होअील असें तिला वाटे. मनोहरच्या सहवासाच्या अनेक अवस्थांतून गेल्यावरहि (पृ. १६३ वर लेखक म्हणतात—) तिचें मन अजूनपर्यंतहि पतिदेवाच्या अंवतीभोंवतीं घोटाळत होतें. आणि त्याच **मनांत** पतिशेजारीं मनोहर दत्त म्हणून अुभा राही. पतीनें विषयवासनेसाठी तरी आपल्याला जवळ करावें असें वाटूं लागण्याअितकी ती चिडून गेली. आणि आपल्या पतीकडून निदान शरीराचें सुख मिळविण्याचा हक्क मिळवावयाचाच असा तिने निश्चय केला. वासनापूर्ति करून घेण्याचा 'मनोहर' पंथहि तिला खेचीत होता. परंतु तेवढ्यांत तिची मैत्रीण मेणोलीकर हिचे अनुभव तिला कळले. द्रौपदी ही पतिव्रता होती. देह जाळून पवित्र करण्याअितकें तिच्यांत तेज होतें हें तिला कळलें. आणि तें तेज असेल तरच पांचालीपंथ स्वीकारावा अित्यादि विचार लेखकाने शिवराम महादेव परांजपे यांच्या लेखांतील अुतारे देअून पटविलें आहे ! परंतु तिच्या मनांत विकारांचा वडवानल पेटावा अशींच दृश्यें तिला दिसत आणि शेवटीं पुन्हा अेकदा ती मनोहराच्या खोलींत गेली. मनोहर तापाने फणफणत होता ! तिचें मन तळमळत होतें तरी तिने त्याला खेचून बाहेर काढलें. 'भुकेच्या पोटीं' ही कादंबरी लिहिणाऱ्या लेखिकेला तिच्या बाअी चिडून सांगत होत्या– शरीरसुखासाठी घरांतून बाहेर पडलेल्या स्त्रिया सुखी झालेल्या तूं कधी पाहिल्यायस् ? पुन्हा तिने निश्चय केला आणि पुन्हा मनोहराकडे जाअून तो निश्चय मोडला. मनोहराने प्रेमाचा अुच्चारहि केला ! पण मनोहरपासून दूर झाली की तिचें हिंदु मन तिला खायला अुठे. अनंत कालापासून हिंदु स्त्रीच्या मनावर झालेले अुच संस्कार तिच्या सत्त्वशील मनाला किती क्लेश देत ! (पृ.१९६). मीनासारख्या अुफाड्याच्या अस्पृष्ट तरुण मुलीचे (पृ.१९७) हे हाल लेखकाने सहृदयपणें वर्णन केले आहेत. पतीच्या तिरस्कारानंतर तिला पतिसुख ओंगळ वाटूं लागलें (पृ.१९९). पाप-पुण्यांतील फरकहि तिला आता (?) कळूं लागला होता (पृ.२००). पुरुषसत्ताक राज्यपद्धतीचा अुदो अुदो करणाऱ्या धर्मग्रंथांवर

ती चिडे आणि अिकडे ते संस्कार ! कशी सुटणार ती यांतून ? मनोहराने सोडवलें तिला. तो ती समोरची खोली सोडून जाअूं लागला. कारण मीनेची आत्मार्पण करण्याची तयारी नाही हें त्याला कळल्यावर त्याने मग तो निष्काम कर्मयोग सोडावयाचें ठरवलें. मनोहर खोली सोडल्या-वर राममंदिरांत भेटूं लागला आणि तिच्या पाठीवर आपल्या पाठीला आधारवत भावविवश-तेंत बोलत बसूं लागला (पृ. २०६). पतीकडून मातृत्वापुरता तरी हक्क मिळवावयाचा अशी तिची खटपट चालूच होती. त्याने 'नादनिनाद' वाचावें म्हणून तिने प्रयत्न केला. अेक दिवस बंडोपंत (पति) 'मी लावते अं निरांजन' हीच गोष्ट वाचीत होते हें पाहून तिला हुरूप आला. समोरच्या वाड्यांतल्या अेका खिन्हाडीं तिला रात्रीच्या वेळीं पतिपत्नीच्या अुत्कट, गाढ अेकान्ताचीं कांही दृश्येंहि दिसलीं; पण त्याच वेळीं तिच्या अंतरीचें सात्त्विक प्रेम जागें झालें. ती नाथाच्या खोलींत गेली आणि त्याच्या पायाला पहिला चरणस्पर्श केला. पुरुषाच्या स्पर्शाचा गोडवा तिला पहिल्यानेच (?) अनुभवास आला. मनोहरच्या स्पर्शांत तसें कांहीं नव्हतें. तेथें भीति, पाप वगैरे रुखरुख होती.

पतीच्या चरणाचें चुंबन घेअून तिने त्यापासून संभोग मिळविण्याची तयारी केली. अितक्यांत तिला गुरुचरित्रांतील अध्याय ३१ ओव्या ३६ व ३७ आठवल्या. आणि गुरुचरित्राच्या आधारें तिने अुरोज अनावृत करून मग शयन केलें. गुरुचरित्राचा हा अुपयोग पाहून अंध-श्रद्धानुयायी माणूस सुद्धा दचकल्याखेरीज राहणार नाही. पतीविषयी तिला भलतेंच प्रेम वाटूं लागलें. त्याचे अपराध तिने पोटांत घातले आणि त्या शांत मनःस्थितींत पतीची वाट पाहत असतां तिला झोप लागली. वासनापूर्तीसाठी अस्वस्थ झालेलें मन पतीच्या खोलींत असल्याने शांत झालें. व्यावहारिक सुरक्षिततेपलीकडे त्या शांततेत कांही अर्थ आहे असें आम्हांस वाटत नाही. मनोहराच्या सहवासांत तिचें 'जुनें' मन शांत झालें नाही. तें पतीच्या बाबतींत झालें. त्यांत पतीविषयी अेकदम भक्ति, प्रेम, आदर अित्यादींचा अुमाळा या गोष्टींचा लेखकाला भास झाला आहे. मनोहराशीं अंगोपांगीं सलगी करणारी व करूं देणारी स्त्री पुन्हा पतिभक्तीवरहि हक्क सांगते यांत, ज्या अनादि सनातन हिंदु संस्कृतीचा नमुना म्हणून लेखकाने मीना रंगवली आहे त्या संस्कृतीचें विडंबन आहे असें वाटतें. खरी हिंदु स्त्री पुरुषाच्या मनाचा अेका क्षणांत ठाव घेते. हें काय ? यांत काय ? असा तिचा गोंधळ होत नाही. असो. पतिसुखासाठी व्याकुळ झालेल्या मीनाला त्या दिवशींहि छळच सोसावा लागला. तिचा शुंभ पति शुंभच राहिला ! तिला आत्महत्या करावीशी वाटली. ती रामाच्या देवळांत गेली. तेथे पाहते तों पुन्हा मनोहर ! त्याच्या डोळ्यांत तिला पाप स्पष्ट दिसलें. ती पुन्हा पतिदेवाकडे आली. आणि तिने त्या देवाला आळविण्यास सुरवात केली ! तो पतिदेव दगड असल्याने तो बोलणें शक्य नव्हतें. मनोहराकडे तिची असणारी ओढ ही केवळ शारीरिक होती. अतृप्त वासनांचा आवेग तिला तिकडे खेचीत होता. पण त्या वाटेंत पाप या कल्पनेचें भूत अुभें होतें. तेव्हा कायमचा सह-वास राहो, पण निदान अेखाद्या अपत्यप्राप्तीअितका जरी पतिसहवास मिळाला तरी आपलें अतृप्त शरीर आणि अनावर मन शांत होअील असें तिला वाटे. परंतु तेवढेहि क्षण पतीकडून मिळाले नाहीत. निदान स्त्रीत्वाच्या वासनेच्या जोरावर तरी पतीला संतुष्ट करावें हाहि डाव फसला. अशा स्थितींत त्या अस्पष्ट, अतृप्त अभागी सुभंगेने काय करावें असा प्रश्न लेखकाने अुत्पन्न करून कादंबरी संपवली आहे. सामान्य समजुतींच्या अतृप्त पत्नीचे या समाजांत कसे हाल होतात तें लेखकाने अतिशय मार्मिकतेने दाखविलें आहे. ती अतृप्ति मनोहरासारख्या तरुणाच्या सहवासाने अतिशयच तीव्र होते. आणि पापाला घाबरणारें मन जास्तच व्याकुळ होतें. विवाह-

बाह्य संबंध पत्करतां येत नाहीत आणि वैवाहिक संबंध कायमचे तुटलेले असें मीनाचें जीवन आहे. त्या जीवनाचा अपुरा डाव कसा संपणार ?

वासनापूर्तीसाठी होणारे अेका स्त्रीचे हाल वर्णन करतांना श्री. कवठेकर यांनी केलेलें मनोविश्लेषण अत्यंत सूक्ष्म आहे आणि त्यांत प्रशंसनीय संयम दाखवल्याने तें विश्लेषण अतिशय अुद्बोधक झालें आहे. मीनाच्या मानसिक अवस्थांचें विवरण सर्वमान्य आहे परंतु त्यावरील लेखकाचें भाष्य पटत नाही. मीनाचें स्वभावचित्र हें जगप्रसिद्ध हिंदु स्त्रीमनाचें, हिंदु संस्कृतीचें प्रतीक आहे हा त्यांचा वेडा हट्ट आहे. मनोहराकडील ओढ व पापपुण्याच्या कल्पना यांच्या तेढीमध्ये पतिसहवास ही अेकच 'सोय' होती. त्यांत भक्तीचा, पावित्र्याचा वगैरे कांहीं संबंध येत नाही. ती अेक व्यवहार्यतेची जाणीव आहे. असें मीनाच्या वाबतींत वाटतें ! वैवाहिक असमाधान दूर करण्याच्या मनोहरपंथाचें स्वरूप वर वर विलोभनीय वाटलें तरी तें किती अव्यवहार्य आहे, तो मार्ग नव्हे हें दाखविण्यावर लेखकाने भर दिला असता तर हीच कथा याहून जास्त परिणामकारक झाली असती आणि मीनाविषयी जास्त सहानुभूति वाटली असती. कादंबरींतील पत्रें हा श्री. कवठेकर यांच्या प्रतिभेचा नवा विलास आहे. त्याबद्दल त्यांचें स्वतंत्र अभिनंदन केलें पाहिजे.

वर सांगितलेल्या मनोहरपंथाचें अेक स्वरूप 'चंपी आणि मोत्या' या कादंबरींत दाखविलें आहे. आधुनिकतेच्या नांवाखाली कांहीं विद्वान् सुशिक्षित कुमारिकांना नादीं लावतात, आधुनिकतेच्या विकृत कल्पनांनी चंपूताअीसारख्या प्रौढ कुमारी स्वैराचारालाच स्वातंत्र्य आणि सुधारणा समजतात परंतु शेवटीं आपल्या समाजांत पुरुषाचा भोंदूपणा पचतो. स्त्रीला मात्र त्याच्याबरोबर टिकाव धरतां येत नाही आणि त्यांचें जीवन ना कुमारिका, ना माता, ना गृहिणी, ना वेश्या असें होतें असें अत्यंत विदारक चित्र या कथेंत रेखाटलें आहे. आधुनिकतेच्या नांवाखाली आपल्या सामाजिक प्रतिष्ठेच्या जोरावर प्रच्छन्नपणें व्यभिचार करीत राहणारे लोक हे पशूपेक्षाहि नीच आहेत, हें दाखविण्यासाठी लेखकाने चंपी आणि मोत्या या श्वानकोटींतील जोड्यांचें जीवन या कथेंत मानवांच्या जीवनाबरोबर दाखविलें आहे. ही रूपककथा नाही. 'साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः' अशा कोटींतील माणसें स्पष्ट दिसण्यासाठी चंपी आणि मोत्या यांचें जीवन पार्श्वभूमीसारखें अुपयोगी पडतें. अशा व्यभिचारपर विद्वानांच्या, शिष्टांच्या जाळ्यांत सांपडणाऱ्या चंपूताअीसारख्या कुमारिकांना जागें करावें व त्यांच्या जीवनाविषयी आकर्षण वाटणाऱ्यांना सावध करावें असा लेखकाचा हेतु दिसतो. तो साध्य होणें न होणें यावर या कथेचें यश अवलंबून नाही. तर लेखकाची चीड वाचकांस पटणें, तसला भोंदूपणा चालूं देणें हें सामाजिक दृष्ट्या धोक्याचें आहे अित्यादि विचारांची जाणीव होणें यावर या कथेचें यश अवलंबून आहे. ओघवती भाषा, तडफदार विचारसरणी व या प्रश्नाकडे पाहण्याची सामाजिक दृष्टि हीं या कृतींत असल्याने वरील यश लेखकास नक्की मिळेल असें वाटतें. प्रकाशकांनी लेखकाचें नांव गुप्त ठेवण्यांत कांहीहि योजलेलें असो, आपल्या वाचकवर्गात मात्र अेक मलतें कुतूहल अुत्पन्न झाल्यावांचून राहणार नाही.

'वंदे मातरम्' या पदाविषयी पूर्वी जी परिस्थिति होती त्या परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर 'जिवलग' ही कादंबरी लिहिली आहे. वंदे मातरम् कॉलेजांत, निमसरकारी कॉलेजांतहि, म्हणणें धोक्याचें असल्याने अेका विद्यार्थ्याने अेका समारंभांत प्रिन्सिपल्च्या अवकृपेची पर्वा न

करतां तें राष्ट्रगीत म्हणावयास सुरुवात केली. प्रिन्सिपलने ताबडतोब त्यास कॉलेजांतून काढून टाकलें; तोहि मोठ्या धैर्यानें बाहेर पडला. या घटनेसाठी या कादंबरीस वंदे मातरम्विषयक कादंबरी असें दुसरें नांव दिलेलें दिसतें. कादंबरींतील दुसरी घटना या घटनेपेक्षा जास्त महत्त्वाची दिसते. यशोदा ही गरीब विधवा अेका अुमद्या गृहस्थाच्या आश्रयास असतांना तिला त्याच्यापासून रघुनाथ नांवाचा मुलगा होतो. तो मुलगा अनाथालयांत पोचवून तो बाजूस होतो. रघुनाथ अतिशय हुशार निघतो. आपल्या कलंकित जीवनामुळे त्याच्या जीवनाची कुचंबणा होअूं नये यासाठी ती त्याला अज्ञात राहून त्याचा वाढता लौकिक अैकत असते. तिचा प्रियकर, रघुनाथचे वडील कोठे आहेत हें तिला माहीत नसतें. ते गृहस्थ म्हणजेच वर सांगितलेले कॉलेजचे प्रिन्सिपल्. अत्यंत थोर मनाचा परंतु यशोदा निघून गेल्यापासून अत्यंत अुद्विग्नपणें जगणारा असा तो गृहस्थ आहे. योगायोगाचें पाठबळ या कामीं बरेंच असल्याने रघुनाथाचे अज्ञात वडील हेच कॉलेजचे प्रिन्सिपल असतात. अेका मारामारींत रघुनाथ जखमी झाल्यानें प्रिन्सिपल त्याला शुश्रूषेसाठी बंगल्यावरच ठेवतात. त्यांचें त्याच्यावर 'पुत्रवत्' प्रेम असतें.

यशोदा ज्यांच्याकडे स्वैपाकीण म्हणून काम करते ते गृहस्थ व त्यांच्या पत्नी या सार्वजनिक सभासमारंभाविषयी हौस असणारे सुखवस्तु लोक असतात. ते गृहस्थ नेमके वरील कॉलेजच्या अेका वादविवादसभेचे अध्यक्ष म्हणून येतात. त्याच दिवशीं मारामारी होते. आणि रघुनाथ हा विद्यार्थ्यांचा पुढारी त्या मारामारींत सांपडून जखमी झाल्याचें कळून सभा तहकूब होते. पुढे बरा झाल्यावर त्याच्या धैर्याचें अभिनंदन करण्यासाठी प्रचंड सभा होते त्याचे ते गृहस्थ अध्यक्ष होतात. यशोदेला हें कळतें. त्या सभेस जाण्यासाठी तिचा जीव अधीर होतो. शेवटीं आपल्या मालकांच्या परवानगीची पर्वा न करतां ती त्या समारंभास जाते. तोंच रघुनाथाला वंदे मातरम् म्हटल्याबद्दल कॉलेजांतून काढून लावल्याचें तिला कळतें. ती रात्रभर तळमळत शोध करते. रघुनाथ भेटतो. तीं दोघें अेकत्र राहतात. रघुनाथने काढलेल्या लाटी क्लासच्या अेका समारंभाचे अध्यक्ष म्हणून प्रिन्सिपल् येतात आणि बाप, आअी व मुलगा हे शेवटीं अेकत्र येतात ! असें हें कथानक आहे. यांत प्रिन्सिपल् व यशोदा यांचें स्वभावचित्र अत्यंत परिणामकारक झालें आहे. वरकरणीं अत्यंत शांत दिसणाऱ्या प्रिन्सिपल्च्या जीवनांतील कारुण्य व वैराग्य मोठ्या बहारीच्या रचनाकौशल्यानें दाखविलें आहे. यशोदेचें जीवन हें अेक चिरस्मरणीय चित्र आहे. आपल्या मुलाच्या जीवनाची वाट निर्वेध करण्यासाठी तिनें स्वतः पत्करलेला अज्ञातवास आणि त्यांत मुलाच्या भेटीसाठी अहोरात्र तळमळणारें तिचें मन यामुळे तिच्याविषयी वाचकांच्या मनांत अुच्च प्रकारची सहानुभूति अुत्पन्न होते, प्रणयप्रसंगाची लालूच न दाखवितां तरुणांचें स्वभावचित्र हृद्य होअूं शकतें याचा रघुनाथ हा अेक नमुना आहे. दमयंती व दत्तोपंत ही मंडळी केवळ लुडबुडणारी असली तरी त्यांचा सहवास वाचकास असह्य होत नाहीं. लेखकानें आपला विशिष्ट राजकीय दृष्टिकोन, विशेषतः हिंदी राजकारणांतील यावनी प्रश्नाविषयींचीं मतें कादंबरींत सांगितलीं आहेत. तीं मतें समर्थनीय ठरण्यासारखे प्रसंग अुत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे. तरी त्या प्रसंगांतहि त्या प्रश्नांचें स्वरूप कांहींसें अेकांगी झालें आहे. त्या प्रश्नाच्या अितर बाजू आहेत. त्यांना लेखक फारसें महत्त्व देत नसावेत. हृदयपालट करण्याच्या प्रयोगानें हिंदु मुसलमानांतील तेढ तुटेल हा विश्वास अलीकडल्या अनुभवांनी कांहींसा डळमळला आहे, हें लेखकानें लक्षांत घेतलें पाहिजे. श्री. दा. न. शिखरे हे नुसते ललितलेखक नाहींत. राजकीय कार्यक्षेत्रांतले ते अेक विचारी कार्यकर्ते आहेत. लेखन हें त्यांच्या कार्याचें माध्यम आहे; ध्येय नाही. राजकीय वातावरणांतील नव्या नव्या समस्यांचें विवरण करण्यासाठी ललितवाङ्मयाचा ते

अुपयोग करतात. ही त्यांची भूमिका लक्षांत ठेवूनच त्यांचें ललितलेखन वाचलें पाहिजे. त्यांच्या लेखनांत कलेपेक्षा विवेचनास जास्त महत्त्व आहे. या दृष्टीने त्यांच्या 'जिवलगा'चें मराठी वाचक रासिकपणें स्वागत करील यांत शंका नाही.

विवाहसमारंभांत कांही भांडणें झाल्यामुळे टाकून दिलेली पत्नी वास्तविक निर-पराधी आहे असें पतीच्या लक्षांत आल्यावर त्यांनी तिला आश्रय दिला. अितकेंच नव्हे तर परित्यक्ता असतांना तिच्या असहायतेचा फायदा घेअून अेका श्रीमंत आश्रय-दात्याने तिचें शील भ्रष्ट केलें हें कळूनहि त्याने तें मनावर घेतलें नाही. फार काय त्या विवाहसंबंधापासून झालेल्या मुलामुळे तिचा छळ होत आहे हें कळल्यावर त्या मुलासहि आपला मुलगा म्हणून श्री. शांताराम अुर्फ आबासाहेब यांनी आश्रय दिला. अितकें औदार्य असलेला पति हा स्वतःच अेक देवमाणूस आहे. आणि त्यांची पत्नी ही चुकून निर्माल्यांत पडलेली देवता आहे. अक्काच्या दडपणामुळे पत्नीचा आपण त्याग कसा केला, ती नंतर आत्महत्या करीत असतां आपण तिला कशी वांचवली, तिच्या हातून झालेल्या अपराधांची तिला जाणीवहि न देतां तिचें मन मोकळें करण्याचे आपण कसे प्रयत्न केले आणि तरीहि तिचें अेकदा खुरटलेलें जीवन शेवटीं संकोचतच जाअून निर्माल्यवत् कसें झालें ही हकीगत पतीनेच आपल्या मुखाने सांगितली आहे. आपल्या पत्नीवर झालेल्या अन्यायाची हकीगत सांगतांना, समाजांत संभावित-पणाच्या रूढीच्या संरक्षणाखाली खरे बदमाष कसे सुरक्षित राहतात हें लेखकाने ठिकठिकाणीं दाखविलें आहे. त्यांत संभावितांचीं नीच कृत्यें माहीत असलेलेहि संभावितपणा म्हणूनच गप्प बसतात. आणि अशा रीतीने अन्याय आणि अरेरावी हीं राजरोसपणें चालू राहतात अित्यादि विचार या आत्मकथेंत आले आहेत. कथाप्रसंगांत कांही ठिकाणीं असंभाव्यता आली आहे आणि प्रसंगावरील भाष्यांत बरीचशी द्विरुक्ति आहे. आत्मनिवेदनपद्धतीच्या लेखनांत कंटाळवाणेपणा अुत्पन्न होण्याचा फार संभव असल्याने तेथे लेखकाच्या रचनाकौशल्याची खरी कसोटी असते. ही कथा त्या कसोटीवर कांहीशी अुतरते यांत शंका नाही. परंतु अशा प्रसंगांत जेवढी अुत्कटता असावयास पाहिजे तेवढी सर्वत्र नसल्याने ही कथा कांही ठिकाणीं कंटाळवाणी होते. श्री. लोहोकरे यांच्या लेखनांत सामाजिक अन्यायांच्या स्वरूपाची जाणीव करून देण्याचा मुख्य हेतु असतो तो 'निर्माल्यांतील देव' या कादंबरींतहि व्यक्त झाला आहे.

मराठी वाङ्मयांतील महनीय लेखकांना शालेय जगांत अद्याप अुताऱ्यापलीकडे फारसें स्थान मिळालें नाही. मराठीला मान देतां देतां विश्वविद्यालयाने अवहेलनाच चालविली आहे. परंतु मराठीचे अभिमानी विश्वविद्यालयांत जास्त जास्त सत्ता मिळवूं लाग-ल्याने हे दिवस लवकरच जातील असें वाटतें. त्यांच्या प्रयत्नांस ग्रंथनिर्मात्यांनी साहाय्य केलें पाहिजे. हरिभाअू आपटे यांच्या कादंबऱ्यांच्या शालेय आवृत्त्या हा अेक अशा तऱ्हेचा स्तुत्य प्रयत्न आहे. विद्यार्थ्यांना देण्याजोगीं मराठींत पुस्तकेंच नाहीत अशा सबबीवर आपला विकृत दृष्टिकोण झाकणाऱ्यांना आता अशा सबबी सांगतां येणार नाहीत. 'वज्राघात' या कादंबरींतील मूळ भागांतील जोम कायम ठेवून, कथासूत्रास धक्का न लावतां हें संक्षिप्त स्वरूप दिलें आहे. मूळ लेखनापेक्षाहि हें काम कांहीसें अवघड असतें. लेखकाने तें यशस्वीपणें केलें आहे. हरिभाअू आपटे यांच्या वाङ्मयाचें हें अेक प्रकारें पुनरुज्जीवनच आहे. हरिभाअूंच्या प्रकाशकांनी घालून दिलेलें हें अुदाहरण अितर प्रकाशकांनी अनुकरण करण्यासारखें आहे. विद्यार्थ्यांत वाचनाची अभिरुचि वाढत आहे. अशा वेळीं त्यांच्यासाठी योग्य तें वाङ्मय त्यांच्या भोवतीं तयार ठेवलें

अनुक्रमणिका

पाहिजे. या दृष्टीने प्रसिद्ध ग्रंथांच्या शालेय आवृत्त्या काढण्याचे वरीलसारखे प्रयत्न अत्यंत स्तुत्य आहेत.

गं. भा. नि.

'अशोकाचीं पानें' ह्या श्री. कृष्णाकुमारांच्या तिसऱ्या लघुकथासंग्रहाने मराठवाड्यांतील साहित्यांत आणखी अेक भर पडत आहे. 'अुषा' आणि 'अलकनंदा' या त्यांच्या कथा-संग्रहांप्रमाणे याहि कथासंग्रहांतून मराठवाड्यांतील महाराष्ट्रीय अंतःकरणाचें चित्रण केलेलें आहे. मध्यमहाराष्ट्र किंवा नागपूर, वऱ्हाड येथील जीवनाहून मराठवाड्यांतील जीवन मूलतः भिन्न नसलें तरी परिस्थित्यनुरूप त्यांत थोडाफार फरक होतोच; आणि त्यामुळे वाचकाला अशा प्रादेशिक कथांतून रुचिपालट मिळतो. प्रस्तुत संग्रहांतील कथांत हैदराबाद, दारोगा, अमीन अित्यादि अधिकारी, करोडगिरी नाकें— या सर्वांचीं वर्णनें त्यांच्या नाविन्यामुळे वाचनीय झालीं आहेत. 'तेलंगण' आणि 'आंध्रिक' या कथांतून तेलंगण प्रांताचें रमणीय वर्णन आढळतें. परंतु यांना कथा कां म्हणाव्या, हें समजत नाही. भावाने अगर बहिणीने आपल्या प्रवासाचें वर्णन पत्ररूपाने लिहून पाठविणें म्हणजे कांही ती कथा होअूं शकत नाही. 'अशोकाचीं पानें' या कथेंतील पांढरपेशावृत्तीचें चित्र ठराविक ठशाचें असलें तरी त्याचें वर्णन प्रसादपूर्ण वाटतें. पिढ्यापिढ्यांतून होणारा आचारविचारांचा बदल हळुवार हाताने रंगविला आहे. 'अंबुज अम्माळ' ही अेक या संग्रहांतील चांगल्यांपैकी कथा आहे. सर्कसमध्ये काम करणाऱ्या मस्कऱ्याचें किंवा तारेवरील छत्रीचा नाच करणाऱ्या नर्तकीचें चित्र मराठी वाङ्मयांत अगदीच नवीन नसलें तरी चिरपरिचित खास नाही.

श्री. कृष्णाकुमार यांची भाषाहि अेकंदरींत प्रासादिक आहे. खरखरीत, कणखर, डोंगराळ व जोंधळ्याच्या शेतांनी बहरलेल्या मराठवाड्यांत राहणाऱ्या लोकांच्या तोंडची भाषाहि त्या प्रांताला नि त्यांच्या पेशाला अनुरूप आहे. निजामराजवटीमुळे होणारा फार्शी, अुर्दू शब्दांचा वावरहि त्यांच्या प्रादेशिकतेला योग्य असाच आहे. मधून मधून श्री. कृष्णाकुमारांच्या भाषेंत कल्पकतेचा भासहि होतो (चावडी पान ५५, ५६). मात्र कथानकाची गुंफण आणि पात्रांचा स्वभावपरिपोष यांबद्दल जरा जास्त काळजी घेतली तर श्री. कृष्णाकुमारांच्या कथांना प्रादेशिक कथा म्हणून वरचें स्थान मिळणें शक्य आहे.

गं. व. ग्रा.

प्रा. माटे यांचे तेरा ललित स्फुट लेख 'अुपेक्षितांचें अंतरंग' या संग्रहांत समाविष्ट करण्यांत आलेले असून सर्वंहि लेखांमधून दलित व अुपेक्षित वर्गांतील व्यक्तींच्या जीवनक्रमा-बद्दलचे लेखकाचे सहानुभूतीचे व अनुकंपेचे विचार, व त्या व्यक्तींच्या जीवनक्रमांतील प्रसंगांचीं रंगदार व वास्तव स्वरूपाचीं चित्रें अुठावदारपणें विखुरलेलीं आढळतात. प्रा. माटे यांचा या विषयाबद्दलचा व्यासंग व त्यांचें तद्विषयक प्रत्यक्ष कार्य विश्रुतच आहे.

प्रस्तुत पुस्तकांतर्गत लेखांतून अुपेक्षितांचें 'अंतरंग' प्रकट झालें आहे कीं नाही याबद्दल क्वचित् कोणाचें दुमत झालें, तरी प्रा. माटे यांनीं ज्या व्यक्तींचीं जीवनचित्रें रंगविलीं आहेत त्यांच्याबद्दल त्यांना पुरेशी प्रत्यक्ष माहिती आहे; त्यांच्या परिस्थितीची व त्या परिस्थितीच्या कारणांची त्यांना पूर्ण कल्पना आहे; त्या परिस्थितीची शास्त्रीय चिकित्सा करून तिच्याबद्दलचें ते निदान करूं शकतात व योग्य ते अुपायहि सुचवूं शकतात, हें कोणालाहि कबूल करावें लागेल. अंतरींचा कळवळा व समाजशास्त्रज्ञाची/तात्त्विक दृष्टि या दोहोंचा मनोज्ञ संगम या लेखांतून झालेला

पाहावयाला मिळतो. कलाविलास व कल्पनारम्यता यांची या लेखांतून फारशी पखरण पसरलेली नाही. अुलट विचारात्मक विचक्षणेनेच लेखन अेकंदरींत ब्रेंचसें मारावलेलें आहे. त्यामुळे वाचकांचीं अंतःकरणें भावनांनी भरून डोळे आर्द्र होण्यापेक्षा विचारांनी डोकें भ्रमण करावयास लावणारी परिणामकारकताच त्यांतून जास्त प्रमाणांत आढळते. लेखनपद्धतींतहि सहजतेपेक्षा हेतुपूर्ण कलात्मक रचनेचा प्रयत्नच जास्त प्रतीत होतो; व त्यामुळे लेखकांनीच कबूल केल्याप्रमाणे त्यांचा कल 'अशा लेखनाकडे नसल्यामुळे' त्यांच्या हातून बुद्ध्याच होत असलेला हा 'नवा यत्न' कांहीसा कृत्रिम स्वरूपाचाहि वाटतो. श्री. साने गुरुजी किंवा श्री. य. गो. जोशी यांच्याप्रमाणे प्रा. माटे हे आपल्या वर्ण्य व्यक्तींच्या अंतरंगाशीं सरूप झालेले दिसत नाहीत, परंतु त्याबरोबरच आपण त्यांच्या अगदी समीप असल्याची खात्री पटविल्यावांचूनहि ते राहत नाहीत, हें तितकेंच खरें आहे. यामुळे अुपेक्षितांबद्दल सुस्थितांना दयेने, करुणेने, अखिल मानव्याच्या हितैक्य बुद्धीने, वाटणारी अनुकंपा या लेखांतून अुफाळून आलेली दिसते. पण साने गुरुजी किंवा य. गो. जोशी यांच्या लिखाणांत आढळून येणारी भावनात्मक तळमळ, तादात्म्य किंवा आर्द्रता त्यांत आढळून येत नाही. विचारजागृतीच्या दृष्टीने या पुस्तकाचें कार्य, अुपरिनिर्दिष्ट दोन्ही लेखकांच्या कृतींपेक्षा अधिक अुपयुक्त आहे, पण त्यांच्या कृतींत वाचकांचीं अंतःकरणें तळापासून ढवळून काढण्याचें जें सामर्थ्य त्या लेखकांचें वर्ण्यविषयाशीं भावनात्मक समरसत्व असल्यामुळे अुत्पन्न होतें, तें मात्र तितक्या प्रमाणांत यांत होत नाही. कलात्मक रीतीने भावनांचा परिपोष किंवा आभास यांत निर्माण केलेला असला तरी या 'अुपेक्षितांचें अंतरंगा'ची खरी बैठक, त्याचें वास्तविक अधिष्ठान, बौद्धिक आहे भावनात्मक नव्हे, हें पानोपानीं वाचकांच्या नजरेसमोर येत राहतें. यांतील कोणतीहि व्यक्ति बोलूं लागली की आवश्यक, प्रसंगोचित आणि हार्दिक असेल तेवढेंच बोलून ती थांबेल असें नाही, तर ज्या मुद्यावर बोलणें चाललें असेल त्याचें सांगोपांग आणि निःसंदिग्ध तर्कशुद्ध विवरण केल्यावांचून तिचें समाधानच होणार नाही, असें वाचकाला पुस्तकांतील पहिलीं कांही पानें वाचून झाल्यावर आपोआप वाटूं लागतें व बहुतेक वेळां त्याला त्याचा तसाच पडताळाहि येतो. अर्थात् हा दोष आहे असें कोणीच म्हणूं शकणार नाही; पण हा ज्याचा प्रमुख विशेष आहे तें लिखाण कथात्मक वाङ्मयाच्या वेषांत असलें तरी त्या विभागांत विशेषसें हक्काने वावरूं शकत नाही. त्याची खरी जात निबंधाचीच आणि त्या गोतावळ्यांतच तें 'चपखल्' बसतें. पण निबंध म्हटला की रूक्ष असा कोणाचा गैरसमज होत असल्यास या प्रकाराला ललित-निबंध असें नवें नांव पाहिजे तर द्यावें; पण या लेखांचें गोत्र मात्र गोष्टींचें नसून निबंधाचें आहे, हें विसरून चालणार नाही.

प्रत्येकाच्या मनाची कांही तरी विशिष्ट घडण असते, आणि सहज किंवा जाणूनबुजून झालेल्या किंवा केलेल्या संस्कारांनी त्याला कांही निश्चित वळण लागून ठराविक घाट येत असतो. हें वळण पक्कें होण्यापूर्वी, हा घाट ठराविक स्वरूपाचा ठसा बनण्यापूर्वी, त्यावर संस्कार होअूं शकतात. फरक पडूं शकतात. पण अेकदा माणसाचें व्यक्तित्व पक्कें झालें की त्याच्या मनाचा घाट आणि त्याचे प्रकटीकरणाचे मार्ग हेहि ठरून गेल्यासारखे होतात. प्रा. माटे हे ज्यांच्या व्यक्तित्वाने निश्चित स्वरूप धारण केलें आहे असे अेक परिणतप्रज्ञ समाजशास्त्रज्ञ व प्राध्यापक आहेत. त्यांचें आजपर्यंतचें सगळें लिखाण 'निबंध-रूप व विवेचनात्मक आहे.' परंतु हें पुस्तक लिहिल्यामुळे त्यांना आता अेक नवीन दृष्टि आली आहे असें दिसतें. ते सांगतात—"...पण रा. वि. श्री. मोडक व रा. रा. ना. नातू यांनीं आपला आग्रह सोडला नाहीं; आणि मला कबूल करणें भाग आहे कीं मी हळूहळू लिहून पाहूं लागलों

**साधारणपणें आतां असें वाटतें कीं लघुकथा किंवा तत्सम वाङ्मय मला लिहितां येअील."** (जाड ठसा अवतरण घेणारांचा). हें वाक्य प्रा. माटे यांचें आहे म्हणून त्याला महत्त्व आहे. दुसऱ्या कोणी अेखाद्या नवख्या लेखकानें तें लिहिलें असतें तर त्याबद्दल चर्चा करण्याचें कांही कारणच नव्हतें.

सध्या विचारात्मक वाङ्मयाबद्दल वाचकवर्गांत अेक प्रकारची आत्यंतिक विमुख वृत्ति निर्माण होअून ललितवाङ्मय व ललितवाङ्मयलेखक यांबद्दल जो अेक प्रकारचा भलताच आदर व जिव्हाळा वाढला आहे, त्यामुळे प्रा. माटे यांच्यासारख्या अितके दिवस विचारप्रचुर व विचारप्रवर्तक वाङ्मयाच्या निर्मितींत लेखणी व जीभ झिजवलेल्या गंभीर व विचारप्रवण वाङ्मय-लेखकांची अुपेक्षा होत असते. याचमुळे प्राध्यापक माटे यांच्या लेखणींतून हें अगतित्वनिदर्शक वाक्य अगदी सहजपणें अुतरलें आहे. ही परिस्थिति निःसंशय विचारांत घेण्यासारखी आहे. कारण या अेकाच लहानशा व बहुशः अहेतुकपणें लिहिलेल्या वाक्यांत वाङ्मयांतील महत्त्वाच्या अुपेक्षित लेखकवर्गाचें अंतरंग स्पष्टपणें प्रतिबिंबित झालेलें आहे. अनेक विचारवंतांना विचार करावयास लावणारें लिखाण लिहिण्याचें ज्यांच्या लेखणींत सामर्थ्य आहे, आणि ज्यांच्या त्या लिखाणाला विशाल, दीर्घकालीन अनुभवाचें व सखोल विचाराचें अधिष्ठान आहे, अशा लेखकांवर त्यांच्या विशिष्ट लेखनप्रकाराला चालू बाजारांत भाव नसल्यामुळे, वास्तविक त्यांचा या प्रकारच्या लेखनाकडे कल नसतांहि, अशा प्रकारच्या लेखनाचे प्रयोग करावेसे वाटण्याचा प्रसंग यावा आणि त्यांचे ते प्रयोग व ते प्रयत्न कमजास्त प्रमाणांत यशस्वी झाले आहेत, असे चार ओळखीच्या माणसांनी शिफारसीचे अुद्गार काढतांच, "साधारणपणें आतां असें वाटतें कीं लघुकथा किंवा तत्सम वाङ्मय मला लिहितां येअील" असे धन्यतेचे अुद्गार काढण्यास त्यांनी प्रवृत्त व्हावें, यापेक्षा गंभीर वाङ्मय लिहिणाऱ्या अुपेक्षित लेखकांच्या अंतरंगाचें अधिक विषाद अुत्पन्न करणारें विडंबन कोणतें असूं शकेल ?

याचा अर्थ गंभीर विषयांवर लेखन करणाऱ्यांनी ललितवाङ्मयाच्या प्रांगणांत पाअूल टाकूं नये किंवा वेगवेगळे नवे वाङ्मय प्रकार हस्तगत करण्याचे प्रयोग करूं नयेत असा नव्हे. पण तें पाअूल टाकतांना केवळ कौतुकाची, किंवा लोकाराधनेची अिच्छा त्याच्या पाठीमागे असतां कामा नये, असें मला म्हणावयाचें आहे. ज्याला कांही तरी सांगावयाचें आहे, त्याने आपल्याला जें कांही सांगावयाचें आहे, तें परिणामकारक रीतीने आणि यथार्थत्वाने सांगण्यासाठी त्याला योग्य वाटेल तो कोणताहि वाङ्मयप्रकार निवडला तरी त्याला कांहीच आक्षेप घेतां येण्यासारखा नाही; किंवा अुपलब्ध वाङ्मयप्रकार अपुरे पडत असल्यास, त्याने नवीन वाङ्मयप्रकार निर्माण करण्याचे प्रयोग केले, तरी त्यालाहि कांही प्रत्यवाय असूं शकणार नाही; पण तो वाङ्मयप्रकार आणि त्याच्याद्वारें जें कांही सांगावयाचें तें, यांचें नातें अितकें अभिन्न असलें पाहिजे, की त्या वापरलेल्या वाङ्मयप्रकाराचें स्वरूप व त्याचें अंतरंग असे त्याचे दोन भाग करतांच येतां कामा नयेत. अशी स्थिति असतांना गंभीर वाङ्मयनिर्मात्यानेहि ललितसाहित्यांतील काव्य, नाटक, कथा, कादंबरी अित्यादि कोणत्याहि वाङ्मयप्रकाराचा आश्रय केला तरी त्याला कांहीच प्रत्यवाय नाही व खुद्द लेखकालाहि त्या निवडींतील नैसर्गिक सहजतेमुळे, आपण कांही भलतेंच करीत आहोंत असें वाटणारहि नाही; कारण या पातळीवर ललित आणि अललित असा भेदच अुरत नाही; पण याच्या खालच्या पातळीवरील भूमिकेंत स्वतःच्या व्यक्तित्वाला, विषयाच्या निवडीला व प्रतिपादनाला अनुकूल असा वाङ्मयप्रकार नैसर्गिकपणें निवडण्याअैवजी, आपलें सर्वंकष

लेखनकौशल्य दाखविण्याच्या मोहाने, सामान्यतः लोक जो आपला समजतात त्यापेक्षा वेगळाच वाङ्मयप्रकार लेखनप्रयोगासाठी निवडण्याचा व त्यांत विक्रम करून आपल्या लेखनचातुर्याच्या प्रदर्शनाने आपल्या चाहत्यांना चकित करण्याचा मोह चांगल्या जाणत्या सन्मान्य साहित्यसेवकांना अनेकवार पडलेला आढळतो. प्रा. माटे यांचें वर अुद्धृत केलेलें वाक्य 'अुपेक्षिताच्या अंतरंगां'तून निर्माण झालेल्या न्यूनगंडत्वाचें निदर्शक आहे कीं अशा या दुसऱ्या प्रकारच्या विविध विक्रमाच्या कुतूहलजन्य विजिगीषेचें गमक आहे, हें सांगणें कठीण आहे; पण तें कसेंहि असलें तरी ज्यांच्याकडून साहित्यक्षेत्रांत मरीव कामगिरीची अपेक्षा करावयाची त्यांच्याकडून आपल्या परिणतप्रज्ञ अवस्थेंत असे अुद्गार निघालेले पाहावे लागावेत ही साहित्याची विशेषशी अिष्ट प्रगति आहे, असें वाटत नाही. जेथे परिणतप्रज्ञ प्राध्यापकांना आपण लघुकथांसारखें कांही तरी लिहूं शकतों असें चार लोकांनी म्हटलें असतां धन्यता वाटावी, आणि ज्याच्याबद्दल "हें त्या पौत्रासि वर्प सोळावें, लोळावें मांडिवरि" तेणें जगाचा अितिहास लिहिण्यास प्रवृत्त व्हावें, अशी परिस्थिति निर्माण होते तेथे कांही तरी विकृत, अनिष्ट परिणामसूचक असें वातावरण निर्माण झालें आहे, यांत शंकाच अुरत नाही. आणि ललितवाङ्मयलेखनाबद्दलचें हें विकृत कौतुक जर असेंच वाढत जावयाचें असेल, तर लौकरच महामहोपाध्याय पां. वा. काणे, प्रा. दत्तोपंत पोतदार किंवा रावसाहेब नानासाहेब चापेकर अित्यादि विद्वानहि आपलें तें धर्म-अितिहास-समाजशास्त्र वगैरे विषयांवरील प्रौढ लेखन बंद करून नाटिका, लघुकथा, कादंबरी, नाटक, काव्यादि ललितवाङ्मयप्रकारांचा लवकरच आश्रय घेतात कीं काय आणि त्यांनी करावयाच्या ग्रंथनिष्पत्तीची जबाबदारी रा. स्व. सं. चे शाळा-कॉलेजांतील विद्यार्थी अुचलतात कीं काय, अशी भीतिहि वाटल्यावांचून राहात नाही. देवलांच्या शारदेने "लग्न करिति जरठ-जीर्ण। अविवाहित फिरति तरुण। सुख असेल त्यांसि त्यांत। परि अमुचें मात्र मरण॥" अशी केविलवाणी तक्रार पूर्वी केली होती; आणि आजच्या महाराष्ट्रशारदेलाहि अशाच प्रकारची तक्रार करण्याची करुणास्पद परिस्थिति आता निर्माण होत आहे, असें आजकालच्या वाङ्मयनिर्मितीकडे लक्ष्य टाकलें असतां म्हणावेंसें वाटतें. येशू खिस्तानें आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करतांना सामान्य लोकांना तो समजावा आणि रुचावा म्हणून आपल्या अनुभवाच्या आधारावर चार सुरस कल्पित गोष्टी रचून त्या त्यांना सांगितल्या म्हणून त्याच्या तत्त्वज्ञाच्या प्रचारकी भूमिकेला बाध येतो, असें कोणीच म्हणणार नाही; पण आपल्या त्या गोष्टी लोकांना आवडल्या म्हणून आपली अुपदेशकाची भूमिका बाजूला ठेवून तो जर लघुकथालेखनाच्या तंत्राचा अभ्यास करून त्या वाङ्मयप्रकारांत निष्णात होण्याच्या अुद्योगांत आपल्या कालाचा व्यय करण्यांत धन्यता मानूं लागला, तर मात्र मोठाच अनवस्था प्रसंग निर्माण होअील. तसेंच कांहीसें या बाबतींत होत आहे. नाही तर अेखाद्या विद्वान् प्राध्यापकाने सहज गंमत म्हणून चार लघुकथा लिहिल्या आणि नंतर ग्रंथरूपाने त्या संकलित करून त्या समारंभाने प्रसिद्ध केल्या, किंवा अेखाद्या कॉलेजकुमाराने आपण वाचलेल्या ग्रंथांतील आपली विस्तृत टिपणें छापून काढून त्याला 'जगाचा अितिहास' असें मोठें नांव दिलें; म्हणून कांही वाङ्मयाचें मोठेंसें नुकसान होतें असें नाही; पण या प्रकारांचें कौतुक करतांना ज्या वेळीं या साहित्यांतील अघटित घटना म्हणून त्यांचें मूल्यमापन व्हावयाला लागतें, तेव्हा मात्र शारदामंदिराच्या आवारांत विचारार्ह अशी परिस्थिति निर्माण झाली आहे, असें वाटल्यावांचून राहत नाही. असो.

परीक्षण लिहितां लिहितां प्रा. माटे यांचें हें पुस्तक आहे, या जाणीवेने सहज अनुषंगाने

आलेले हे विचार बाजूला ठेवून पुन्हा प्रस्तुत विषयाकडे वळावयाचें म्हणजे त्यांतील लेखांचा परामर्श घेणें आवश्यक आहे. प्रा. माटे यांचें हें पुस्तक त्यांनी म्हटल्या-प्रमाणे "आपण लिहिलेला मजकूर सुरस आहेसें म्हटलें म्हणजे झालें" अेवढ्याच धोरणाने पाहिलें, तर वाचकाला तक्रार करावयाला त्यांत कोठेच जागा नाही. त्या दृष्टीने यांतील प्रत्येक लेख सुरस, सरस आणि हृद्य आहे. आरंभापासून अखेरपर्यंत पुस्तक वाचतांना कोठेच कंटाळवाणें वाटत नाही. "सावित्री मुक्यानेच मेली", "कशाचा संसार", "बन्सीधर! तूं आता कुठे जाशील?" या गोष्टी बऱ्याच अुत्कटतेने मनाची पकड घेतात. "हास्याचा शोध"मध्ये वर्ण्य विषय व वर्णन कर्ता यांच्या भूमिकेंतील सुदूरता कांहींशी बोचते; पण "अस्पृश्याच्या डायरींतील पानें!" वाचतांना पुन्हा आत्मीयतेचा ओलावा अधिक प्रभूतपणें पाझरूं लागलेला आढळतो. बाकीच्या सर्व गोष्टीहि वाचनीय असून त्यांत अितस्ततः मौलिक विचार प्रकट केलेले व स्वतंत्र दृष्टिकोन ठेवलेला आढळून येतो. 'अुपेक्षितांचें अंतरंग'-मध्ये नीरस किंवा सत्त्वहीन असा अेकहि लेख आढळणार नाही, पण त्याबरोबरच प्रा. माटे यांनी आपली नेहमीची लेखनपद्धति न वापरतां लघुकथा या वाङ्मयप्रकाराचा साक्षेपाने स्वीकार केला म्हणूनच हें अितकें परिणामकारक झालें, असें वाटण्यासारखें अेकहि स्थळ यांत नाही, हेंहि तितकेंच खरें आहे.

के. ना. का.

---

## दुरुस्ती

'प्रवेश परीक्षेचें मराठी' या लेखांतील पृष्ठ ६३ वरील २२ व्या ओळींत जाड्या ठशांत 'नग' असा शब्द छापला गेला तो 'जग' असा पाहिजे.

याच पृष्ठावरील पद्य २३ नंतर '**पद्य २४– चरण २– अेक समास करावा**' हा मजकूर पाहिजे.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## विशेष साधारण सभा

म. सा. परिषदेची विशेष साधारण सभा ता. १६ नोव्हेंबर १९४१ रविवारीं सायंकाळीं ४॥ वाजतां परिषदेच्या सभागृहांत भरली होती. सभेस पुढीलप्रमाणे सभासद अुपस्थित होते:— श्री. न. चिं. केळकर (अध्यक्ष), श्री. रा. दा. देसाअी, प्रो. धों. के. कर्वे, प्रो. वा. म. जोशी, श्री. कृ. ग. लिमये, श्री. नी. शं. नवरे, श्री. वि. धों. कुलकर्णी, डॉ. गं. त्र. ग्रामोपाध्ये, प्रो. श्री. रा. पारसनीस, श्री. ज. शं. मेढेकर, श्री. ना. मा. संत, श्री. गं. बा. गरुड, श्री. य. रा. दाते, प्रि. ध. रा. गाडगीळ, प्रो. के. ना. वाटवे, श्री. चिं. ग कर्वे, श्री. य. ग. वझे, श्री. श्री. कृ. साठे, प्रो. द. वा. पोतदार, श्री. द. वि. देवधर, श्री. कृ. गो. मराठे, प्रो. गं. बा. सरदार, श्री. ज. श्री. वाघ, श्री. त्र्यं. गो. ढवळे, व रा. सा. र. लु. जोशी.

चिटणीस, पटवर्धन स्मारक समिति, यांजकडून आलेलें क्र. प–५३१ ता.२२ ऑक्टो. १९४१ चें पत्र सभेस वाचून दाखविण्यांत आलें. त्याचा विचार होअून प्रो. द. वा. पोतदार यांनी खालील ठराव सभेपुढे मांडला व त्यास श्री. चिं. ग. कर्वे यांनी अनुमोदन दिलें:— "माधवराव पटवर्धन सभागृहाच्या योजनेबाबत साधारण सभेने पूर्वी ता. २४।१०।४० रोजीं जो ठराव केला होता त्याप्रमाणे पटवर्धन स्मारक समितीकडून सात हजार रुपयांची मदत व्हावयाची होती. पुढे श्री. अेन. जी. पवार अिंजीनियर यांनी तयार केलेल्या व पटवर्धन समितीने पसंत केलेल्या नकाशाप्रमाणे वरील सभागृहाच्या बांधणीस सुमारे सतरा हजार रुपये खर्च येअील हें दिसून आल्यावरून पटवर्धन समितीने आपली मदत रु. चौदा हजारपर्यंत वाढवून देण्याविषयी ठराव करून पाठविला आहे व म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाने पटवर्धन समितीचा ठराव मान्य करून म. सा. परिषदेच्या निधींतून तीन हजार रुपये या कामीं देण्यांत यावे अशी शिफारस केली आहे. तरी म. सा. परिषदेची ही विशेष साधारण सभा पटवर्धन समितीकडून आलेली व कार्यकारी मंडळाने मान्य केलेली ही समग्र योजना पसंत करीत आहे आणि पटवर्धन समितीचे या अधिक साहाय्याबद्दल मनापासून आभार मानीत आहे."

चर्चेनंतर हा ठराव सभेने मान्य केला.

ता. ११ अेप्रिल १९४१ रोजीं वार्षिक साधारण सभेने ट्रस्टफंड व ट्रस्टडीड याविषयी केलेला ठराव वाचण्यांत आला. त्याचप्रमाणे ता.९ नोव्हेंबर १९४१ रोजीं भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेने ट्रस्टडीड अुपसमितीची जी शिफारस मान्य केली तीहि सभेस वाचून दाखविण्यांत आली. या सर्वांचा विचार होअून प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी खालील ठराव मांडला व त्यास श्री. य. रा दाते यांनी अनुमोदन दिलें :—

"कार्यकारी मंडळाने प्रथम तिसरा ट्रस्टी नेमून ट्रस्टच्या कारभाराविषयी तपशीलवार नियम करावे व तदनंतर नवीन मिळकतीवरून नवीन ट्रस्टडीड करणें अथवा जुनें ट्रस्टडीड विस्तारणें याची अिष्टता व व्यवहार्यता यांचा विचार करून या प्रश्नाच्या शेवटच्या निकालाकरिता साधारण सभेचा पुन्हा आदेश घ्यावा."

ह्या ठरावास मान्यता दिल्यानंतर सभा विसर्जन करण्यांत आली.

---

# परिषद्वार्ता



(चिटणिसांकडून)

**कार्यकारी मंडळ**— कार्यकारी मंडळाच्या ता. ९ नोव्हेंबर व १४ डिसेंबर १९४१ याप्रमाणे दोन सभा झाल्या. ता. ९ नोव्हेंबरच्या सभेंत खालील दुखवट्याचे ठराव करण्यांत आले—

"(१) खानापूर (जि. बेळगांव) येथील लोकमित्र मासिकाचे संपादक श्री. दत्तात्रेय गोविंद सडेकर यांच्या निधनाबद्दल म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास फार दुःख वाटतें. श्री. द. गो. सडेकर यांनी नियतकालिकाच्या द्वारें केलेली वाङ्मयसेवा आणि बहुजनसमाजांत ज्ञानप्रसार करण्याबद्दल त्यांनी दाखविलेली अभिनंदनीय तळमळ यांचा महाराष्ट्रीयांना केव्हाहि विसर पडणार नाही असें कार्यकारी मंडळास वाटतें. श्री. सडेकर यांच्या कुटुंबीयांबद्दल मंडळ सहानुभूति व्यक्त करीत आहे."

"(२) ज्ञानप्रकाश दैनिकाचे अुपसंपादक श्री. रामचंद्र गोविंद कानडे, वाङ्मयविशारद (टिळक), यांच्या अकालीं निधनाने केवळ महाराष्ट्रांतील वृत्तपत्रीय व्यवसायाचीच नव्हे तर मराठी साहित्याचीहि मोठी हानि झाली आहे. श्री. कानडे यांनी लिहिलेला मराठी नियतकालिकांचा अितिहास आणि राष्ट्रीय शिक्षणाचे प्रवर्तक श्री. विष्णु गोविंद विजापूरकर यांचें त्यांनी लिहिलेलें चरित्र हे दोन्ही ग्रंथ श्री. कानडे यांची वाङ्मयसेवा स्मरणीय करितील. श्री. कानडे यांच्या कुटुंबावर ओढवलेल्या या आपत्तीबद्दल म. सा. परिषदेचें कार्यकारी मंडळ सहानुभूति व्यक्त करीत आहे."

"(३) अहमदनगर येथील जुने वाङ्मयसेवक आणि तेथील मराठी-साहित्यविषयक चळवळींचे मार्गदर्शक श्रीमंत सरदार नारायणराव यशवंतराव अुर्फ नानासाहेब मिरीकर यांच्या निधनामुळे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळास अत्यंत दुःख वाटतें. ज्ञानेश्वरकालीन वाङ्मयाचें श्रीमंत नानासाहेब मिरीकर यांनी केलेलें संशोधन, तसेंच नगर साहित्य संमेलन यशस्वी करण्याच्या बाबतींत त्यांनी केलेले प्रयत्न, यांचा प्रामुख्याने अुल्लेख करणें मंडळास आवश्यक वाटत आहे. श्रीमंत नानासाहेब मिरीकर यांच्या निधनाने त्यांच्या कुटुंबीयांवर ओढवलेल्या आपत्तींत म. सा. परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

ता. १४ डिसेंबर दिवशीं भरलेल्या सभेंत खालील दुखवट्याचे ठराव करण्यांत आले:—

"(१) ग्वाल्हेर येथील राजकवि भास्कर रामचंद्र तांबे हे ता. ७ डिसेंबर १९४१ रोजीं दिवंगत झाले. केशवसुतांच्या पिढीच्या व नव्या कवींच्यामधील हा शेवटचा दुवा नष्ट झाला. आपल्या स्वतंत्र व वैशिष्ट्यपूर्ण अशा काव्याने त्यांनी नवीन काव्यावर अपूर्व अशी छाप बसविली आहे. नाट्यगीतांचे पुरस्कर्ते, गेय काव्यरचना करणारे प्रमुख कवि, रसिक टीकाकार, अित्यादि नात्यांनी आधुनिक मराठी काव्यवाङ्मयांत त्यांनी आपलें स्थान अढळ करून ठेविलें आहे. महाराष्ट्रापासून दूर अशा अुत्तरहिंदुस्थानांत काव्याची ज्योत तेवत ठेवण्याचें कार्य त्यांनी आमरण केलें. अशा थोर कवीच्या निधनाने मराठी साहित्याची मोठी हानि झाली आहे. यामुळे म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाला अत्यंत दुःख होत आहे तें या ठरावाने कार्यकारी मंडळ नमूद करून ठेवीत आहे."

अनुक्रमणिका

"(२) ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर हे ता. १०-११-४१ रोजीं वर्धा येथे निधन पावले हें अैकून या सभेस दुःख होत आहे. ज्या काळीं मराठी भाषेकडे विद्वानांचें विशेष लक्ष्य नव्हतें त्या काळीं त्यांनी संत-कवींच्या काव्यांचा सतत व्यासंग केला आणि व्याख्यानें, प्रवचनें व ग्रंथलेखन यांच्या द्वारें काव्याविषयी आणि भक्तिमार्गाबद्दल लोकांत गोडी अुत्पन्न करण्याचा परिश्रमपूर्वक प्रयत्न केला. भक्तिमार्गप्रदीप, ज्ञानेश्वरचरित्र, अेकनाथ-चरित्र, तुकारामचरित्र, मोरोपंतांचें चरित्र, मराठी वाङ्मयाच्या अितिहासाचे रामदासकाला-पर्यंतचे तीन विभाग, समर्थसंजीवनी, समर्थांचे समग्रग्रंथ, अित्यादि ग्रंथांच्याद्वारें व 'मुमुक्षु' या साप्ताहिकाच्या द्वारे मराठी वाङ्मयाची त्यांनी बहुमोल सेवा केली. त्यांच्या लेखांत आणि वाणींत प्रेमळपणा आणि रसाळपणा ओतप्रोत भरलेला असे. अशा या विद्वान, व्यासंगी, बहु-श्रुत वाङ्मयसेवकाच्या निधनाने त्यांच्या आप्तस्वकीयांसच नव्हे तर महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र यांतील सर्व मराठीभाषाभिमान्यांना अत्यंत हळहळ वाटत आहे, ती या ठरावाच्या द्वारे व्यक्त करण्यांत येत आहे."

"(३) बृहन्महाराष्ट्राचे निःसीम सेवक श्री. ल. गं. काळे यांच्या निधनामुळे महाराष्ट्राची व बृहन्महाराष्ट्राची अत्यंत मोठी हानि झाली आहे. सेनानिवृत्त झाल्यानंतर आपली सारी शक्ति अेकवटून त्यांनी अेकनिष्ठपणें बृहन्महाराष्ट्राची सेवा केली. अशा या दुर्मिळ कार्य-कर्त्याच्या निधनामुळे परिषदेच्या कार्यकारी मंडळास अत्यंत दुःख होत आहे."

**परीक्षा**—प्रतिवर्षाप्रमाणे परिषदेच्या परीक्षा मुंबअी, पुणें, नागपूर, अिदूर, सांगली व हैदराबाद या केंद्रीं डिसेंबर महिन्यांत घेण्यांत आल्या. प्राज्ञ परीक्षेस अेकूण ७७ व विशारद परीक्षेस अेकूण १४ याप्रमाणे अर्ज आलेले होते. प्राज्ञ परीक्षेस अुपस्थित अुमेदवारांची संख्या ६४ असून या परीक्षेंत खालील अुमेदवार यशस्वी झाले आहेत:—

## प्राज्ञपरीक्षा १९४१

### यशस्वी अुमेदवारांचीं नांवें

**मुंबअी केंद्र**—तिसरी कक्षा—श्री. दिगंबर महादेव ओक, श्री. दामोदर श्रीधर देवकुळे, लीला महारुद्र बोरकर, श्री. रामचंद्र शंकर मालेदकर, मालती यशवंत रणदिवे, वामन राधाकृष्ण.

**पुणें केंद्र**—दुसरी कक्षा—श्री. रत्नाकर सीताराम अभ्यंकर, श्री. गोपाळ मधुकर आठवले, श्री. विठ्ठल बयाजी कदम, श्री. श्रीराम सदाशिव कुलकर्णी, श्री. शंकर दादाजी गरगटे, श्री. विष्णु यशवंत जोशी, श्री. सखाराम हरि देशपांडे, श्री. दत्तात्रेय नारायण बापट, श्री. विनायक वासुदेव मालेराव, श्री. शेटी तिमा वडार, विमल दत्तात्रेय साने.

तिसरी कक्षा—श्री. मार्तंड नीळकंठ जोशी, श्री. मधुसूदन केशवराव अनगळ, श्री. श्रीधर कृष्ण अवचट, श्री. विष्णु हरि केतकर, श्री. वसंत हरि पाठक, कु. सरोजिनी नारायण पाठक, श्री. दत्तात्रेय धोंडो पानसे, श्री. माधव नागेश पारखी, कु. तारामती बळवंत बडवे, श्री. कृष्णाजी बळवंत मंडारी, श्री. अरविंद हरि राअुत, श्री. दिगंबर गोविंद विद्वांस, श्री. रघुनाथ महारुद्र शास्त्री, श्री. बाळकृष्ण विष्णु हेलवाडे, श्री. शंकर गणेश देशपांडे, श्री. सदाशिव वासुदेव दर्शने.

**नागपूर केंद्र**— दुसरी कक्षा–श्री. विष्णुकुमार अन्नाराव देशमाने.

तिसरी कक्षा–श्री. भूपाल अण्णाप्पा दलाल.

**अिंदूर केंद्र**— दुसरी कक्षा–वसंत गोविंद खांडेकर, श्री. देवराव कृष्ण बढे.

तिसरी कक्षा–श्री. कमलाबाअी केळकर, श्री. श्रीकृष्ण विनायक डिके.

**सांगली केंद्र**— दुसरी कक्षा–श्री. गणेश वासुदेव करंदीकर.

तिसरी कक्षा–श्री. रघुनाथ नारायण काटे, श्री. अेकनाथ दादू काळे, श्री. रघुनाथ दत्तात्रेय जोशी.

**हैदराबाद केंद्र**— दुसरी कक्षा–श्री. नरहर शेषराव पोहनेरकर.

तिसरी कक्षा–श्री. जगन्नाथ शंकरराव कहाळेकर, श्री. भास्कर धोंडोपंत कुलकर्णी, आनंदीबाअी कुंटे, कमल नारायण जोशी, श्री. कल्याण नारायणराव तडवळकर, श्री. श्रीपाद व्यंकटेश देशपांडे, श्री. नीलकांत कृष्ण देशमूख, कु. शांता चिंतामण परळीकर, श्री. विष्णु शंकर पळशीकर, श्री. शंकर शेषराव पोहनेरकर.

**रानडे शतसांवत्सरिक जन्मोत्सव**— हा अुत्सव मुंबअी, सोलापूर, हैदराबाद, औरंगाबाद अित्यादि शहरीं साजरा करण्यांत आला. पुण्यास या अुत्सवाचा कार्यक्रम लागोपाठ पांच दिवस चालला होता. ता. १४ जानेवारी दिवशीं साहित्य व अितिहास यांसंबंधी कार्यक्रम झाला, त्यांत म. सा. परिषदेने भाग घेतला होता. सोलापूर ठरावाप्रमाणे नेमलेल्या समितीने वाङ्मयस्मारकाची योजना आता आंखली असून अधिकृत असे दोन ग्रंथ लिहिण्यास आरंभ झाला आहे. या ग्रंथांची किंमत प्रत्येकीं रु. ७॥ ठेविली असून आगाअू ग्राहकांस दोन्ही ग्रंथ मात्र १० रुपयांत देण्यांत येतील.

**संमेलनाध्यक्षांची निवडणूक**— यंदाच्या संमेलनाच्या तारखा निश्चित न झाल्या-मुळे संमेलनाध्यक्षांची निवडणूक आजपर्यंत करितां आली नाही. आता परिषदेच्या सदस्यांनी संमेलनाध्यक्षपदासाठी १५ मार्चपर्यंत नांवें सुचवावीं अशी त्यांस विनंती आहे. या तारखेनंतर सुचविलेल्या नांवांचा विचार करण्यांत येणार नाही.

**अितर**— नियोजित 'माधवराव पटवर्धन सभागृहा'च्या अिमारतीच्या कामास आरंभ झाला असून तळमजला बांधून झाला आहे. मे महिन्यापर्यंत अिमारत पुरी बांधून होअील असा अंदाज आहे.

## नवीन सभासद

**तहहयात**

१. श्री. गोविंद दामोदर लिमये, कलकत्ता.

**साधारण**

१. श्री. शंकर गोविंदराव नांदेडकर
२. सौ. संजीवनी मराठे, विलेंपारलें
३. रा. ब. य. अ. ठोमरे, सांगली
४. श्री. काशीनाथ हरि खाडिलकर, सांगली
५. ,, कृ. के. रहाळकर, पनवेल
६. ,, तु. ता. सावंत, मुंबअी
७. ,, सदाशिव मार्तंड गर्गे, औरंगाबाद
८. श्री. जगन्नाथ परमानंद मुळे, औरंगाबाद
९. ,, दत्तोपंत दिनकर अभ्यंकर ,,
१०. ,, हनुमन्तराव गणेशराव वैष्णव ,,
११. डॉ. गणपतराव रघुनाथराव वैद्य ,,
१२. श्री. श्रीराम हरि अत्तरदे पुणें
१३. ,, हरि श्रीधर शेणोलीकर ,,
१४. ,, रा. शं. वाळिंबे ,,
१५. डॉ. श्रीधर दत्तात्रय लिमये ,,
१६. श्री. शंकर कृष्ण देवभक्त ,,
१७. ,, गजानन विनायक आपटे, जमशेटपूर

# परिभाषावृत्त आणि मतें

'पत्रिके'च्या गेल्या अंकांत प्रा. दे. द. वाडेकर यांचा 'हिंदी शास्त्रीय परिभाषेचा प्रश्न' या शीर्षकाचा जो लेख प्रसिद्ध झालेला आहे त्यांत प्रा. वाडेकर यांनी हिंदुस्थान सरकारच्या शैक्षणिक सल्लागारमंडळाने नेमलेल्या शास्त्रीय परिभाषा समितीचा अहवाल आणि तद्विषयक स्वतःचीं मतें मांडलेलीं आहेत. समितीच्या या अहवालावर येथील परिभाषा-चर्चा-मंडळाच्या बैठकींतून भरपूर चर्चा होअून असें ठरलें कीं शास्त्रीय परिभाषेचा सांगोपांग विचार करण्या-साठीं शक्य तर अेखादी 'परिभाषापरिषद्' भरविली जावी. अशी परिषद् भरविण्याच्या दृष्टीने योग्य तें कार्य करण्यासाठी साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाने अधिक सभासद स्वीकृतीच्या अधिकारासह पुढील समिति नेमलेली आहे.

अध्यक्ष— प्रा. वा. म. जोशी.

सदस्य— प्रा. द. वा. लिमये, प्रा. दे. द. वाडेकर, प्रा. श्री. ल. आजरेकर, श्री. ह. पु. परांजपे, श्री. य. रा. दाते, श्री. चिं. ग. कर्वे.

चिटणीस— राव. र. लु. जोशी, प्रा. रा. वि. ओतुरकर.

या समितीच्या कार्याला सुरवात झालेली असून मे महिन्याच्या सुमारास परिषद् भरविली जावी असा अंदाज आहे.

मध्यंतरीं परिभाषा-चर्चामंडळाच्या वतीने प्रा. वाडेकर यांच्या अुपरिनिर्दिष्ट लेखाच्या प्रति सुमारे ७५ निरनिराळ्या संस्था आणि व्यक्ति यांच्याकडे मतप्रदर्शनासाठी म्हणून पाठविल्या. त्यांपैकीं १०-११ जणांचीं अुत्तरें तूर्त हातीं आलेलीं आहेत. प्रा. ध. रा. गाडगीळ, प्रा. द. वा. पोतदार, प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर, अलाहाबादचे डॉ. सत्यप्रकाश, डॉ. म. वि. आपटे, श्री. वि. के. खासनीस अित्यादिकांनीं परिषद् बोलावण्याच्या कल्पनेचा पुरस्कार केलेला असून डॉ. गो. स. पळसुले, प्रा शं. आ. परांडेकर आणि श्री. श्री. ग. मालेराव यांनी आपलीं विस्तृत मतें कळविलीं आहेत. या तिघांनाहि परिषदेची कल्पना मान्य आहे; मात्र डॉ. पळसुले आणि परांडेकर यांचें मत स्थूलतः असें कीं तूर्त तरी अखिल भारतीय परिभाषेच्या फंदांत पडूं नये. प्रांतीय परिभाषेवरच तूर्त लक्ष द्यावें. असें करतांना संस्कृत शब्दांचा योग्य तो आसरा घ्यावा. मात्र प्रा. परांडेकरांच्या मतें, अुच्च शिक्षणासाठीं लॅटिन-ग्रीकयुक्तपरिभाषाच वापरावी. अुलट-पक्षीं श्री. मालेराव यांच्या मतें आमूलाग्र सर्व शास्त्रीय शिक्षण सर्वस्वीं स्वभाषेंतून देतां यावें हें ध्येय नजरेसमोर ठेवून परिभाषा बनविली जावी, आणि असें करतांना संस्कृतनिष्ठ भाषांनी आपापसांत शक्य तितकें अैक्य राखण्याचा प्रयत्न ठेवावा.

याखेरीज अितरहि कित्येक संस्थांनी आणि व्यक्तींनी वरील सरकारी अहवालाविषयी आणि त्यांतील मताविषयी आपली नापसंति दर्शविली आहे. खुद्द सरकारी परिभाषा समितीं-तीलच अेक सभासद, अलाहाबाद विद्यापीठाचे कुलगुरु पं. अमरनाथ झा यांनी अबोहरच्या हिंदी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून मुख्यत्वें संस्कृत-निष्ठ शास्त्रीय परिभाषेचा पुरस्कार केल्याचें प्रसिद्ध झालें आहे. याच परिषदेच्या विज्ञानविभागाच्या अध्यक्षांनीहि अशाच अर्थाचें मत दिलें आहे. अलाहाबादेच्या विज्ञानपरिषदेने आणि बंगीय साहित्य-परिषदेच्या बैठकीनेहि अुपरि-

निर्दिष्ट अहवालाचें धोरण देशी भाषांच्या विकासाला घातुक असल्याचें आपलें मत दिलें आहे. महाराष्ट्रांत कऱ्हाड आणि अमळनेर येथील संमेलनांतून या रिपोर्टांतील धोरणाबद्दल नापसंती दाखविणारे ठराव संमत झाले आहेत.

अलाहाबाद येथील डॉ. सत्यप्रकाश यांचा अेतद्विषयक अेक लेख 'लीडर'च्या ता. १३ जानेवारीच्या अंकांत प्रसिद्ध झालेला असून त्यांत त्यांनी पुढील मतें मांडलेलीं आहेतः— (१) अिंग्रजी संज्ञा आमच्या भाषांच्या प्रकृतीला मानवण्याजोग्या नाहीत; (२) अनेक अिंग्रजी संज्ञा अशा आहेत की त्या फ्रेंच, जर्मन, रशियन भाषेंत नाहीत; (३) हिंदी, मराठी, बंगाली वगैरे भाषा जशा अेकाच मूळापासून निघालेल्या आहेत तशाच रीतीने अेकाच मुळापासून निघालेल्या चार युरोपीय भाषांना कांही संज्ञा सामान्य असल्या म्हणून कांही त्या 'आंतरराष्ट्रीय' ठरत नाहीत. कित्येक पारिभाषिक संज्ञांखेरीज अितरहि अनेक शब्द या भाषांतून सामान्य आहेत. आमचा अुगम निराळा; साहजिकच परिभाषा ही निराळी हवी. अेखादी संज्ञा "आंतरराष्ट्रीय" आहे असें म्हणण्यापूर्वी ती यूरोपीय, सेमेटिक, मंगोलियन, द्राविडी आणि अिंडो-आर्यन भाषांना सामान्य आहे असें दाखवावें लागेल; (४) हिंदी परिभाषेमुळे आम्ही सुमारें ३० कोटी लोकांचें भाषिक अैक्य राखूं शकूं; (५) अिंग्रजी संज्ञा घ्यावयाची म्हटलें म्हणजे तिचा सर्व प्रपंच आणि गोतावळा घ्यावा लागतो. भाषेंतील नवीन निर्मिति खुंटते. अल्फा, बीटा वगैरेसारखीं चिन्हें देखील परकीय घेअूं नयेत; (६) संशोधकांची वा अन्वेषकांची गरज ही समाजाच्या अनेक गरजांपैकी अेक आहे. तिच्यासाठी बाकीच्या गरजा मारल्या जाअूं नयेत. (७) वरील सर्व कारणें ध्यानांत घेतां संस्कृतनिष्ठ भाषांच्या गटासाठी अेक सामान्य परिभाषा आणि अुर्दुनिष्ठांसाठी दुसरी अशा दोन परिभाषा बनविण्याचा प्रयत्न व्हावा.

शास्त्रीय विषयाशीं प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंध येणाऱ्या, त्यांतच वावरणाऱ्या लोकांचीं हीं मतें झालीं. याखेरीज अगदी अलीकडे 'सर्वोदय' मासिकाच्या जानेवारी १९४२ च्या अंकांत महात्मा गांधीजींचें अेक मत त्यांनी स्वतः लिहिलेल्या 'विधायक कार्यक्रम' या शीर्षकाच्या अेका लेखांत प्रसिद्ध झालेलें आहे तें असें—

'अपनी मातृभाषा की अपेक्षा अंग्रेजी के प्रति हमारे विशेष अनुरागने सुशिक्षित और राजनैतिक वृत्ति के वर्गों के तथा जनता के बीच अेक गहरी खाअी खोद दी है। हिंदुस्तान की भाषाअें श्रीहीन हो गयी है। जब हम अपनी मातृभाषा में कोअी गहन विचार व्यक्त करने का व्यर्थ प्रयास करते हैं, तो हम हकलाते हैं। शास्त्रीय संज्ञा ओं के लिअे कोअी प्रतिशब्द नहीं है। परिणाम विनाशकारी हुआ है। आधुनिक मनोवृत्तिसे जनसमूह दूर रह जाता है।... यह आसानी से समझमें आ सकता है कि जबतक हम इस अनर्थका निवारण नहीं करेंगे, तबतक जनता की बुद्धि जकडी हुअी रहेगी।"

याच विचारांना पोषक होणारा देशी भाषांचा पुरस्कार त्यांच्या बनारस विद्यापीठांतील रौप्यमहोत्सवानिमित्त झालेल्या अध्यक्षीय भाषणांत झालेला होता हें वृत्तपत्रांच्या वाचकांना माहीतच असेल.

परिभाषेविषयीं आढळूं लागलेली ही सार्वत्रिक जागरूक वृत्ति अुत्साहवर्धक आहे असेंच कोणीहि स्वभाषाप्रेमी म्हणेल.

त्र्यं. गो. ढवळे,
कार्यवाह, परिभाषाचर्चामंडळ.

---

# कै. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर



सुप्रसिद्ध संतचरित्रकार व मराठी-वाङ्मयेतिहासलेखक ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर हे आपल्या वयाच्या ७० व्या वर्षी वर्धा येथे ता. १० नोव्हेंबर १९४१ रोजीं कालवश झाले. पांगारकरांच्या गेल्या चाळीस वर्षांतील वाङ्मयीन तपस्येमुळे त्यांचें नांव महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालें आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें विचारप्रवर्तक वाङ्मय व टिळक-आगरकरांचें अुज्ज्वल चारित्र्य यांची विद्यार्थिदशेंतच त्यांच्या मनावर छाप बसली; आणि स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांच्या सेवेमध्ये आपलें आयुष्य खर्च करण्याचा त्यांनीं संकल्प केला. पूर्ववयांत लो. टिळकांच्या जहाल राजकारणाकडे त्यांचा विशेष ओढा होता. त्यामुळे त्यांच्या आरंभींच्या लिखाणांत अीशभक्तीपेक्षा देशभक्तीचीच प्रेरणा बलवत्तर दिसते. ज्ञानेश्वर-नामदेवांच्या प्रेमळ व प्रसन्न वाङ्मयापेक्षा तुकाराम-रामदासांच्या भेदक व तेजस्वी साहित्याकडे त्यांचें लक्ष प्रथम गेलें याचें कारणहि बहुधा हेंच असावें. १९०८ च्या सुमारास त्यांनीं 'रामदासीबुवा' व 'मारुति-अुपासना' हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. पहिलें पुस्तक तर सरकारने दुसऱ्याच वर्षी जप्त केलें. मात्र राजकारणांतील धकाधकीचा मामला आपल्या प्रकृतीस फार काळ मानवणार नाहीं हें पांगारकरांनीं लवकरच ओळखलें, व वाङ्मयोपासनेपुरतीच आपल्या कार्यक्षेत्राची मर्यादा निश्चित केली. त्यानंतर त्यांनीं प्राचीन वाङ्मयाचें परिश्रमपूर्वक संशोधन व परिशीलन करून मराठी साहित्यांत पंधरावीस टीकात्मक व चरित्रपर ग्रंथांची बहुमोल भर घातली. 'मुमुक्षु' साप्ताहिकाच्या द्वारें त्यांनीं अनेक वाङ्मयीन विषयांचा वेळोवेळीं परामर्श घेतला. चिपळूणकरांच्या परंपरेंतील 'रससिद्ध' लेखक, व पंढरपूरच्या भागवतसंप्रदायाचे प्रभावी प्रवक्ते या दोन्ही दृष्टींनी आजच्या मराठी वाङ्मयांतील त्यांचें स्थान खरोखरीच अढळ आहे. 'मराठी भाषेचें स्वरूप', 'निबंधमालेचें स्वरूप व कार्य', 'मोरोपंत-चरित्र व काव्यविवेचन' अित्यादि ग्रंथांत त्यांची वाङ्मयीन टीकाकाराची भूमिका बऱ्याच शुद्ध स्वरूपांत आढळते; पण पुढे पुढे मात्र त्यांना ही शुद्धता कायम टिकवितां आली नाहीं. कलादृष्टीवर भावनोत्कटतेने मात केली, व चिकित्सेची जागा अंधश्रद्धेने घेतली. त्यामुळे त्यांचें विवेचन प्रायः सुरस पण अेकांगी व भोंगळ होअूं लागलें. नामदेवादि संतांच्या अमृतवाणीचा आस्वाद घेतां घेतां त्यांचें वाङ्मयाचें अनुसंधान सुटलें, व रसाळ भाषेंत भक्तिज्ञानवैराग्याचे गोडवे गाण्यांतच त्यांची लेखणी रंगूं लागली. मात्र साधुसंतांच्या वृत्तीशीं तादात्म्य पावून त्यांच्या वाङ्मयांतील रहस्य रसिकतेने अुलगडून दाखविण्यांत पांगारकरांचा हातखंडा आहे. त्या दृष्टीने त्यांनीं लिहिलेलीं ज्ञानेश्वर, अेकनाथ, तुकाराम यांचीं चरित्रें अभ्यसनीय आहेत. त्यांच्या मराठी वाङ्मयाच्या अितिहासाचे तीन खंड म्हणजे त्यांच्या तीन तपांच्या व्यासंगाचें परिपक्व फलच होय असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. ह्यांतील अेखादा खंड जरी सहज चाळून पाहिला तरी पांगारकरांच्या अंगीं अुद्योगशीलता, शोधकता, मार्मिकता, भाषाप्रभुत्व अित्यादि गुण किती अुत्कटत्वाने वसत होते हें तेव्हाच ध्यानांत येतें. अर्वाचीन काळांत महाराष्ट्रांतील सर्वमान्य जनतेला संत-

अनुक्रमणिका

वाङ्मयाची गोडी लावण्याचें श्रेय बव्हंशीं पांगारकरांनाच आहे. त्यांच्या 'भक्तिमार्गप्रदीपा'नेंच भागवतधर्माचें लोण पुन्हा अेकदा घरोघरीं पोहोचविलें. ज्ञानेश्वरी, अेकनाथी भागवत, दासबोध या सारख्या प्रासादिक ग्रंथांचा सूक्ष्म व सतत व्यासंग ठेवल्यामुळे पांगारकरांची भाषा अगदी अस्सल मराठी वळणाची झाली आहे. त्यांच्या समकालीन साहित्यिकांप्रमाणे त्यांच्या लेखनशैलीला अिंग्रजी भाषेचा संपर्क बिलकूल बाधला नाहीं. त्यांचें वक्तृत्वहि तसेंच अमोघ होतें. शेकडो लोकांच्या समुदायाला बोलबोलतां मंत्रमुग्ध करण्याचें सामर्थ्य त्यांच्या वाणीमध्ये होतें. असा हा सव्यसाची वाग्भट दिवंगत झाल्यामुळे मराठी वाङ्मयाची फार मोठी हानि झाली आहे यांत शंका नाही.

गं. बा. सरदार

---

# भास्करराव तांबे अमर झाले



### राजराजेश्वरा कां दयाळा । तातडी कां असे हो निघालां ?

दिवंगत लोकमान्यांना अुद्देशून भास्करराव तांब्यांनी वरील प्रश्न कळवळून विचारला; परंतु ता. ७ डिसेंबर रोजीं हाच प्रश्न तांब्यांनाच विचारण्याचा कुयोग आला. त्या दिवशीं भास्कररावजींनी आपणा सर्वांचा कायमचा निरोप घेतला. कमळाच्या द्रोणांतून महाराष्ट्ररसिकांना 'मधु' पाजणारा कविश्रेष्ठ निधन पावला.

कै. तांबे १९१७-१८ सालीं महाराष्ट्राला ज्ञात झाले. दूर अुत्तरहिंदुस्थानांतील संस्थानांत अुमलूं लागलेल्या काव्यसुमनांचा सुगंध महाराष्ट्रापर्यंत येअून पोहोचला आणि

Full many a flower is born to blush unseen,
And waste its sweetness in the desert air.

ही ग्रे कवीची अुक्ति तांब्यांच्या बाबतींत खोटी ठरली.

तांब्यांचा जन्म अि. स. १८७४ सालीं ग्वाल्हेर संस्थानांतील मुगावली या गांवीं झाला. बाळपणींच त्यांचे वडील वारले. परंतु त्यांचे मामा बळवंतराव डोंगरे यांच्या मदतीने त्यांनी आपलें प्रवेशपरीक्षेपर्यंतचें शिक्षण घेतलें. अि. स. १८९३ मध्ये अलाहाबाद विद्यापीठाची प्रवेशपरीक्षा पास झाल्यावर त्यांनी नोकरी धरली. भास्कररावजींनी आपल्या कर्तबगारीने निरनिराळ्या हुद्यांचीं कामें केलीं. तांब्यांची ओळख महाराष्ट्राला जरी अुशीरा झाली तरी ती पूर्णपणें झाली असें म्हटलें पाहिजे. १९२६ सालीं अिंदूर येथे भरलेल्या कवि-संमेलनाचे ते अध्यक्ष निवडले गेले, आणि १९३२ सालीं कोल्हापूर येथे भरलेल्या साहित्यसंमेलनांत कवि-संमेलनाचें अध्यक्षपदहि त्यांनाच देण्यांत आलें. देवास आणि ग्वालेर या दरबारांनीहि त्यांना राजकविपद देअून त्यांचा गौरव केला.

कै. तांबे हे अभिजात कवि होते. ज्या ज्या गोष्टींनी त्यांच्या मनाला चटका लावला, त्या त्या गोष्टी त्यांच्या कवितांतून अवतरल्या. जडसृष्टींतील किंवा चैतन्यसृष्टींतील जीं दृश्यें

त्यांच्या मनाला झोंबलीं तीं काव्यरूपाने परिणत झालीं. तांब्यांच्या कवितेचा अेक विशेष असा आहे की तिची वाढ त्यांच्या जीवनाच्या संगतीनेच झाली आहे. तांबे स्वतःच अेका पत्रांत म्हणतात, "मी पंधरा वर्षांचा होअीपर्यंत ती शिशूप्रमाणे बोबडे बोल बोले. माझ्या नव-यौवनाच्या काळांत ती कामुक झाली... विवाहानंतर ती प्रेमांतच रंगून गेली. पुढे माझीं मुलें समोंवतीं दिसूं लागतांच तिने मुलांचीं गाणीं गाअिलीं. मृत्यु जेव्हा माझ्या दाराशीं आला आणि मुलांना घेअून गेला तेव्हा ती चिंताक्रान्त आणि अुदासवाणी झाली... आता माझ्या भोंवतींचे साहित्यिक गळून पडल्यावर अशक्तता, क्लेश, रोग हीं माझ्या शरिरांत ठाण देअून बसल्यावर आणि... माझा संसार अितस्ततः फेकला गेल्यावर माझे डोळे जर अिहलोकच्या सीमेपलीकडील दूरस्थ प्रदेशाकडे त्या परम भवितव्याकडे लागले तर काय आश्चर्य? दिक्कालांच्या सीमांच्या पलीकडे दूर दूर असलेल्या त्या रम्याद्भुत मोहन लोकांतील घंटांचा झणत्कार मला अैकूं येत आहे ..."

तांब्यांच्या काव्याची परिणति अशा प्रकारें झाली आहे. परंतु याचा अर्थ त्यांचें लक्ष स्वतःपलीकडे गेलेंच नाही असें नाही. समाजांतील विषमता पाहून त्यांनी रुद्राला आवाहान केलें, तर हिंदु विधवांची दुर्दशा पाहून त्यांचीं त्यांनी करुण, अुदास अशीं हृदयस्पर्शी चित्रें काढलीं.

तांब्यांची कविता पूर्णपणें कलावादी आणि आनंदवादी आहे. तिला नीति-अनीति, श्लील-अश्लील यांची बाधा होत नाही. "The absolute joy is the be-all and end-all of all art" असें तांब्यांचें मत होतें; आणि त्या दृष्टीनेच त्यांच्या कवितेचा प्रतिभा-विलास झालेला दिसतो.

तांबे हे अभिजात कवि असले तरी त्यांनी काव्य आणि काव्यकला यांच्या अभ्यासाकडे मुळीच दुर्लक्ष केलें नाही. मम्मटाचा काव्यप्रकाश आणि दंडीचा काव्यादर्श यांचा त्यांनी गाढ अभ्यास केला होता. बलवंत कमलाकराचा रसप्रबोध त्यांनी सांगोपांग अभ्यासिला होता. अितकेंच नव्हे तर आपल्या भावकविता रसानुकूल व्हाव्यात म्हणून त्यांनी संगीतशास्त्राचेहि पाठ घेतले होते. अिंग्लिश काव्याचाहि त्यांचा व्यासंग चांगला होता. शेक्सपिअरपासून बायरन, वर्डस्वर्थ, शेले, टेनिसन अित्यादींच्या पुष्कळशा कविता त्यांना मुखोद्गत होत्या. अर्नोल्ड, डाअुडन, स्टॉफर्ड ब्रूक अित्यादि पाश्चात्य टीकाकारहि त्यांनी चिकित्सेने वाचले होते. काव्यानंदांत दंग असलेल्या त्यांच्या स्वयंभू प्रतिभेला त्यांनी ही अशी अभ्यासाची जोड दिली होती.

अलीकडे त्यांची दृष्टि अिहलोकच्या पलीकडील दूरस्थ देशाकडे लागली होती. नीलाकाशापलीकडील अनंतांतून त्यांना गोड घंटानाद अैकूं येत होता. "का मरणिं अमरता ही न खरी?" हा प्रश्न वरचेवर पडून "मरणांत खरोखर जग जगतें" असें त्याचें ते अुत्तरहि देत असत. ता. ७ डिसेंबरला हेंच अुत्तर त्यांनी कृतीने दिलें, आणि अिहलोकींचा निरोप घेतला. तांबे वारले; पण छे! तांबे अमर झाले.

गं. ब. ग्रामोपाध्ये

---

# सूचना

सोलापूर संमेलनांतील १७ व्या ठरावान्वये नेमलेल्या समितीने तयार केलेलें कोंकणी भाषेसंबंधीचें निवेदन-पत्र (Memorandum) या अंकासोबत पाठविण्यांत येत आहे.

जानेवारीपासून नवीन वर्ष सुरू झालें. सभासदांनी आपली वर्गणी सत्वर पाठविण्याची कृपा करावी. पत्ते बदलले असल्यास तेहि कार्यालयास कळवावे.

—चिटणीस.
म. सा. परिषद्

---

# वर्गणीविषयक माहिती

म. सा. पत्रिकेची वार्षिक वर्गणी — रु. ४॥ (ट.ख.सह).

परिषदेचे सभासद व संलग्नसंस्था — वा. व. रु. ३ (म. सा. पत्रिका विना-मूल्य पाठविली जाते)

पत्रव्यवहाराचा पत्ता— महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

१८ **जबलपूर महाराष्ट्रीय परिषद्** (भाग १)— प्रका० स. ल. पराजपे, चिटणीस; श्रीदत्त भजन मंडळ, जबलपूर; मूल्य आ. ८.

१९ **संमोहनशास्त्र** ( Anæsthesia )— ले० व प्रका० डॉ. मा. पु. जोशी; ९१२ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. २॥.

२० **जीवनयोग**— कवि श्री. ना. ग. जोशी; प्रका० श्री. मा. रा. देशपांडे, सन्ध्या प्रकाशन, १२ टिळक रस्ता, पुणें २; मूल्य आ. १२.

२१–२२ **वैदिक-शांकर-अद्वैतमतानुवाद अर्थात् प्रस्थानत्रयभाष्याचा उपसंहार**— (कार्यकारणाचें अनन्यत्व) व (वेदसिद्ध मायावाद) ले० व प्रका० अुपनिषत्तीर्थ द. वा. जोग, २६०(२) सदाशिव, पुणें २; मूल्य अनुक्रमे आ. ६, रु. १.

२३ **वेलविस्तार**— ले० महादेवशास्त्री जोशी; प्रका० वा. द. सातोस्कर, सागर-साहित्य, त्रिभुवन रोड, मुंबअी; मूल्य रु. १.

२४ **रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांचे संकलित लेख** (प्रथम खंड)— प्रका० रा. का. तटणीस; ३६४ ठाकुरद्वार, मुंबअी २; मूल्य रु. २॥.

२५ **महाराष्ट्र वाचनालय जबलपूर–रौप्यमहोत्सवस्मृति**— संपा० व प्रका० म. कृ. गोळवळकर, ॲडव्होकेट, महाराष्ट्र वाचनालय, जबलपूर.

२६ **स्त्री आणि सौन्दर्य**— ले० श्री. य. ग. वझे; प्रका० श्री. ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता पुणें २; मूल्य रु. १॥.

२७ **श्रीअवंतीक्षेत्रभूषणा श्रीशिप्रानदीमाहात्म्य**— ले० प्रका० श्री. मा. ना. बर्डे, खत्री वाडा, उज्जयिनी, मूल्य आ. ४.

## देशमूख आणि कंपनी, पुणें २, यांचीं प्रकाशनें—

नवें भारूड— ले० प्रो. चिं. वि. जोशी, मूल्य रु. १॥; सहा भाषणें— ले० वि. स. खांडेकर, मूल्य रु. १॥; घरच्याबाहेर— ले० वि. स. खांडेकर, मूल्य रु. १।; अविनाश— ले० वि. स. खांडेकर मूल्य रु. १।; जळलेला मोहोर— ले० वि. स. खांडेकर, मूल्य रु. २॥; पहिलें प्रेम— ले० वि. स. खांडेकर, मूल्य रु. २॥; फुलें आणि दगड— ले० वि. स. खांडेकर, मूल्य रु. १॥; ढासळलेले बुरुज— ले० प्रो. लक्ष्मणराव सरदेसाअी, मूल्य रु. १॥; सख्याहरि — ले० दत्तु बांदेकर, मूल्य रु. १॥; अवशेष— ले० ग. त्र्यं. माडखोलकर, मूल्य रु. १; तात्या— ले० ना. धों. ताम्हनकर, मूल्य रु. २; मानवेंद्रनाथ रॉय (चरित्र व विचार)— ले० भाअी बेके, मूल्य रु. १॥; नागकन्या— ले० श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, मूल्य रु. २.

---

---


आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.


अनुक्रमणिका

